To the Osmania University Library, Hyderabad (Deccan).

*With Best Compliments*

*From*

His Highness Raja Shrimant

SIR RAGHUNATHRAO *Alias* BABASAHEB PANDIT,

Pant Sachiv, K C. I E,

*RAJA OF BHOR*

राजा

# श्रीमंत रघुनाथराव पंडित पंतसचिव

## राजेसाहेब संस्थान भोर

# यांचें चरित्र

खंड ३ रा

लेखक

**वासुदेव नारायण जोशी**

( माजी शाळाधिकारी, भोर स्टेट )

१९३९

# अनुक्रमाणिका

## खंड ३ रा

## परिशिष्टें

# चित्रानुक्रमणिका

## खंड ३ रा

| चित्रांक | चित्राचे वर्णन | सदर्भ पान | पृष्ठांक |
|---|---|---|---|
| २०७ | भोर सस्थानचे साकेतिक चिन्ह (Bhor State Heraldic Emblem) | ९५४ | ९१० |
| २०८ | श्रीमत राजेसाहेबाचे हस्ताक्षर चरित्र अर्पण करण्यास लेखकास परवानगी देणारे पत्र | ९५७ | ९५० |
| २०९ | श्रीमत राजेसाहेबाना सन १९३० साली विलायतेस जाण्यापूर्वी भोर कायदेमडळानें समारभाने निरोप दिला त्या वेळचा फोटो | प ७६ | प. ८० |
| २१० | श्रीमत युवराज भाऊसाहेब गिलवेल पार्कमध्ये स्काउटचे शिक्षण घेत असताना (सन १९३०) | प ८८ | प. ८४ |
| २११ | लडनमधील व्हिक्टोरिया मेमोरिअलनजीक सहावे जॉर्ज बादशहा याच्या राज्यारोहणानिमित्त निघालेल्या मिरवणुकीचे दृश्य (सन १९३७) | प ८६ | प ८४ |
| २१२ | राज्यारोहणाच्या वेळी सहावे जॉर्ज बादशहा याचे पिअर मडळी दर्शन घेत असताना (सन १९३७) | प ८८ | प. ८६ |
| २१३ | काहलेनबर्ग टेरेसवरून दिसणारे व्हिएन्नाचे दृश्य (सन १९३७) | प ९० | प. ९१ |
| २१४ | गटेच्या पुतळ्याशेजारी, व्हिएन्ना (सन १९३७) | प. ९० | प. ९१ |
| २१५ | स्प्रूडल झरा, कार्ल्सबाद | प. ९३ | प. ९३ |
| २१६. | कार्ल्सबाद येथील थिएटरमध्यें (सन १९३७). डॉ. बेनेस (त्या वेळचे झेकोस्लोव्हाकियाचे अध्यक्ष) व श्रीमत राजेसाहेब यांची येथें ओळख करून देण्यात आली | | प. ९७ |
| २१७ | पॅरिसनजीकच्या आयफेल टॉवरच्या दुसऱ्या मजल्यावर (सन १९३७) | प ९९ | प १०० |
| २१८ | व्हर्साइलच्या बागेत | प १०० | प १०० |
| २१९ | अतरिक्षातून दिसणारे नेपल्स शहर, वरचे बाजूस व्हेसुव्हिअस ज्वालामुखी पर्वताचें दृश्य | प १०२ | प. १०९ |

चित्राक १४७



राजकुटुबातील मडळी ( सन १९३८ मधील फोटो )

**खुर्चीवर:**—१ रा कु. रावसाहेब ( पुत्र ), २ श्री युवराज भाऊसाहेब ( पुत्र ) ३ श्री राजेसाहेब, ४ रा कु आबासाहेब ( नातू ), ५ रा. कु. बापूसाहेब ( पुत्र ).
उभी राग —१ श्री रा कु पद्मावती राजे ( कन्या ), २ श्री सौ माईसाहेब ( युवराज्ञी ), ३ रा कु. विमलाराजे ( नात )
बसलेली राग —१ रा कु लीलाराजे, २ रा कु रेणुकाराजे, ३ रा कु कमलाराजे ( नाती )

## प्रकरण १८ वे

# कौटुंबिक वृत्तान्त

कै. श्रीमत सौ. लक्ष्मीबाई या पुणे येथील खानदानीच्या प्रसिद्ध पुराणिक घराण्यातील असून श्रीमत बाबासाहेब यांचा द्वितीय विवाह त्यांचेबरोबर सन १९०८ साली झाला, ही हकीकत पहिल्या खंडात सविस्तर सांगण्यात आलीच आहे. त्या सुस्वभावी, मनमिळाऊ व सुशिक्षित असून श्रीमत राजेसाहेब यांस अनुरूप अशाच होत्या. श्री. सौ. राणीसाहेब यांचे वडील ब्रह्मदेशात व इतर ठिकाणी नोकरीनिमित्त राहत असत. त्यांचेबरोबर श्री. सौ. राणीसाहेबांचे बालपण तिकडील देशात व इतर बऱ्याच ठिकाणी प्रवास करण्यात व्यतीत झाले. यामुळे निरनिराळ्या अनेक भाषा त्यांना अवगत होत्या. त्यांत हिंदी, गुजराथी, ब्रह्मी या चांगल्या येत असून संगीत कलेत त्यांची प्रगति चांगली होती. गाणे किंवा पेटीवादन यांचे त्यांना शिक्षण कधीच मिळाले नाही. तथापि, एखाद्याने गाणे म्हणतांना अगर पेटीवर चीज वाजवितांना त्यांनीं ऐकिली कीं, अल्प प्रयत्नानें त्या तिचें आकलन करीत. एकंदरीनें त्यांची बुद्धिमत्ता चांगली होती व श्रीमत राजेसाहेबांना त्यांचा वेळोवेळी उपयोग होत असे. यापूर्वी भोर संस्थानाधिपतींच्या पत्नींना राणी म्हणण्याची पद्धत नसे, त्यांना त्यांच्या नावानें हाक न मारतां एखाद्या सन्मानदर्शक टोपणनावानें संबोधण्याची पद्धत असे. श्रीमत राजेसाहेब गादीवर आल्यावर इतर संस्थानांतील पद्धतीप्रमाणे त्यांना राणीसाहेब असे म्हणण्याची प्रथा पाडण्यात आली.

### अपत्ये

श्रीमत राणीसाहेबांना एकंदर पांच अपत्ये झाली. पैकीं पहिली दोन जन्मानंतर अल्पकालातच आपल्या माता-पित्यांना दुःखात लोटून दिवंगत झाली, याविषयीं पहिल्या खंडात उल्लेख करण्यात आलेला आहेच. सन १९२२ च्या जून २६ तारखेस त्यांना पुत्र झाला. त्याचे नांव श्री. राजकुमार आनंदराव ऊर्फ बापूसाहेब असें ठेवण्यात आले. पुढे कालानुक्रमानें ता. १८ मे १९२४ रोजीं श्री. राजकुमार नारायणराव ऊर्फ रावसाहेब व ता. ४ जानेवारी १९२७ रोजीं श्री. राजकुमारी पद्मावतीराजे यांना त्यांनीं जन्म दिले. यानंतर त्यांना अपत्य झाले

नांही या तीनांहि मुलांचे शिक्षण श्रीमंत राजेसाहेब यांच्या स्वतःचे देखरेखी-खालीं प्रथम भोर येथें कांही दिवस झालें व पुढें पुणे येथील नूतन मराठी विद्यालयांत श्रीमंत बापूसाहेब व श्री रावसाहेब यांचे शिक्षण चालू ठेविलें.

श्रीमंत बापूसाहेब याच विद्यालयांतून सन १९३९ सालच्या मॅट्रिक परीक्षेस बसून चांगल्या प्रकारें उत्तीर्ण झाले व हल्ली सर परशुरामभाऊ कॉलेजांत शिकत आहेत. ते कॉलेजमधील यु. टी. सी. चे शिक्षण घेत असतात. श्रीमंत रावसाहेब नूतन मराठी विद्यालय हायस्कुलांत शिकत आहेत. मुलींच्या हायस्कूलमध्ये श्री. राजकुमारी पद्मावतीराजे यांचे शिक्षण चालू असून श्रीमंत रावसाहेब व राजकुमारी पद्मावतीराजे वार्षिक परीक्षेत चांगल्या प्रकारें उत्तीर्ण होऊन अनुक्रमे सातव्या व पाचव्या इयत्तेत गेले आहेत. त्यांच्या शारीरिक शिक्षणाची विशेष काळजी घेण्यांत येत असून सर्वांच्या प्रकृती सुदृढ आहेत. तसेंच शाळेतील अभ्यासक्रमाशिवाय गाणे, पेटीवादन इत्यादि संगीतकलेचें शिक्षणहि एका संगीततज्ज्ञाच्या देखरेखीखालीं देण्यांत येत असतें. तसेंच तिघांनाहि घोड्यावर बसण्यास शिकविलें असून गव्हर्मेंट हाउसवर पोलोपोनी शो दरसाल करण्यांत येतात, त्यांत श्रीमंत राजकुमार व राजकुमारी भाग घेतात.

## राणीसाहेबांचे जीवनकार्य

श्री. सौ. राणीसाहेब या सुशिक्षित होत्या. त्यामुळें त्या मुलांच्या शिक्षणाची व संगोपनाची जशी योग्य प्रकारची काळजी घेत असत तशीच त्यांच्या स्त्री-प्रजा-जनांची-त्यांच्यांत शिक्षणाचा प्रसार होऊन त्यांची उन्नति व्हावी म्हणून-त्या विशेष काळजी घेत. संस्थानच्या राज्ञिपदावर त्या अभिषिक्त झाल्यावर संस्थानांतील स्त्रियांची सुधारणा व्हावी अशी त्यांना इच्छा होणे स्वाभाविकच होतें, व त्या दिशेनें त्यांनीं प्रयत्न करून शिक्षणाबाबत कांहीं सुधारणा घडवूनहि आणिल्या. १९२२ सालीं ऑगस्टच्या २४ तारखेस भोर येथील शाळेतील विद्यार्थिनींना राज्यारोहणसमारंभाप्रीत्यर्थ मिठाई वाटण्याचा समारंभ श्रीमंत सौ. राणीसाहेब यांचे हस्तें झाला. त्या वेळीं त्यांनीं केलेलें भाषण फारच उद्बोधक असून त्यांना शिक्षणाबद्दल किती कळकळ वाटत होती हें स्पष्टपणें दिसून येतें. हें भाषण राज्यारोहण समारंभाच्या हकीकतींत दिलें आहे.

सन १९२६ सालीं पो. ए. सि. एच्. एफ्. बॉल भोरास आले होते. तेव्हां त्यांनीं शाळेस दिलेल्या भेटीच्या वेळीं स्त्रीशिक्षणाबाबत श्री. सौ.

राणीसाहेबांना किती आस्था आहे ह्याबद्दल शाळाधिकारी यांच्या शाळाखात्याच्या अहवालास उत्तर देताना त्यांनी पुढील उद्गार काढले —

It is a matter of great satisfaction to see that the Rani Saheb has been taking a keen interest in and personally controls female education and is exercising supervision over it

शिक्षणाप्रमाणे त्यांना ग्रंथवाचनाचा फारच नाद होता त्यांनी भारत, भागवत, रामायण इत्यादि पुराणे वाचली होती तसेच ग्रंथप्रकाशनाचे कामी सहानुभूति दाखवून त्यांनी सक्रिय मदत केली भारत, रामायण इत्यादि संस्कृत ग्रंथांची मराठी भाषांतरे प्रसिद्ध करणाऱ्या पुणे येथील चिपळूणकर आणि मंडळींनी 'रामायणसमालोचना' या ग्रंथाचा खंड दुसरा भोर येथे समारंभपूर्वक ता २७ डिसेंबर १९२७ रोजी त्यांना अर्पण केला प्रकाशकांनी पुस्तकांत श्रीमंत सौ राणीसाहेबांचे संक्षिप्त चरित्र देऊन त्यांचा योग्य गौरव केला या ग्रंथप्रकाशनास रु २००० पर्यंत मदत श्रीमंत सौ राणीसाहेब यांच्या इच्छेवरून श्रीमंत राजेसाहेबांनी दिली

यानंतर या चिपळूणकर आणि मंडळींनी नभखिंडीच्या श्रीमंत डॉवेजर राणीसाहेब यांना पुणे येथे ता २३ सप्टेंबर १९२८ रोजी मानपत्र अर्पण केले या समारंभाचे अध्यक्षस्थान श्री सौ राणीसाहेब यांनी स्वीकारले होते वाई येथील कन्याशाळेचा उद्घाटनसमारंभ ता ३ जून १९२५ रोजी झाला त्या समारंभाच्या श्री राणीसाहेब अध्यक्ष होत्या त्यांचे हस्ते मुलींना मिठाई व बक्षिसे वाटण्यात आली त्या वेळी त्यांनी रु १०० देणगी म्हणून दिले

याखेरीज अनेक सार्वजनिक समारंभांत श्री सौ राणीसाहेब या मोठ्या उत्साहाने भाग घेत असत भोर येथे सन १९२३ साली कॉलऱ्याची साथ उद्भवली स्त्रियांची एक सभा श्री सौ राणीसाहेब यांचे अध्यक्षतेखाली १३ ऑगस्ट सन १९२३ रोजी भोर हायस्कूलचे दिवाणखान्यात भरविण्यात आली साथीच्या निवारणार्थ गावातील लोकांनी स्वच्छतेने वागावे, शिळेपाके खाऊ नये, पाणी उकळून प्यावे इत्यादि साथप्रतिबंधक माहिती लोकांना पुरविण्यात आली त्या वेळी भोरचे चीफ मेडिकल ऑफिसर यांनी जमलेल्या स्त्रीसमुदायास साथप्रतिबंधक उपाय समजावून सांगितले

बडोद्याच्या हर हायनेस श्री सौ महाराणीसाहेब यानी श्रीमत राजेसाहेब व श्री सौ राणीसाहेब याच्या निमत्रणावरून ता २८ माहे सप्टेंबर १९२५ रोजीं भोरास भेट दिली त्याचे सन्मानार्थ भोजनोत्तर दुपारी ३ वाजता दरबार हॉलमध्ये हळदीकुकवाचा समारभ झाला या समारभास भोर येथील दरकदार, ऑफिसर व प्रतिष्ठित गृहस्थ याच्या स्त्रियाना बोलाविले होते या प्रसगी श्री सौ राणीसाहेब यानी समयोचित भाषण करून हर हायनेस श्री सौ महाराणीसाहेब बडोदे याचे आभार मानिले हा हळदीकुकवाचा समारभ मोठ्या थाटाचा झाला श्री सौ राणीसाहेब यानी पुढीलप्रमाणे भाषण केले —

" हर हायनेस महाराणीसाहेब,

आज आपण प्रवासाची दगदग सोसून आमच्या या लहानशा सस्थानच्या राजधानीस भेट दिली, याबद्दल आम्हाला किती आनद होत आहे हे शब्दानी व्यक्त करून दाखविता येत नाही या ठिकाणी आपणास पाहण्यास असे काहीच नाही गाव अगदी लहान, सस्थानात मुख्यत्वेकरून मावळे लोकाचीच वस्ती, प्रदेश डोगरी, अशा या सस्थानात पाहण्यासारखे काय असणार ? तथापि आमच्या विनतीस मान देऊन आपण येथें आला यावरून आमच्यावरील व आमच्या सस्थानावरील आपले प्रेम स्पष्ट दिसून आले आहे शिवाय मराठी साम्राज्याचे आद्य सस्थापक छत्रपति श्रीशिवाजीमहाराज यानी ज्या मावळे लोकाचे मदतीने मराठी साम्राज्याचे तोरण या प्रदेशात प्रथम तोरणा किल्ल्यावर बाधिले त्या मावळ्याचा हा डोगरी प्रदेश पाहण्याची आपणास इच्छा होणे हेहि अगदी साहजिकच आहे तो तोरणा किल्ला व त्याचे जवळचा राजगड किल्ला येथून चारपाच कोसातच आहेत

महाराणीसाहेब, आपण युरोप, अमेरिका इत्यादि खडात प्रवास करून तिकडील स्त्रियाची व आपल्या हिंदुस्थानातील स्त्रियाची स्थिति सूक्ष्म दृष्टीने अवलोकन करून आपल्या हिंदी स्त्रियाचे उन्नतीकरिता आपण किती परिश्रम घेत आहा हे आपल्या *Position of Indian Women* या पुस्तकावरून सर्वाचे नजरेस आलेलें आहे स्त्रीशिक्षणप्रसाराचे कामी बडोदे सस्थानने आघाडी मारिली आहे आमचे सस्थान स्त्रीशिक्षणाचे बाबतीत अद्याप बरेच मागे आहे परतु हल्ली या कामी थोडथोडी प्रगति होत आहे व थोड्याच अवधींत स्त्री-शिक्षणाचा प्रसार बराच होईल अशी उमेद वाटत आहे

शेवटी आपले पुन्हा एकवार आभार मानून मी आपले भाषण पुरे करते ''

वरील प्रमुख समारभाखेरीज, येथें गव्हर्नर, पो एजट, कमिशनर वगैरे सरकारी अधिकारी आपल्या कुटुबासह भोरास येत त्या वेळीं श्री सौ राणीसाहेब त्याच्या स्त्रियाचे यथोचित स्वागत करून त्याचे कुशल विचारीत व त्याना पानसुपारी करीत तसेच, पुणे येथें गव्हर्मेंट हाउसवर ॲट होम, गार्डन पार्ट्या वगैरे समारभाना श्रीमताचेबरोबर त्या हजर राहत असत पुणे येथील सेवासदनमध्ये ता १५ जानेवारी सन १९२४ रोजीं श्री सौ राणी-साहेब याचे अध्यक्षतेखाली हळदीकुकवाचा समारभ झाला तसेच याच सस्थेंत ता १३ जून सन१९२५ रोजी शिशु व आरोग्यसप्ताहाचे उद्घाटनसमारभास व इतर काहीं समारभाचे वेळीं त्या श्रीमत राजेसाहेब याचेबरोबर हजर राहिल्या होत्या निरनिराळ्या सार्वजनिक समारभास त्या जात असत एकदरीने पाहता त्याना समाजात मिळून मिसळून वागण्याची फार हौस होती

## अर्धांगवाताचा आजार

श्रीमत राजकुमारी पद्मावतीराजे याच्या ता ४ जानेवारी १९२७ रोजी झालेल्या जन्मानतर त्या बाळतपणातच काही दिवसानी श्री सौ राणीसाहेब याना अर्धांगवाताचा विकार झाला त्यामुळे त्या ४-५ महिने अथरुणास खिळून होत्या भोर येथील नामाकित वैद्य श्रीधरशास्त्री गोखले हे त्या वेळी राजवैद्य होते त्याच्या परिश्रमाने व योग्य औषधोपचाराने श्रीमत राणीसाहेब याना या बिकट दुखण्यातून बराच गुण आला त्या पूर्ववत हिंडू फिरू लागल्या, परतु त्याच्या डाव्या हातापायावर वाताचा झालेला परिणाम पूर्णपणे नाहीसा झाला नाहीं यानतर त्या जरी श्रीमताच्याबरोबर स्वारीत प्रवासास जात असत तरी सार्वजनिक समारभास त्या फारशा जात नसत या दुखण्यानतर त्याची २-३ वर्षे चागली गेलीं

ग्वाल्हेर सस्थानच्या हर हायनेस रीजट महाराणीसाहेब या ता ७ जून सन १९२७ रोजीं भाटघर धरण पाहण्यास आल्या होत्या त्या वेळीं श्रीमत राजेसाहेब यानीं त्याची तेथें जाऊन भेट घेतली त्याना श्री सौ राणीसाहेब या भोर येथें असून त्या आजारी असल्याचे समजून आल्यामुळे हर हायनेस

महाराणीसाहेब या त्याच दिवशी भोरास आल्या व श्री सौ राणीसाहेब याची गाठ घेऊन त्यानी त्याच्या तब्बेतीबद्दल विचारपूस केली

श्री सौ राणीसाहेब याची प्रथमपासूनच धार्मिक कृत्याकडे प्रवृत्ति होती व त्या काही व्रतवैकल्येहि करीत असत त्याना अर्धागाचा विकार झाल्यावरहि त्याची धार्मिक वृत्ति अधिक स्पष्टपणे दृष्टोत्पत्तीस येऊ लागली हा विकार झाल्यापासून आता आपण फार दिवस जगणार नाही अशी त्याची मनोदेवता त्याना सागू लागली व जे उर्वरित आयुष्य आपणास या जगात काढावयाचे ते भक्तिभावाने परमेश्वराची सेवा करण्यात खर्च करावे असे त्याचे मनाने घेतले व पुढील ३ वर्षांत त्याच्या आटोक्यात असलेली सर्व व्रतवैकल्ये त्यानी भक्तिपूर्वक केलीं व त्याकरिता स्वत चे खासगीकडील पैसेहि जास्त प्रमाणात खर्च केले मूळच्या प्रेमळ स्वभावात अगीं आलेल्या पगूपणाने विशेषच भर घातली व आपल्या नोकरा-चाकराना प्रेमाने वागविण्यात, त्याना बक्षिसे देऊन खूष करण्यात त्या भूषण मानू लागल्या कै रा श्रीधरशास्त्री गोखले वैद्य याच्या औषधानें त्या अर्धांगवाताच्या दुखण्यातून बऱ्या झाल्या होत्या त्याच्याविषयी श्री राणीसाहेब याच्या ठिकाणी फार श्रद्धा होती श्रीधरशास्त्री हे सन १९२८ मध्ये आजारी झाल्यावर त्याचे समाचारास वरचेवर जाऊन त्याच्याविषयी त्या आपली सहानुभूति व्यक्त करीत पुढें ता १ सप्टेंबर १९२८ रोजी ते निधन पावले, तेव्हा श्री सौ राणीसाहेब याना अतिशय वाईट वाटले

## श्रीमंत राजकुमार बापूसाहेब यांचा व्रतबंध

श्रीमत राजकुमार बापुसाहेब याचे वय व्रतबध करण्यास योग्य झाल्यावर त्याचा व्रतबध श्री सौ राणीसाहेब याचे हौसेप्रमाणे भोर येथें ता २२ माहे फेब्रुवारी सन १९३१ मध्ये मोठ्या थाटाने साजरा करण्यात आला या समारभाकरिता बरेचसे राजेरजवाडे, सस्थानिक, जहागीरदार, इनामदार, विद्वान शास्त्रीपडित व इतर सन्माननीय ओळखीचे गृहस्थ याना निमत्रणे पाठविली होती त्याप्रमाणे पुष्कळ सरदार, इनामदार, शास्त्री, पडित वगैरे मडळी समारभास मुद्दाम आली होती श्री राजे शामराज राजवत बहादुर हे श्री सौ जान्हवीबाई व मुले याचेसह आले होते पुण्याहून सरदार विंचुरकर वगैरे आले होते सर्वांचा

आदरसत्कार ज्याच्या त्याच्या मानाप्रमाणे यथायोग्य करण्यात आला समारभ तीन दिवस मोठ्या थाटाचा झाला गावातील सर्व ब्राह्मणमडळीस तीन दिवस मुक्तद्वार होते एक दिवस स्वार, शिबदी वगैरे सर्व मराठे व अन्य जातींच्या लोकाना बुंदीच्या लाडवाचे भोजन घातले ता २१ रोजीं स्वार, शिबदी, बॅड वगैरे सर्व लवाजम्यानिशीं अक्षतसभारभ झाला दुसरे दिवशी सकाळी ९ वाजता मुजीचा समारभ झाला त्या वेळी झालेल्या पानसुपारीच्या दरबारास सर्व पाहुणे थाटमाट करून हजर राहिले होते सर्वानी श्रीमताना अहेर केले मुज लागल्यानतर पानसुपारी होऊन दुपारी श्रीराम-मटपात पचपक्वान्नाची मेजवानी सर्व पाहुण्याना देण्यात आली सायकाळी भिक्षावळीची मिरवणुक अपूर्व थाटाची निघाली जिकडे तिकडे विजेच्या रोपणाईमुळे उजेडाचा चकचकाट झाला होता श्रीमत राजेसाहेब व श्री सौ राणीसाहेब पायी चालत होते सर्वाच्या पुढें दारुकाम सोडण्यात येत होते एकदरीत थाटमाट राजवैभवास साजेसा होता या सर्व समारभात एका गोष्टीखेरीज कोणत्याहि गोष्टीचे वैगुण्य नव्हते ती गोष्ट म्हणजे भोर हे आडवळणी गाव असल्यामुळे या समारभास सस्थानिक येऊ शकले नाहीत म्हणून श्रीमत सौ राणीसाहेब यानीं श्रीमत रावसाहेब याची मुज पुण्यास करावयाची असे तेव्हापासून ठरवून ठेविले परतु सर्वच गोष्टी मनुष्याच्या हेतुप्रमाणे होऊ शकल्या अगर त्या त्यास स्वत च्या इच्छेनुसार पार पाडता येऊ शकल्या तर मनुष्यासच परमेश्वर म्हणता येईल ! परतु तसे होऊ शकत नाही ! विधिघटना निराळीच असते ! ‘मनसा चिंतित कार्यं दैवमन्यत्र चिंतयेत्’ हीच उक्ति बहुधा व्यवहारात खरी ठरते श्री सौ राणीसाहेब याच्या रावसाहेबाच्या व्रतबधाबद्दलच्या इच्छेचे असेच झाले त्याची इच्छा पुरी होण्यापूर्वींच, इतकेच नव्हे तर श्री बापूसाहेब याच्या मुजीनतर त्याना लवकरच हा मर्त्यलोक सोडून जावे लागेल ही कोणासहि कल्पना नव्हती व त्याना तर नव्हतीच नव्हती

## श्री सौ. राणीसाहेबाचे शोचनीय निधन

श्रीमत बापूसाहेबाच्या मुजीनतर लवकरच एप्रिल महिन्यात श्रीमत राजेसाहेब याच्याबरोबर लेडी आयर्विन या विलायतेस जाणार असल्यामुळे त्याच्या भेटीकरिता श्री सौ राणीसाहेब मुबईस गेल्या तेथील काम सपल्यावर त्या

चित्राक १५०

राजकुटुबातील मडळी ( सन १९३० )



मागे उभे – १ श्री युवराज भाऊसाहेब  २ श्री सा माईसाहेब

मधली राग'—१ रा कु बापूसाहेब, २ श्री राजेसाहेब, ३ रा कु पद्मावतीराजे, ४ श्री सा राणीसाहेब, ५ रा कु रावसाहेब.

जमिनीवर —रा कु विमलाराजे

एकट्याच ता १८ एप्रिल १९३१ रोजी मुबईहून निघून महाबळेश्वर येथें गेल्या श्रीमत राजेसाहेबहि २।३ दिवसानी महाबळेश्वरास जाणार होते महाबळेश्वर येथें ता १९ रोजीं सकाळी श्री सौ राणीसाहेब फिरावयास गेल्या असताना त्याना अर्धांगवाताचा जबरदस्त झटका आला, इतका की त्या वेळीं त्या ज्या बेसावध झाल्या त्या पुन्हा शुद्धीवर आल्याच नाहींत ही बातमी श्रीमत राजेसाहेबाना मुबई येथें तारेने ताबडतोब कळविण्यात आली तेथून ते ताबडतोब नामाकित डॉक्टराना घेऊन आले डॉक्टर-वैद्याचे मानवी आटोक्यात असलेले सर्व उपचार करण्यात आले परतु कोणालाहि यश येऊ नये अशी विधिघटना होती दैवापुढे कोण काय करणार ! ता २२ एप्रिल रोजी त्याचा आत्मा नश्वर देह सोडून सर्व आप्तबाधवाना दु खसागरात लोटून निघून गेला श्रीमत राजेसाहेबाना त्याच्या निधनाने अत्यत दु ख झालें त्याचे वर्णन करता येणे अशक्य आहे त्याच्या निधनाने राजकुटुबातील मडळीचे अपरिमित नुकसान झालेंच, परतु भोर प्रजाजनाचेंहि फार नुकसान झालें त्याचे आपल्या प्रजाजनावर अत्यत प्रेम होते सस्थानातील स्त्रियाच्या उन्नती-करिता व शिक्षणाकरिता त्यानीं अत्यत परिश्रम घेतले मृत्युसमयीं त्याचे वय अवघे ३५ वर्षाचे होते

त्याच्या पश्चात् श्रीमत राजकुमाराना शिक्षणाकरिता पुण्यास नेहमी राहावे लागत असल्यामुळे श्रीमत राजेसाहेबाचा मुक्काम जेव्हा भोरास असतो व श्रीमत राजेसाहेब जेव्हा दिल्ली वगैरे ठिकाणी प्रवासास जातात, त्या वेळी श्री बाबा पुराणिक व श्री सौ अम्मा हे दोघे वरचेवर पुणे येथील लक्ष्मी-विलास बगल्यात येऊन श्रीमत राजकुमाराची कोणत्याहि प्रकारची हयगय होऊ देत नाहीत म्हणून श्रीमत राजेसाहेबाना भोरास राहणे अगर दूरचे प्रवासास जाणे काळजीचे वाटत नाही

श्री सौ राणीसाहेबाच्या निधनानतर त्याचे स्मारक राहावे म्हणून भोर कायदेमडळाने निरा नदीवर नवीन बाधलेल्या पुलास त्याचे नाव द्यावे अशी श्रीमत राजेसाहेबाना विनति केली व त्या गोष्टीस श्रीमतानी आपली समति दिली ही हकीकत पुढें 'शोचनीय गोष्टी' या सदरात दिली आहे

श्रीमत सौ राणीसाहेब याच्या निधनामुळे आपली सहधर्मचारिणी अकालीं सोडून गेल्याकारणाने श्रीमत राजेसाहेबाच्या मनावर फारच परिणाम झाला श्रीमत राजेसाहेबाचे वय त्या वेळी ५२ वर्षांचे होते त्या वेळीं त्यानीं मनात आणले असते तर त्याचे पुन्हा लग्न सहज होऊ शकले असते असे म्हणण्याचे कारण एक तर ते श्रीमत आहेत नुसतेच श्रीमत नव्हे तर एका सस्थानचे अधिपति आहेत तेव्हा अनेक वधूपिते आपल्या कन्याना त्याना अर्पण करून त्याना राज्ञिपदाची प्राप्ति करून देण्यात भूपण मानण्यास तयार होणे सहज शक्य होते आणि आश्चर्य करण्यासारखी गोष्ट ही की, या गोष्टीचे प्रत्यतर श्री सौ राणीसाहेब याच्या निधनानतर अगदी अल्पावधीत, दहा दिवस पूर्ण होण्यापूर्वींच आले राज्ञिपदप्राप्तीच्या आमिषानें मूढ होणाऱ्या या वधूपित्याची कींव करावी कीं, त्या राज्ञिपदावर अधिष्ठित होणाऱ्या अजाण बालिकाची कींव करावी याचाच श्रीमत राजेसाहेब याना उलगडा होईना ! धन्य असो अशा वधूपित्याची ! अर्थातच अशा सर्व वधूपित्याना श्रीमतानीं स्पष्ट नकार दिला हे सागणे नकोच, इतकेच नव्हे तर श्री सौ राणीसाहेबावरील उत्कट प्रेमामुळे व पुन्हा लग्न केल्यास सापत्नभाव उत्पन्न होऊन भाडणे उत्पन्न होतील व श्री सौ. राणीसाहेबाच्या मुलाना जाच होऊन त्याची सर्व प्रकारे आबाळ होईल, या भीतीने पुन्हा लग्न करण्याचा विचार सुद्धा त्यानी मनात आणला नाहीं आणि लहान राजकुमाराच्या शिक्षणसगोपनाकडे लक्ष देऊन त्याच्याकडे लक्ष ठेवून राणीसाहेबाच्या वियोगाचे दु ख स्वार्थत्यागपूर्वक सहन करावयाचे असे त्यानीं ठरविले

## श्रीमंत राजेसाहेबांचा आजार

वरीलप्रमाणे लग्नाचा विचार बाजूस सारून वियोगदु ख सहन करण्याचे श्रीमत राजेसाहेब यानीं ठरविले खरे, परतु श्री सौ राणीसाहेबाचा सुखमय सहवास एकदम नाहीसा झाल्याने त्याच्या मनावर बराच परिणाम झाला व त्याच्या शरीरप्रकृतीत अशक्तपणा आल्याने पुढे ऑगस्ट महिन्यात त्याना इन्फ्ल्यूएझाचा ताप येऊ लागला काही दिवसानीं तो थाबल्यासारखाहि वाटला, परतु हे थाबणे वादळापूर्वीची शातताच ठरले पुन्हा बारीक ताप येऊ लागून खोकल्याने आपला शिरकाव केला मुम्बई येथील नामाकित डॉक्टरला तब्बेत

**चित्रांक १५१–श्री रा कु बापूसाहेब यांच्या व्रतबधास आलेल्या पाहुणेमडळींचा फोटो.**



मागची रांग —१ श्री बापूसाहेब विचूरकर, २ श्री वा दि कुबेर, ३ श्री युवराज ४ श्री र.जे ग्रामराज, ५ श्री नानासाहेब चादवडकर,
६ श्री भय्यासाहेब पळशीकर, ७ बा गो पुराणीक, ८ शि बा पुराणीक
खुर्चीवर —१ कु त्रिवेणी पुराणीक २ श्री सौ ताईसाहेब विचूरकर, ३ श्री सौ माईसाहेब ४ श्री सौ जान्हवीबाई, ५ श्री गजेसाहेब,
६ रा कु बापूसाहेब, ७ श्री सौ राणीसाहेब, ८ श्री सौ चादवडकर (नानासाहेबांचे कुटुंब), ९ श्री सौ शांताबाई पळशीकर,
१० श्री. सौ भागिरथीबाई पुराणीक, ११ श्री सौ पुराणीक (बाबूरावांचे कुटुंब)

[स. पा. ७८७

दाखवून औषधोपचार सुरू झाले परन्तु गुण न पडता उलट दुखण्याने बरेच उग्र स्वरूप धारण केले आयुर्वेदाचार्य पुरुषोत्तम गणेश नानल याना नतर प्रकृति दाखवून त्याचे औषध सुरू केले श्रीरामचद्राच्या कृपेने, श्रीमताच्या आयुष्याची दोरी बळकट असल्याने व प्रजाजनाच्या भाग्याने नानलाच्या हातास गुण आला ताप व खोकला पूर्णपणे लवकरच नाहींसा झाला परन्तु अशक्तता मात्र फार दिवस रेगाळत राहिली त्याकरिता चिंचवडच्या कोरड्या हवेत सुमारें दोन महिने व पावसाळ्यात सोलापूरचे कोरड्या हवेत १५ दिवस हवापालट होण्याकरिता घालविले तेथील कोरड्या हवेपासून चागलाच फायदा होऊन श्रीमताच्या तब्बेतीत अपेक्षित सुधारणा घडून येऊन त्याची तब्बेत पुन्हा पूर्ववत बरी झाली श्रीमताच्या आजारीपणात भोरचे चीफ मेडिकल ऑफिसर डॉ भालचद्र शकर जोशी, एम बी बी एस , यानीं श्रीमत राजेसाहेब याना लवकर आराम वाटावा म्हणून अत्यत परिश्रम घेतले त्याची हल्लीं दरबार सर्जन म्हणून नेमणूक करण्यात येऊन त्याना श्रीमत राजेसाहेबाच्या खास तैनातींत घेण्यात आल आहे

या आजारपणात श्रीमत राजेसाहेब याचे समाचाराकरिता हिज हायनेस श्रीमत राजासाहेब सागली, रामदुर्ग, जमखिंडी, फलटण, या सस्थानाचे अधिपति, पुण्याचे कलेक्टर मि मॅक्लॅक्लन, व दुसरे अनेक ओळखीचे सद्गृहस्थ आले होते त्याचप्रमाणे बऱ्याच सार्वजनिक सस्था व सस्थानातील तालुक्यातील सभा याचेकडून श्रीमत राजेसाहेबाना या आजारीपणातून लवकर बरे वाटावे म्हणून अभीष्टचिंतनपर ठराव पास करून त्याच्याकडे पाठविण्यात आले होते

पुढे भोर येथें ता १८ ऑगस्ट १९३२ रोजीं श्रीमत राजेसाहेब याचा दशमवार्षिक राज्यारोहण-दिन मोठ्या उत्साहाने व आनदाने साजरा करण्यात आला त्या वेळीं ज्या भिषग्वर्याच्या आयुर्वेदाचे यथायोग्य ज्ञानाचा व परिश्रमाचा फायदा मिळून श्रीमत राजेसाहेबाना आरोग्य प्राप्त झाले त्या आयुर्वेदाचार्य पु ग नानलशास्त्री याना वरील समारभाकरिता खास निमत्रण देऊन बोलविण्यात आले व त्याच्या गुणाचा, योग्य पारितोषिक देऊन श्रीमत राजेसाहेब यानीं जाहीर रीतीने गौरव केला.

## श्रीमंत राजकुमार नारायणराव रावसाहेब यांचा व्रतबंध

श्रीमत राजकुमार बापूसाहेब याचा व्रतबध भोर येथें झाला त्या वेळी बऱ्याच राजेरजवाड्याना निमत्रणे करण्यात आली होतीं परन्तु भोर आडवळणी असल्यामुळे पुष्कळशी मडळी भोरला येऊ शकली नाहीत तेंव्हा सर्व मडळींनी श्रीमत रावसाहेब याचे उपनयनास यावे अशी श्रो सौ राणीसाहेब याची फार इच्छा होती ती पुरी करण्याचे हेतूने रावसाहेब याचा व्रतबध पुण्यासारख्या मध्यवर्ति ठिकाणी करावयाचा असे श्रीमत राजेसाहेबानी आपल्या मनाशी ठरवून ठेविले होते परतु वर वर्णन केल्याप्रमाणे श्री सौ राणीसाहेब ता २२ एप्रिल १९३१ रोजी निधन पावल्यामुळे ही त्याची इच्छा अपुरीच राहिली ती त्याची इच्छा त्याच्या हयातीत जरी नाही तरी त्याच्या पश्चात् पुरी करावी अशा सद्हेतूने श्रीमत राजेसाहेबानी रावसाहेबाचा व्रतबध पुणे येथें करण्याचे ठरविले त्याप्रमाणे ता ९ जून १९३२ रोजी हा समारभ पुणे येथे शुक्रवार पेठेतील पतमचिव याचे वाड्यात मोठ्या थाटाने करण्यात आला बरीच पाहुणे मडळी या समारभास आली होती सर्वाची उतरण्याची सोय उत्तम प्रकारे करण्यात आली या समारभास हिज हायनेस श्रीमत राजासाहेब सागली, श्रीमत रीजट राणीसाहेब कुरुदवाड ( सीनियर ), श्रीमत बालराजे कुरुदवाड ( सीनियर ), फलटण, जत, कुरुदवाट ( ज्यूनियर ), अक्कलकोट या सस्थानाचे अधिपति, हैद्राबादचे श्रीमत राजे शामराज व श्री सौ जान्हवीबाई, श्रीमत भय्यासाहेब पळशीकर, इदूर, इत्यादि राजेरजवाडे व युरोपिअन अधिकारी मि डी मॅक्क्रन्, पो एजट, मि एच बी क्लेटन, कमिशनर मध्यभाग, व मिसेस क्लेटन, मि सी जी फ्रिक, सेक्रेटरी टू गव्हर्मेन्ट, इत्यादि आले होते याखेरीज पुण्यातील बहुतेक सर्व फर्स्ट क्लास व सेकड क्लास सरदार आले होते सर्व पाहुण्याना ता १० रोजी थाटाची मेजवानी देण्यात आली. उपनयनसमारम्भानिमित्त सर्व युरोपियन, पारशी, मुसलमान वगैरे ओळखीच्या अधिकाऱ्याना व सद्गृहस्थाना लक्ष्मीविलास बगल्यात ता २७ रोजी गार्डन पार्टी देण्यात आली

## श्रीमंत राजेसाहेबांची अंतर्गळाची शस्त्रक्रिया व तदनुषंगिक आजार

श्रीमत राजेसाहेबाच्या परमपूज्य मातोश्री कै श्री सौ जिजीसाहब यानीं सन १९१९ च्या फेब्रुवारी महिन्यात हिमालयातील बद्रीकेदार व बद्री-

नारायण या हिंदुस्थानात प्रमुख गणलेल्या महास्थानाची यात्रा केली या यात्रेच्या वेळी श्री सौ जिजीसाहेब याचेबरोबर जाण्यास श्रीमत राजेसाहेब यानी श्रीमत रावसाहेबाची परवानगीहि मिळविलो परतु यात्रेस निघण्यापूर्वी राजेसाहेबाची प्रकृति अतर्गळाचे विकाराने बिघडली व डॉक्टरच्या सल्ल्यावरून या महायात्रेस जाण्याचा बेत त्याना रहित करावा लागला मुबई येथील प्रसिद्ध डॉक्टर गोपाळराव देशमुख यानीं श्रीमताना ट्रस (अतर्गळप्रतिबधक पट्टा) नित्य वापरण्याचा सल्ला दिला तेव्हापासून हा विकार त्याचे मागे लागला

तेव्हापासून श्रीमत राजेसाहेब ट्रस वापरीत असत, त्यामुळे अतर्गळाचा जोरहि विशेष झाला नाही अगर त्रासहि वाढला नाही ही स्थिति साधारणपणे १७-१८ वर्षे व्यवस्थितपणे चालली वयपरत्वे हा विकार वाढत गेल्यामुळे चालताना, जिना चढता उतरताना, त्याचा उजवा पाय दुखू लागला तेव्हा पुणे येथील प्रसिद्ध डॉक्टर आर एच भडकमकर, एम् ए , एम् डी , याना प्रकृति दाखविल्यावर अतर्गळाचा विकार उजवे बाजूस जास्त असून त्यावर औषधोपचाराचा काहीहि उपयोग होणार नाही, शस्त्रक्रिया केली पाहिजे, असा त्याचा सल्ला पडला

ता. ८ फेब्रुवारी सन १९३८ या दिवशी सकाळी त्याचे नेतृत्वाखालीं पुणे येथील शस्त्रकर्मनैपुण्याबद्दल प्रसिद्ध असलेले श्रीमत राजेसाहेबाचे महाध्यायी डॉ व्ही बी गोखले, एम् एस एफ आर सी एस , यानी अतर्गळाची शस्त्रक्रिया यशस्वीपणे केली शस्त्रक्रिया झाल्यावर ८-१० दिवस सुधारणेच्या दिशेने प्रगतिपर गेले १० वे दिवशी जखमेचे टाके तोडले त्या वेळी जखम पूर्णपणे भरून आल्याचे दिसून आले परतु यानतर ३-४ दिवसातच ही स्थिति एकदम पालटली व श्रीमतास रोज १०३°-१०४° अशपर्यंत ताप येऊ लागला तब्बेतीस अत्यत अशक्तपणा येऊन प्रकृति चिताजनक झाली सर्वांच्या तोंडचे पाणी पळाले ही स्थिति जवळ जवळ एक महिनाभर चालू होती डॉ भडकमकर रोज येऊन तब्बेत पाहून जात व त्याचाच औषधोपचार चालू होता Auto Vaccine तयार करून त्याची सूचिकाभरणे ( इन्जेक्शन्स ) श्रीमताना दिली असता त्याना लवकर उतार पडेल असे डॉक्टरमहाशयाचे मत झाल्यावरून त्याप्रमाणे लस तयार करून आणवली व इन्जेक्शन्स सुरू केली २-३ इन्जेक्शन्स

होताच योग्य तो सुपरिणाम होऊन ताप हटू लागला व रोगाचे पाऊल मागे पडू लागले १५ दिवसानीं औषधाचा परिणाम चागलाच दिसून आला ताप कमी पडल्यावर तब्बेतींत हळुहळू सुधारणा घडून आली एकदर इन्जेक्शन्स १०-१२ द्यावीं लागलीं ७-८ इन्जेक्शन्स होईपर्यंत मुक्काम पुणे येथेंच ठेवावा लागला या अवधींत ते चागले हिंडू फिरू लागले याहि दुखण्यात प्रथमपासून डॉ भालचद्र शकर जोशी, एम् बी बी एस , दरबार-सर्जन, हे श्रीमताच्या सतत शुश्रूषेत होते त्यानीं श्रीमताना लवकर आराम वाटावा म्हणून स्वत च्या प्रकृतीकडेहि दुर्लक्ष करून अहोरात्र परिश्रम घेतले या आजारीपणात श्रीमताचे स्नेही श्री रा रा दादासाहेब कुमठेकर हे दररोज भेटीस येत असत त्याच्या सल्ल्याचा श्रीमताना फार उपयोग झाला

या आजारीपणात श्रीमत राजेसाहेब फलटण, श्रीमत राजेसाहेब जत, हिज हायनेस महाराजासाहेब कोल्हापूर, श्रीमत राजेसाहेब जमखिंडी, श्री न. चिं केळकर, श्री सरदार विंचूरकर, व इतर अनेक ओळखींचे सद्गृहस्थ श्रीमत राजेसाहेबाच्या समाचारास आले काहीं वेळीं श्रीमत राजेसाहेब याची तब्बेत बरी नसल्यामुळे व गाठीभेटी घेऊन त्रास घेऊ नये, असा डॉक्टराचा सल्ला असल्यामुळे बरेच सद्गृहस्थ समाचारास आले असता श्रीमताची भेट होऊ शकली नाही श्रीमताना बरे वाटल्यावर कोण कोण लोक समाचारास आले होते, त्याची नावे श्रीमताना कळविलीं तेव्हा ज्याची भेट श्रीमत राजेसाहेब घेऊ शकले नाहींत व ज्यानीं आपुलकीने समाचारास येऊन आपली सहानुभूति व्यक्त केली त्या प्रत्येकास पत्रे पाठवून तब्बेतीस बरें वाटत असल्याचे कळवून त्याचे आभार मानण्यात आले

तब्बेतीस चागला आराम वाटल्यावर डॉक्टर याचे सल्ल्यावरून श्रीमत राजेसाहेब ता २१ एप्रिल १९३८ रोजीं सकाळीं भोरास आले श्रीमत राजेसाहेब दीर्घकालीन व चिंताजनक दुखण्यातून बरे होऊन तीन साडेतीन महिन्यानीं भोरास आले, तेव्हा सर्व प्रजाजनाना अत्यत आनद झाला श्रीमताच्या दर्शनाकरिता सर्वजण अत्यत उत्सुक झाले होते सर्व प्रजाजनानी नगरप्रवेशसमयीं नगरसीमेवर हजर राहून श्रीमत राजेसाहेबाचे अपूर्व स्वागत केले त्या वेळीं गार्ड ऑफ ऑनरची व नऊ तोफाची सलामी देण्यात आली, व नतर

चित्राक १५२



श्री युवराज भाऊसाहेब व श्री सौ माईसाहेब ( लग्नातील फोटो )

[स पा ७९८

श्रीमताना मिरवणुकीने राजवाड्यात आणले घरोघर गुढ्या उभारून रस्ते ध्वज-पताकानीं सुशोभित करून नागरिकानीं श्री राजेसाहेबाबद्दल वाटत असलेले प्रेम व आनद व्यक्त केला राजवाड्यात श्रीमतानी श्रीरामचद्राचे दर्शन घेतल्यावर सर्वांनी स्वागत केल्याबद्दल रा ब दिवाणसाहेब यानीं राजेसाहेबाचे वतीने जमलेल्या प्रजाजनाचे आभार मानले श्रीमतानीं वैदिक ब्राम्हणाना सभावना दिली सर्वांना पेढे, पानसुपारी वाटल्यावर सर्वजण आनदाने घरीं परतले भोर येथें ८ दिवस मुक्काम करून नतर श्रीमत राजेसाहेब महाबळेश्वर येथें थड हवेत राहण्यास गेले

या आजारीपणात डॉ भडकमकर यानीं औपधोपचाराचे बाबतींत विशेष काळजीपूर्वक घेतलेल्या परिश्रमाचा मोबदला म्हणून रु १००० पारितोपिक देऊन त्याचा गौरव केला डॉ गोखले यानी ऑपरेशन उत्तम प्रकारे केले म्हणून त्याच्या फीशिवाय रु ३०० बक्षिस दिले त्याचप्रमाणे डॉ भा श जोशी हे श्रीमताच्या खास तैनातींत आहेत व ते सस्थानचे नोकर आहेत, तथापि, एकदर नोकरींतील त्याची कामगिरी लक्षात घेऊन श्रीमत राजेसाहेब यानी त्याना रु १००० देऊन त्याचाहि गौरव केला

## श्रीमंत युवराज सदाशिवराव ऊर्फ भाऊसाहेब

श्रीमत राजेसाहेब याचे प्रथम कुटुम्बापासून झालेले चिरजीव युवराज श्रीमन्त भाऊसाहेब याची हकीकत प्रथमखडात देण्यात आलीच आहे त्याचे बहुतेक सर्व शिक्षण भोर येथें भोर हायस्कूलमध्येच झाले सन १९२४ च्या मे महिन्यात ते मुम्बई युनिव्हर्सिटीची प्रवेशपरीक्षा पास झाले उच्च शिक्षणाकरिता त्यानी पुणे येथील डेक्कन कॉलेजात प्रवेश केला व कॉलेज शिक्षण घेऊन ते सन १९३० साली मुबई युनिव्हार्सिटीचे पदवीधर झाले तसेच सस्कृत विषयाच्या काव्यप्रथमा व काव्यद्वितीया (कलकत्ता येथील) याहि परीक्षा ते उत्तीर्ण झाले आहेत त्याची राहणी अत्यत साधी, स्वभाव मनमिळाऊ आहे श्रीमत राजेसाहेब याचेबद्दल त्याचे ठिकाणी अत्यत आदर व प्रेम वसत आहे त्याची धर्मावर फार श्रद्धा आहे त्याची वृत्ति अत्यत खेळाडू असून टेनिस ते उत्तम खेळतात सन १९३० सालीं विलायतच्या प्रवासास आपल्या वडिला-बरोबर गेले असताना रिचमड पार्कमध्ये झालेल्या ओपन टेनिस टूर्नामेन्टच्या

सिंगल्समध्ये त्याना सिल्व्हर मेडल मिळाले. तसेच गिलवेल पार्क येथील स्काउट कॅम्पमध्ये राहून स्काउटचे शिक्षण त्यानी सपादन केले तेथील परीक्षा पास झाल्याबद्दल स्काउटचे ' वुडमन्स बॅज पार्ट सेकड ' हेहि त्याना मिळाले आहे फोटोग्राफीचा त्याना नाद असून ते ज्या ज्या ठिकाणीं प्रवासास गेले तेथील प्रेक्षणीय स्थळाचे सृष्टिसौंदर्याने युक्त अशा निसर्गरमणीय देखाव्याचे अनेक फोटो घेऊन त्याचे आल्बम्स तयार करून त्याचा त्यानी सग्रह केला आहे त्याच्या ठिकाणीं वाचनाभिरुचि बरीच असून त्यानीं कविताहि बऱ्याच केल्या आहेत त्याचे ' त्रिदल ' व ' निर्झरणी ' हे दोन काव्यसग्रह सन १०२० व १०३१ या सालात प्रसिद्ध झाले आहेत

## श्रीमत युवराजाचा प्रथम विवाह

श्रीमत राजेसाहेब गादीवर आल्यावर श्रीमत युवराज भाऊसाहेब हे विवाहास योग्य झाले असे पाहून अनुरूप, सुशिक्षित अशा खानदानीच्या सरदार घराण्यातील अनेक उपवर मुली त्याना दाखविण्यात आल्या त्यात सातारा येथील सुप्रसिद्ध कुबेर घराण्यातील श्री रा रा वासुदेव दिनकर कुबेर, बी ए , एल्‌एल् बी , वकील, याची कन्या सर्वगुणसपन्न, सुस्वरूप, सुशिक्षित अशी असल्याने श्रीमत युवराज व राजघराण्यातील सर्व मडळीनी पसत केली वधू पसत झाल्यावर उभयपक्षामध्ये आवश्यक वाटाघाटी होऊन लग्नसमारभ भोर येथें ता २० एप्रिल सन १९२३ रोजी करण्याचे निश्चित झाले या समारभा-करिता भोर येथे जारीने तयारी सुरू करण्यात आली राजेरजवाडे, सस्थानिक, सरदार, दरकदार, इनामदार, ओळखीचे विद्वान् गृहस्थ, शास्त्री, पडित याना अगत्याचीं निमत्रणे पाठविण्यात आलीं पाहुण्याचा वगैरे उत्तम बदोबस्त राहावा, कोणत्याहि प्रकारे उणीव पडू नये म्हणून कोणी कोठे उतरावे हे आगाऊच ठरवून प्रत्येक ठिकाणी स्वतत्र अमलदार नेमण्यात येऊन त्याच्याकडे सर्व व्यवस्था सोपविण्यात आली ता १९ रोजी राजशाही थाटाने अक्षतसमारभ मोठ्या थाटाने झाला दोन्ही पक्षाकडील पाहुणेमडळी उत्तमउत्तम पोषाखानी व स्त्रिया अलकारानीं सजून समारभास उपस्थित होती रात्री श्रीराम-मडपात सीमातपूजनाचा समारभ मोठ्या थाटाने पार पडला दुसरे दिवशी लग्नसमारभ झाला हा समारभातील मुख्य दिवस वराची स्वारी सर्व लवाजम्यानिशी

चित्राक १५३



श्रीमत युवराज भाऊसाहेब याच्या लग्नातील खाशी पगत [स पा. ७९८

डावे बाजूचे पहिल्या पगतीच्या सुरुवातीस मध्यभागी श्री सौ माईसाहेब, श्री युवराज, उजव्या पगतीचे मध्यभागी १ श्री राजेसाहेब, २ राजे शामराज.

वाजत गाजत वधूगृहीं आली. भिक्षुकमंडळींची मुहूर्त साधण्याविषयीं अगदीं गडबड उडून राहिली होती. या समारंभाकरितां श्रीमंत मालोजीराव नानासाहेब नाईक निंबाळकर, अधिपति संस्थान फलटण, श्रीमंत सर गंगाधरराव बाळासाहेब, अधिपति मिरज ( सीनियर ), श्रीमंत राजे शामराज रायरायन बहाद्दुर, हैद्राबाद, श्रीमंत स्वामीमहाराज, चाफळ, श्रीमंत सरदार बाळासाहेब विंचुरकर व अनेक सन्मान्य पाहुणे आले होते. लग्नसमारंभ चांगल्या प्रकारें पार पडला. सर्व पाहुणेमंडळींना मेजवानी देण्यांत आली. भिक्षुक व विद्वान् शास्त्रीपंडितांस योग्यतेप्रमाणें संभावना देऊन संतुष्ट केलें. रात्रीं हत्तीवरून वरातीची मिरवणुक अपूर्व थाटाची झाली. लक्ष्मीपूजन होऊन श्रीमंत युवराज यांच्या पत्नीचें नांव श्री. सौ. शिऊबाई ऊर्फ माईसाहेब असें ठेवण्यांत आलें. चार दिवस एकंदर सोहळा चालू होता. सर्व गोरगरीब, दीन दुबळ्यांना यथोचित अन्नदान देऊन संतुष्ट करण्यांत आलें. या समारंभानिमित्त श्रीमंतांना अनेक अहेर आले ते सर्व ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें परत करण्यांत आले. सर्व पाहुणेमंडळी लग्नसमारंभ आटोपल्यावर श्रीमंतांचा निरोप घेऊन परत गेली.

## श्री. सौ. शिऊबाई ऊर्फ माईसाहेब यांचें निधन

लग्नानंतर लवकरच श्रीमंत युवराज भाऊसाहेब यांच्या पत्नी श्री. सौ. शिऊबाई ऊर्फ माईसाहेब या एक वर्षाच्या आंत ता. ५ मार्च १९२४ रोजीं गरोदर असतांना पर्निशिअस् ॲनिमियाचे ( रक्तक्षयाचे ) विकारानें पुणें मुक्कामीं निधन पावल्या. त्यांच्या निधनानें राजकुटुंबांतील सर्व मंडळींवर एक मोठीच आपत्ति कोसळली. त्यांचा तारुण्यांत नुकताच कोठें प्रवेश होतो न होतो तोंच निर्घृण काळानें त्यांना युवराज्ञिपदावरून अकालींच ओढून नेल्यामुळें त्यांच्या मातापितरांनाहि अत्यंत दुःख झालें.

## श्रीमंत युवराजांचा द्वितीय विवाह

प्रथम भार्येच्या अकालीं निधनानें श्रीमंत युवराज भाऊसाहेब यांना अत्यंत दुःख झालें. तथापि दिवसगत झाल्यावर तितकें दुःखहि कमी पडत गेलें व त्यांचा द्वितीय विवाह ता. ६ डिसेंबर १९२४ रोजीं भोर येथें साजरा करण्यांत आला. पुणें येथील सरदार विंचुरकर घराण्यांतील श्रीमंत सरदार बाळासाहेब विंचुरकर यांचे चिरंजीव श्रीमंत भाऊसाहेब यांची कन्या

सौ का सरोजिनीबाई याना श्रीमत युवराज भाऊसाहेब यानी पसत केले विंचुरकर घराण्याचा सचिव घराण्याशीं दोन पिढ्याचा पहिला सबध होताच श्रीमत सरदार बाळासाहेब विंचुरकर हे श्रीमत राजेसाहेब याचे मातुल व श्वशुर होत हा पूर्वीचा सबध सरदार विचुरकर यानी आपली नात श्रीमत युवराज याना देऊन पुन्हा नवा केला हाहि समारभ सर्व सोहळा चार दिवस होऊन मोठ्या थाटाने पार पडला समारभास बरीच पाहुणेमडळी आली होती श्रीमत युवराज याच्या या पत्नीचे नाव श्री. सौ शिऊबाई ऊर्फ माईसाहेब असे ठेविले याच हल्लीच्या युवराज्ञी होत या सुस्वरूप, सुस्वभावी, सुशिक्षित अशा आहेत याना वाचनाचा फार नाद आहे काही कविताहि त्यानीं केल्या आहेत श्रीमत युवराजसाहेब याच्या 'निर्झरणी' या कवितासग्रहातच याच्याहि कविता छापल्या आहेत हे कवितारूपी अपत्य दोघानीं श्रीमत राजेसाहेब याना मोठ्या समारभाने सन १९३१ साली अर्पण केले

## श्रीमंत युवराज यांचीं अपत्ये

श्रीमत युवराज भाऊसाहेब व श्री सौ माईसाहेब याना चार कन्या व एक पुत्र अशीं पाच अपत्ये झालीं आहेत पहिली कन्या श्री राजकुमारी विमलाराजे याचा जन्म ता ४ मे १९२७ रोजीं झाला त्यानतर श्रीमत राजकुमारी कमलाराजे, लीलाराजे व रेणुकाराजे याचे जन्म अनुक्रमें ता ६ ऑक्टोबर १९२९, ता ५ डिसेबर १९३२ व ता १५ मार्च १९३४ रोजी झाले यानतर ता १२ मार्च १९३५ रोजी श्रीमत युवराजसाहेब याना पुत्ररत्न होऊन श्रीमत राजेसाहेब याना नप्तृमुख पाहण्याचे भाग्य लाभले या सर्वांचे शिक्षण-सगोपन श्री सौ माईसाहेब याच्या देखरेखीखाली चालू असून श्री राजकुमारी विमलाराजे व कमलाराजे या पुणे येथील मुलींच्या हायस्कूलमध्ये अनुक्रमे इग्रजी दुसऱ्या व मराठी तिसऱ्या इयत्तेत शिक्षण घेत आहेत

## श्रीमंत राजेसाहेबांना पौत्ररत्नप्राप्ति

श्रीमत युवराज भाऊसाहेब याच्या पत्नी, श्रीमत राजेसाहेब याच्या स्नुषा श्री सौ शिऊबाई ऊर्फ माईसाहेब या पुणे येथें ता १२ मार्च सन १९३५ इसवी रोजीं प्रसूत होऊन पुत्ररत्न झाले, हे वर सागितलेच आहे 'तनये तनयोत्पत्ति सुरवरनगरे किमाधिक्यम्' ! श्रीमत राजेसाहेब याना

चित्रांक १५४



१ श्री. युवराज भाऊसाहेब, २ श्रीमत राजेसाहेब, ३ श्री आबासाहेब (नातू–श्रीमताचे माडीवर),
४ श्री. सौ. माईसाहेब (सन १९३८ मधील फोटो). [स. पा. ७९९

नातवाचे मुख पाहण्याचा लाभ मिळाला ही खरोखर मोठ्या भाग्याची गोष्ट आहे श्रीमत राजेसाहेब भोरास होते भोरास तारेने ही बातमी त्याना कळविण्यात आली त्यानिमित्त ९ तोफा उडविण्यात आल्या सस्थानच्या गॅझेटचा जादा अक काढून ही आनददायक बातमी चोहोंकडे प्रसिद्ध करण्यात आली आनदाप्रीत्यर्थ श्रीरामाला व सर्व मडळींना पेढे वाटण्यात आले ब्राह्मणाना दक्षिणा देण्यात आली शाळा-कचेऱ्याना सुट्टी देण्यात आली श्रीमत राजेसाहेब त्याच दिवशी पुण्यास जाऊन, पौत्रमुख पाहून, कुशल समाचार घेऊन आले भेटीच्या वेळीं त्यानीं श्री सौ माईसाहेब याना २ गिनी व नातवास १ गिनी अशी प्रेमाची भेट दिली नतर ते भोरास परत आले.

श्रीमत राजेसाहेबाना नातू झाल्याची बातमी सर्व प्रजाजनास समजल्या-बरोबर त्यानीं घरोघर गुढ्या उभारून आपला आनद व्यक्त केला कुळबी बायकानीं हेल घातले.

ता ३१ मार्च १९३५ रोजी बारसे होऊन नामकरणसमारभ झाला या समारभाकरिता श्रीमत राजेसाहेब पुण्यास गेले होते मुलाचे नाव ‘ चिमणाजीपत ’ ऊर्फ ‘ आबासाहेब ’ ठेवण्यात येऊन सर्वांना पेढे वाटण्यात आले निरनिराळ्या राजेलोकाकडून व श्रीमताच्या आप्तस्वकीयाकडून पुष्कळ बाळतविडे आले भोरच्या नगरवासीयानीहि बाळतविडे पाठविले.

श्रीमत चिमणाजीपत ऊर्फ आबासाहेब याचा भोर शहरात प्रथम प्रवेश ता ११ एप्रिल १९३५ रोजी झाला त्या वेळीं त्याना ९ तोफाची सलामी देण्यात आली त्याच्या आगमनाप्रीत्यर्थ थाटाचा दरबार भरविण्यात येऊन पेढे वाटण्यात आले

## प्रकरण १९ वे

# शोचनीय गोष्टी



## कौटुंबिक दुःखदायक प्रसंग

### श्री सौ. लक्ष्मीबाई राणीसाहेब यांचें शोचनीय निधन

श्री सौ लक्ष्मीबाई राणीसाहेब या ता २२ एप्रिल १९३१ रोजी महाबळेश्वर मुक्कामी अर्धांगवाताचे विकाराने निधन पावल्याची हकीकत मागील प्रकरणात विस्तृतपणे दिलीच आहे त्या अत्यत सुस्वभावी व प्रेमळ असल्यामुळे आणि सस्थानच्या प्रजाजनाच्या उन्नतीसाठी त्याच्या ठिकाणी फार कळकळ असल्यामुळे त्याच्या अकाली झालेल्या निधनाने सर्व प्रजेला अत्यत दु ख वाटणे साहजिक होते त्याच्याविषयी वाटणारा आदर व प्रेम कशा प्रकारे व्यक्त करता येईल या विचारात प्रजेचे पुढारी होते भोर येथे निरा नदीवर नवीन पूल बाधण्यात येऊन त्याचा उद्घाटनसमारभ होणार होता तेव्हा भोर कायदेमडळातील प्रजाजनाच्या सभासदपुढाऱ्यानी कायदेमडळात ठराव आणून पुलास श्री सौ लक्ष्मीबाईंचे नाव द्यावे अशी श्रीमत राजेसाहेबाना विनति केली तेव्हा श्रीमत राजेसाहेबानी त्याचा सद्धेतु लक्षात घेऊन त्याच्या ठरावास समति दिली श्रीमताचे श्री सौ. राणीसाहेबावर अत्यत प्रेम होते तेव्हा त्याचे चिरस्मरणीय स्मारक होत आहे हे पाहून श्रीमतास एक प्रकारे समाधानच वाटले

सन १९३३ च्या जून महिन्यात २० तारखेस पुलाचा उद्घाटनसमारभ दक्षिणेतील सस्थानाचे पहिले ए जी जी ले -कर्नल एच् (हल्लीं सर हॅरॉल्ड) विल्बरफोर्स-बेल, सी आय ई , याचे हस्ते झाला त्या वेळी कायदेमडळाचे त्या वेळचे उपाध्यक्ष रा चद्रशेखर गोविंद आगाशे, बी ए , एल्एल् बी , यानी ए जी जीं ना पुलाचे उद्घाटन करण्याची विनति करताना कै श्री सौ राणीसाहेब याचेबद्दल पुढील सार्थ उद्गार काढले ते म्हणाले·—

"Ladies and gentlemen, before doing the pleasant duty assigned to me, I hope you will kindly excuse me, if I can't let this opportunity pass without paying my humble tribute to the noble qualities of head and heart which adorned the

life of the late Shrimant Sou Ranisaheb, in memory of whose esteemed and beloved name this bridge is hereafter to stand for ever as a fitting monument

Born of a respectable, though middle state, family, the Ranisaheb showed herself by temperament worthy of the exalted position which Providence called upon her to fill She typified a true and perfect Hindu i e Aryan lady, Full of a devotional bent of mind, there was always about her an air of dignified simplicity and charming solemnity in all her dealings that made her respected and admired by all, Pure and fine in character, modest and unassuming in behaviour and kind-hearted and affectionate in disposition, she always interested herself in whatever tended to the uplift and well-being of the womanhood of the State She always spent much money out of her private purse for the benefit of the needy and deserving Piety and charity, the two outstanding and guiding features in her character, shed a charming luster upon our Ruler's private life and enabled her to live a life – lamentably short though it was – of an example to all

Ladies and Gentlemen, although it is ever to be regretted that such a promising career was too early cut short by the cruel hand of death, yet as the adage goes "an hour of glorious life is worth an age without name " This abiding memorial to her well-lived life will ever proclaim to posterity the truth of the wise saying "Life is uncertain, but good deeds never die " Ladies and gentlemen, I hope you will all of you join with me in wishing the departed soul an eternal and blissful peace at the foot of the Almighty Lord. "

याच समारभाचे वेळीं ले.–क एच् विल्बरफोर्स-बेल यानी भाषण केले त्यानींहि श्री. सौ राणीसाहेब याचेबद्दल पुढील उद्गार काढले ते म्हणाले --

"Another point is the eulogium which we have heard of the noble lady after whom this bridge that we are opening this afternoon is to be named It was never my pleasure nor my privilege to know the lady whose name is so prominently associated now with this Bridge and whose life has been so

obviously bound up with the Chief Saheb and the State I cannot say more The reader of the last speech has said all that could be said about that lady, and it only remains to be seen that the bridge that has been erected in her name is worthy of its object "

## श्रीमंत सरदार बाळासाहेब विंचुरकर यांचें निधन

पुणे येथील श्रीमत सरदार रामराव कृष्णराव ऊर्फ बाळासाहेब विंचुरकर हे कै श्री सौ जिजीसाहेब याचे बधु व श्रीमत राजेसाहेब याचे मातुल होत त्यानीं आपली कन्या श्री सौ गगूताईसाहेब याचा विवाह श्रीमत राजेसाहेबा-बरोबर करून श्रीमताना आपले जामात करून घेतले होते त्यामुळे श्रीमताबरोबर मातुल व श्वशुर असे त्याचे दुहेरी नाते होते त्याचे श्रीमत बाबासाहेब याचेवर पुत्रवत् प्रेम होते कै श्रीमत रावसाहेब व श्रीमत राजेसाहेब याचेमध्ये श्रीमत रावसाहेबाच्या काटकसरी वृत्तीमुळे खर्चाचे बाबतीत व दुसऱ्याहि अनेक गोष्टीत दुहीचे प्रसग वरचेवर येत या सर्व प्रसगीं श्रीमत राजेसाहेब यास मामासाहेबाचा व जिजीसाहेबाचाच काय तो आधार या प्रत्येक प्रसगी मामासाहेबानी रावसाहेबाना योग्य सल्ला देऊन व युक्तीच्या गोष्टी सागून ते प्रसग मोठ्या चातुर्याने टाळले अभ्यासाकरिता श्रीमताचा मुक्काम पुण्यास असे त्या वेळी त्याचा अभ्यास कसा काय चालला आहे, त्यावर वरचेवर लक्ष ठेवून ते त्याना प्रोत्साहन देत श्रीमत राजेसाहेब आजारी असताना तीन महिने त्याना मनमाड येथें हवापालट करण्यास नेऊन त्याची स्वत योग्य शुश्रूषा केली सन १९०७ साली श्री सौ गगूताईसाहेब निधन पावल्या त्यामुळे त्याना कन्यावियोगाचे अत्यत दु ख झाले तथापि, त्यामुळे श्रीमत राजेसाहेब याचेवरील प्रेम कमी न होता ते द्विगुणित झाले ते श्री सौ जिजीसाहेब याचेबरोबर बद्रीकेदारचे यात्रेस गेले त्या वेळीं या महायात्रेहून आपण परत येतो की नाही अशी शका वाटल्यावरून यात्रेस जाण्यापूर्वी त्यानी आपले मृत्युपत्र तयार करून ते श्रीमत राजेसाहेब याच्या स्वाधीन केले होते, त्यावरून श्रीमत राजेसाहेबावर त्याचा किती विश्वास व प्रेम होते हे स्पष्ट दिसून येते श्रीमत राजेसाहेबहि त्याना फार मान देत व त्याचेविषयीं त्याना फार आदर व प्रेम होते ते ता २१ फेब्रुवारी सन १९२७ रोजी निधन पावले श्रीमत राजेसाहेब याना वडील-मातोश्रीच्या

चित्रांक १५५



श्रीमत राजकुमार व राजकुमारी हत्तीवर अबारीत बसलीं आहेत ( सन १९३८ )

पश्चात् श्रीमत बाळासाहेब हेच वडीलधारे माणूस असल्यामुळे त्याचा एखाद्या गोष्टीत सल्ला घेण्यास सवड होती व ते असेपर्यंत श्रीमताना एक आधार होता तो आधार नाहीसा झाल्यामुळे श्रीमताना फार वाईट वाटले त्याचा स्वभाव दिलदार, उदार, परोपकारी, क्षमाशील असा होता

## श्रीमंत भय्यासाहेब बुध्याळकर जामात यांचे निधन

श्रीमत भय्यासाहेब बुध्याळकर हे बेळगाव नजीकच्या बुध्याळ गावचे इनामदार असून त्याना श्रीमत राजेसाहेब याची कन्या श्री सौ काशीताई-साहेब या दिल्या होत्या श्री सौ काशीताईसाहेब १९१५ साली बाळत-रोगाने निवर्तल्या तथापि, श्रीमत राजेसाहेबानीं श्रीमत भय्यासाहेबाना वरचेवर भेटीस बोलावून पूर्वीचा सबध कायम ठेविला होता त्याचे इनामदार घराणे श्रीमत राजेसाहेबाच्या मानाने कमी दर्जाचे होते तरी श्री भय्यासाहेब यानी आपल्या दिलदार व मनमिळाऊ स्वभावाने सर्वांची मने आपणाकडे आकर्षून घेतलीं होती व पत्नीच्या पश्चात् आपले सचिवाकडे जाणेयेणे कायम ठेविले होते ते सन १९३० साली निधन पावले त्यामुळे श्रीमत राजेसाहेबाना वाईट वाटले

## स्नेही, अधिकारी व युरोपिअन ऑफिसर यांचीं निधनें

## रा ब. तात्यासाहेब कुमठेकर यांचे निधन

श्री रा रा कोडो महादेव ऊर्फ दादासाहेब कुमठेकर, बी ए, एल्एल् बी , रिटायर्ड डिस्ट्रिक्ट आणि सेशन्स जज्ज, व हल्लीं दिवाण स भोर, हे पुणे हायस्कूलमध्ये इग्लिश तिसऱ्या इयत्तेत शिक्षण घेत असल्यापासून श्रीमत राजेसाहेब याचे स्नेही आणि सहाध्यायी असल्यामुळे त्याचे वडील रा ब तात्यासाहेब कुमठेकर याच्याशी श्रीमताचा बराच परिचय झाला होता त्यानी ब्रिटिश सरकारची नोकरी चागल्या प्रकारे केल्यामुळे त्याना सरकारकडून रावबहादुर ही बहुमानाची पदवी प्राप्त झाली होती त्याचे सरकारात चागले वजन होते व त्याच्या सल्ल्याचा श्रीमत राजेसाहेब याना बराच उपयोग झाला पुणे येथें ता २६।१।१९२९ रोजा झालेल्या त्याच्या निधनाने श्री रा रा दादासाहेबाना झालेल्या दु खात श्रीमतानीं सहभागी होऊन त्याना सामोपचाराच्या दोन गोष्टी सागून त्याचे सात्वन करून त्याना

आधार दिला श्रीमत राजेसाहेब व श्री रा रा दादासाहेब याच्यामध्ये मित्रप्रेम अत्यत उच्च कोटीचे असून प्रसगीं दोघेहि एकमेकाच्या सुखदु खाचे वाटेकरी होतात श्री रा दादासाहेब ब्रिटिश सरकारच्या नोकरींतून रिटायर झाल्यावर त्याना ता १५ नोव्हेबर १९३८ पासून भोर सस्थानचे दिवाण-पदावर नेमून श्रीमतानी स्नेहवृद्धींत भर टाकली आहे

## रा ब. डी. बी पारसनीस यांचें निधन

सातारचे सुप्रसिद्ध नागरिक व इतिहासज्ञ रा ब डी बी पारसनीस याचेबरोबर श्रीमताचे अध्यापक के नारायण नरसिह केळकर याच्यामुळे प्रथम ओळख झाली व पुढे श्रीमताचा त्याच्याशी बराच परिचय वाढला रा ब पारसनीस याना मराठयाच्या इतिहासाबद्दल अत्यत उत्कट प्रेम होते, व त्यानीं अनेक ऐतिहासिक वस्तूचा सग्रह तयार केला पुस्तकेंहि बरीच लिहिलीं त्यानी तयार केलेल्या वस्तुसग्रहालयाचा उद्घाटनसमारभ मुबईचे गव्हर्नर सर लेस्ली विल्सन याच्या हस्ते ता २ नोव्हेबर १९२५ रोजीं झाला यात अनेक ऐतिहासिक वस्तूचा त्यानीं सग्रह केलेला असून इतिहासाचे अभ्यासकाना सशोधनाचे कामीं योग्य उपयोग करता यावा अशी त्याची माडणी मोठ्या परिश्रमपूर्वक केली होती उद्घाटनसमारभ झाल्यावर त्याच्या अपेक्षेप्रमाणे या सग्रहालयाचा किती उपयोग होतो ते पाहण्यास रा ब पारसनीस हे जगले नाहींत त्यानतर अवघ्या सहा महिन्यातच ता ३१ मार्च १९२६ रोजीं ते कालवश झाले त्याच्या सल्ल्याचा श्रीमत राजेसाहेबाना बराच उपयोग होत असे. त्याच्या निधनाने श्रीमताना बरेंच दु ख झाले.

## रा. पुरुषोत्तम मावजी शेट यांचें निधन

मुबई येथील प्रसिद्ध व्यापारी शेट पुरुषोत्तम विश्राम मावजी याचा व श्रीमत राजेसाहेब याचा रा. ब. पारसनीस याच्यामुळे परिचय झाला. मावजी शेट हे फार इतिहासप्रेमी असून त्यानीं ऐतिहासिक पुस्तकाचा व शिवकालीन वस्तूचा एक प्रचड सग्रह तयार केला होता. शेवटी शेवटीं त्याची सापत्तिक स्थिति खालावल्यामुळे या सग्रहाचे सरक्षण करणे अशक्य वाटून त्यानीं तो मुबई येथील प्रिन्स ऑफ वेल्स म्यूझिअमला देऊन टाकला त्याच्या निधनाने एक इतिहासाचा अभिमानी गेल्याबद्दल श्रीमताना बरेच वाईट वाटले त्याचे चिरजीव

चित्रांक १५६



श्री सरदार बाळासाहेब विंचूरकर
( श्रीमत राजेसाहेबांचे मातुल व श्वशुर )

[स पा ८०२

श्री रा हसराज शेट याच्याशीं ओळख ठेवून त्याच्या वडिलाबरोबरचा स्नेह अद्याप श्रीमतानीं कायम राखला आहे

## वे. शा. सं श्रीधरशास्त्री गोखले यांचे निधन

भोर येथील सुप्रसिद्ध वैद्य श्रीधरशास्त्री गोखले हे भोर येथें ता १ सप्टेंबर १९२८ रोजीं निधन पावले श्रीधरशास्त्री श्रीमत रावसाहेब याचे वेळेपासून राजवैद्य होते रोगनिदान करून त्यावर अचूक औषधयोजना करण्यात ते निष्णात होते १९११ सालीं श्री युवराज भाऊसाहेब अत्यत आजारी असताना डॉक्टरी औषधाचे उपाय थकल्यावर श्रीधरशास्त्री याचे औषधानेच त्याना गुण आला श्रीमतानी आपणास नेमणूक करून घेतल्यानतर श्रीधरशास्त्री याना आपल्या तैनातीत घेतले श्रीमत बाबासाहेब याच्या तब्बेतीचे मान पूर्ण परिचयाचे असल्याने कोणत्याहि दुखण्यात त्याच्या औषधाने श्रीमताना झटपट गुण वाटे कै श्री राणीसाहेबाना अर्धांगाचे विकारापासून त्यानीच बरे केले ते गोरगरिबाना औषधोपचार मोफत करीत ते आयुर्वेदाचे अभिमानी असल्यामुळे त्यानी रु २००० चा ट्रस्ट करून आयुर्वेदशिक्षणाकरिता एक शिष्यवृत्ति ठेविली आहे

## मुंबईचे माजी गव्हर्नर लॉर्ड सिडनहॅम यांचा ख्रिस्तवास

मुबई इलाख्याचे माजी गव्हर्नर लॉर्ड सिडनहॅम हे इग्लडमध्ये आपल्या गावीं केन्टमध्ये ता ७ माहे फेब्रुवारी १९३२ रोजीं ख्रिस्तवासी झाले ते मुबईचे गव्हर्नर असताना भोर सस्थानशी त्याचा विशेष सलोख्याचा सबध होता भोर सस्थानच्या हिताविषयी ते फार काळजी घेत श्रीमत राजेसाहेब युवराज असताना त्याच्याविषयी ते वरचेवर विचारपूस करून विशेष आपलेपणा दाखवीत त्याचा श्रीमताना फार उपयोग झाला ते सेवानिवृत्त होऊन विलायतेस गेल्यावरहि वरचेवर पत्रे पाठवून ते सस्थानच्या प्रगतीची इच्छा प्रगट करीत श्रीमत राजेसाहेबानीहि त्याच्याशी असलेला परिचय कायम ठेविला होता श्रीमत राजेसाहेब १९३० साली विलायतेस गेल्यावेळी केन्ट येथें जाऊन त्यानीं त्याची मुद्दाम भेट घेतली त्याच्या मृत्यूमुळे सस्थानचा एक हितचिंतक नाहीसा झाला याबद्दल श्रीमत राजेसाहेब यास वाईट वाटले

## रा ब श्रीधर आबाजी सातभाई यांचे निधन

रा ब श्रीधर आबाजी सातभाई, भोर संस्थानचे माजी कारभारी, हे अहमदनगर येथें आपल्या घरी ता ८ मार्च १९३२ रोजी स्वर्गवासी झाले मृत्युसमयीं त्याचे वय ८३ वर्षांचे होते भोर संस्थानचा व त्याचा संबंध फार जुना होता भोर संस्थानचे कारभारी म्हणून काम करून १९१६ साली ते सेवानिवृत्त झाले तथापि, संस्थानशी असलेला संबंध न तोडता त्यानी आपल्या अनुभवाचा व ज्ञानाचा फायदा कै श्री रावसाहेबाना व श्रीमंत बाबासाहेबाना वेळोवेळी मरेपर्यंत दिला युरोपिअन अधिकारी लोकात त्याचे चागले वजन होते व साहेबाना कोणतीहि गोष्ट योग्य रीतीनें समजावून सागून त्याच्याकडून आपले काम करून घेण्याची हातवटी त्याना उत्तम साधली असल्यामुळे त्याचा उभयता श्रीमंताना फार उपयोग झाला श्रीमंत बाबासाहेब युवराज असताना ते व श्रीमंत रावसाहेब याच्यामध्ये अनेक मतभेदाचे प्रसग उद्भवले त्या वेळीं श्री रावसाहेबाची समजूत घालून तटजोड घडवून आणण्याचे कामी त्याचा बराच उपयोग होई वृद्धावस्थेंतसुद्धा काम करण्याची त्याची मानसिक व शारीरिक शक्ती दाडगी होती उतारवयातहि १९३० सालीं ते श्रीमंत राजेसाहेब याजबरोबर विलायतचे सफरीस गेले होते त्याच्या मृत्यूमुळे संस्थानचा एक एकनिष्ठ सेवक व अनुभवी मुत्सद्दी गेला यामुळे श्रीमंत राजेसाहेब याना फार दुःख झाले

## सर विल्यम शेपर्ड यांचा ख्रिस्तवास

सर विल्यम शेपर्ड, आय सी एस्, हे मुंबई सरकारच्या एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलचे व लंडन येथील इंडिया कौन्सिलचे सभासद होते त्यापूर्वी ते भोरचे काही दिवस पोलिटिकल एजट होते त्या वेळी श्रीमंत राजेसाहेब हे युवराज होते त्याच्या हिताविषयीं सर शेपर्ड यानी विशेष कळकळ दाखविली श्रीमंत बाबासाहेब याचेविषयीं सर विल्यम याचे मत फार चागले असून श्रीमंताचा नावलौकिक वाढण्यास व कै रावसाहेब याचेकडून त्याना खर्चास स्वतंत्र नेमणूक मिळवून देण्याचे कामी सर विल्यम हेच विशेष कारणीभूत झाले याचा श्रीमंत बाबासाहेबाना फार उपयोग झाला ते ता ८ एप्रिल सन १९३३ रोजी लंडन येथें ख्रिस्तवासी झाल्याची बातमी समजल्यावर श्रीमंत राजेसाहेबाना फार वाईट वाटले श्रीमंत सन १९३० साली तेथें गेले

चित्रांक १५७



कै. सर लल्लूभाई सामळदास, मुंबई सरकारचे हंगामी महसूल मंत्री ( १९२५ ) ह्यांचा संस्थानला पुष्कळच उपयोग झाला.

असताना त्याची त्यानी मुद्दाम भेट घेतली होती, व तेहि श्रीमताचे निवासस्थानी परत भेटीस आले होते

## मि. एल. सी. स्विफ्ट यांचा ख्रिस्तवास

सर ल्यम शेपर्ड याचेनतर मि एल् सी स्विफ्ट हे जवळ जवळ दहा वर्षेपर्यंत भोरचे पोलिटिकल एजट म्हणून काम करीत होते सर शेपर्ड याचे खालोखाल मि स्विफ्ट याचा श्रीमत राजेसाहेबाना नेमणूक वाढवून घेण्याच्या कामीं व श्रीमत युवराज भाऊसाहेब याच्या आजारीपणात श्री रावसाहेब याच्याकडून औषधोपचारास पैसे देवविण्याच्या कामी, तसेच शिरवळ तालुक्याचे असिस्टट कलेक्टरचा अधिकार मिळण्याचे वगैरे गोष्टात फार उपयोग झाला श्रीमत राजेसाहेबानी १९३० साली इग्लडमध्ये त्याची भेट घेतली व तेहि श्रीमताचे निवासस्थानी चहास आले होते त्याच्या निधनाची बातमी समजली तेव्हा श्रीमत राजेसाहेबाना फार वाईट वाटले

## रा बापूजी रामचंद्र लोहोकरे यांचे निधन

श्री रा बापूजी रामचद्र लोहोकरे हे आपल्या वयाच्या ६९ व्या वर्षी नोकरीत असताना सतत ५० वर्षे नोकरी करून ता ७-४-१९३४ रोजी भोर येथे निधन पावले धर्मावर त्याची फार श्रद्धा होती तथापि नव्या कालानुरूप आचरणात फरक करण्याची वृत्ति त्याचे अगी होती कै श्री रावसाहेब याचे व त्याचे पश्चात् श्रीमत बाबासाहेब याचेहि ते एकनिष्ठ सेवक होते ते कर्तव्यतत्पर, राजनिष्ठ, विश्वासू व सस्थानची भरभराट व्हावी असे इच्छिणारे एक तडफदार सेवक होते त्याना काम करण्याची हौस व तत्परता होती राजकारणातील महत्त्वाच्या गोष्टी पूर्णपणे गुप्त राखण्यात ते फार दक्ष असत त्याच्या आगचे वरील गुण दृष्टोत्पत्तीस आल्यामुळे श्रीमत बाबासाहेब यानी गादीवर आल्यावर कारकुनाचे दर्जापासून प्रथम पोलिटिकल सेक्रेटरी व पुढे नायब हुजूर खाजगी कामगार व एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलचे सभासद या मोठ्या हुद्यावर त्यास चढविले सस्थानात बरीच वर्षे सतत काम केल्यामुळे सस्थानसबधीं सर्व खात्याची सर्व माहिती त्याना अवगत होती अशा सस्थानच्या हितचिंतकाच्या निधनाने झालेली हानि कशानेहि भरून निघण्यासारखी नाही त्याच्या कामगिरीबद्दल त्याच्या कुटुबियास रु ५०० मदत म्हणून श्रीमत बाबासाहेब यानी दिले

## श्री रा विष्णु दादाजी देशपांडे यांचे निधन

भोरचे पोलिस सुपरिन्टेंडेट रा विष्णु दादाजी देशपाडे हे मुबई येथे ता २० मे १९३४ रोजी निधन पावले ब्रिटिश सरकारचे नोकरींतून त्याना सस्थानकडे ऑक्टोबर १९३१ पासून मागून घेतले होते त्यापूर्वी ते साताराचे होम इन्स्पेक्टरचे जागी काम करीत होते सस्थानची त्यानी फक्त दोन अडीच वर्षेच नोकरी केली तथापि, त्या अवधींत सस्थानचे स्वार शिबदी पोलीस या खात्यात जरूर ती सुधारणा करून त्यातील लोकाना कवाईत, शारीरिक शिक्षण, बदुकीचे उपयोग व शिस्त इत्यादिकात अल्पावधीत तरबेज केले भोर सस्थानातील अराजक चळवळ नाहींशी करण्याचे व सर्व सस्थानात व विशेषत मोसे खोऱ्यात शातता स्थापण्याचे कामी त्याचा फार उपयोग झाला ते अनुभवी, कर्तव्यतत्पर, व धाडशी स्वभावाचे होते त्याच्या सस्थानातील कामगिरीबद्दल त्याच्या निधनानतर त्याच्या कुटुबियास रु १००० बक्षिस म्हणून देण्यात आले

## रा ब. गणेश हरी अंजनगांवकर यांचे निधन

रा ब गणेश हरी अजनगावकर हे पुणे मुक्कामीं वृद्धापकाळ झाल्यामुळे ता ४ ऑक्टोबर सन १९३७ रोजीं निधन पावले ते भोर सस्थानला किती उपयोगी पडले याचा उल्लेख सस्थानातील सत्कारसमारभात आला आहे

## रा सा. अनंत रामचंद्र जोशी यांचे निधन

रावसाहेब अनत रामचद्र जोशी, बी ए ,एल्एल् बी , रिटायर्ड न्यायमत्री, भोर स्टेट, हे ता ७ मे १९३८ रोजी पुणे येथें कालवश झाले रावसाहेब भोर येथें प्रथम मुन्सफ म्हणून नोकरीत शिरून आपल्या हुपारीने न्यायमत्री व एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलर या पदापर्यंत चढले प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे त्यानी सन १९३१ मध्ये पेन्शन घेतले त्याची नोकरी लक्षात घेऊन नियमाने बसणाऱ्या पेन्शनपेक्षा जास्त रु २५ म्हणजे त्याच्या पगाराच्या निम्मे रु ७५ प्रमाणे देण्यात आले याखेरीज रु १००० रोख बक्षिस म्हणून दिले सेवानिवृत्त झाल्यावर तब्बेतीस थोडे बरे वाटल्यावर भोर येथें त्यानीं वकिली सुरू केली श्रीमत राजेसाहेबानी सन १९३० व १९३७ साली

चित्राक १५८



ताजमहाल, आग्रा

चित्रांक १५९

**श्रीमंत राजेसाहेबांच्या डायरींतील, कै. श्री. सरदार बाळासाहेब विंचुरकर यांच्या निधनाबद्दल मजकुराचा उतारा**

पुणे ता. २१ फेब्रुवारी १९२८ ई

काल श्रीमंत मामासाहेब अत्यन्त आजारी असल्या बद्दल मुंबई येथे तार मिळाली. लागलीच रात्री १२ च्या गाडीने निघून आज सकाळी येथे आलो. स्टेशनवरच ती. श्रीमंत मामासाहेब रात्री १२च्या सुमारास वारल्याचे कळले. व शेवट तिनकाच तातडीने येऊनही त्यांची भेट होण्याचा योग आला नाही त्याबद्दल मनास फार वाईट वाटले. श्री बाळासाहेब हे आमचे मामा असून वडिलधारे होते. आमच्या परमपूज्य मातापितरांच्या वियोगाच्या दुःखद प्रसंग आम्हावर आल्या नंतर श्रीमंत मामासाहेब यांच्या प्रेमाने मातृपितृ प्रेमाची बरीचशी आम्हा

मंडळ निघालेली होती त्याच्या आमच्या
वर अकृत्रिम प्रेम होते आणि आज
पर्णीच्या प्रसंगी त्याच्या पोरका विचा-
राच्या विशेषतः आम्ही कुटुंबाला अस
लोकांना आम्हाला फार फायद्याही मिळा-
लेला आहे. त्याचे मन उदार असून
कनवाळू होते. अशा नातेवाईकांच्या
निधनाने त्याच्या सहानुभूतीच व
मदत ~~मसलत~~ मसलतीला आम्ही
कायमचे तर मुकलोच परंतु विशेष प्रे-
माचे असे आपले मनुष्य गेल्याने आम-
च्या मनावर मोठा धक्का बसला त्यामुळे
आठवणी वरचेवर होत असून सर्व
दिवस मानसिक अस्वस्थतेत गेला.

त्याना ईश्वराने सद्गति द्यावी प्रार्थना

सदिच्छा करण्या पलीकडे आपल्या

हातात काय आहे ?

**टीप**—कै श्री सरदार बाळासाहेब विचुरकर याचेबद्दल श्रीमताचे मनात अत्यत आदर व प्रेम वसत होते त्याविषयीची हकीकत श्रीमत राजेसाहेबानी सागितलेल्या माहितीवरून या प्रकरणात पा ८०२ वर त्याच्या निधनाच्या मजकुरात दिलीच आहे तथापि, त्याच्या निधनसमयी श्रीमत राजेसाहेबाना काय वाटले ते त्यानी त्या दिवशीच्या आपल्या रोजनिशींत लिहून ठेविले आहे सदर रोजनिशीचा श्रीमताचे मराठी हस्ताक्षरातील उतारा सरदार बाळासाहेबाच्या निधनाची हकीकत छापून झाल्यावर हाती आला तो उतारा या ठिकाणी देत आहो

लेखक

चित्राक १६०



नैनीतालमधील तलाव

[स पा ८११

केलेल्या विलायत-प्रवासास त्याना बरोबर नेले होते श्रीमतानी आपल्या विलायतच्या पहिल्या सफरीचे वृत्त प्रसिद्ध केले त्या कामीं त्याची बहुमोल मदत झाली चेबर ऑफ प्रिन्सेस, फेडरेशन वगैरेसबधीं महत्त्वाच्या प्रश्नाचे बाबतीत श्रीमत राजेसाहेबाना त्याच्या सल्ल्याचा फार उपयोग झाला भाटघर धरणाचे कामीं केलेल्या उत्कृष्ट कामगिरीबद्दल ब्रिटिश सरकारकडून त्याना 'रावसाहेब' हा किताब मिळाला रावसाहेब जोशी याच्या निधनाने सस्थानातील सर्व खात्याचा माहितगार व कर्तव्यनिष्ठ इसम नाहीसा झाला याबद्दल श्रीमत राजेसाहेबाना अत्यत वाईट वाटले

## रा. गणेश बाळकृष्ण फडके यांचे निधन

सस्थानच्या प्रचडगड तालुक्याचे मामलेदार रा गणेश बाळकृष्ण फडके हे ता २३ माहे ऑगस्ट १९३८ रोजी सोलापूर मुक्कामी निधन पावले रा फडके हे ब्रिटिशमध्ये मामलेदाराचे हुद्यावरून रिटायर झाल्यावर त्यास सन १९३२ मध्ये प्रचडगड तालुक्याचे मामलेदार म्हणून नेमण्यात आले त्या वेळीं प्रचडगड तालुक्यात विशेषेकरून मोसे खोऱ्यात बरीच अस्वस्थता माजली होती त्या भागातील आडदाड लोकाचा बदोबस्त करून शातता प्रस्थापित करण्याच्या कामी फडके यानीं अविश्रात श्रम केले सस्थानातील हिर्डी मक्तेदार मुबईस हिरड्यास भाव नाही या सबबीवर रयतेची फसवणूक करू लागले तेव्हा ही परिस्थिती दरबारचे नजरेस आणून मोसे खोऱ्यात सरकारी डेपो उघडून त्यानी स्वत परिश्रम करून मुबईस माल पाठविण्याची तजवीज केली व रयतेचे हित साधले त्याची कर्तबगारी, निस्पृह स्वभाव, हुषारी वगैरे पाहून श्रीमत राजेसाहेब यानी त्याना कायदेमडळाचे सभासद केले सन १९३७ साली Coronation Medal देऊन त्याचा गौरव करण्यात आला ते सस्थानचे कायमचे मामलेदार होते त्याच्या निधनाने श्रीमत राजेसाहेबाना फार वाईट वाटले

## रा. विश्वनाथ अनंत ऊर्फ आबासाहेब बावडेकर यांचे निधन

रा विश्वनाथ अनत बावडेकर हे भोर सस्थानचे १८८९ पासून नोकर होते कारकुनीपासून नाझर, मामलेदार, दप्तरदार, ॲडि डि मॅजिस्ट्रेट व फर्स्ट कौन्सिलर अशीं चढत्या अधिकाराची कामे त्यानीं केली पुढें ते नायब हुजूर

खासगी कामगार म्हणूनहि होते संस्थानात एक्झिक्यूटिव्ह कौन्सिल स्थापन झाल्यापासून ते सदर कौन्सिलचे सभासद होते त्याचप्रमाणे पुढें कायदेमंडळ ऊर्फ लेजिस्लेटिव्ह कौन्सिल स्थापन झाल्यापासून कार्यकारी मंडळाचे रेव्हिन्यू मेंबर ( महसूल-मंत्री ) म्हणून कायदेमंडळाचेहि ते सभासद होते मधून मधून बहुतेक सर्व खात्याचे काम प्रसंगविशेषी त्यास पाहावे लागल्याने सर्व खात्याच्या अंतर्गत कामाच्याहि माहितीशी ते पुष्कळच परिचित झाले होते माजी अमदानीतल्याप्रमाणे प्रचलित श्रीमंत राजेसाहेबाच्या कारकीर्दीतहि त्यानीं चांगले काम केल्याने ते ता ११ डिसेंबर १९३८ रोजी कालवश झाल्याचे ऐकून श्रीमंताना फार वाईट वाटले मरणसमयी त्याचे वय ७८ वर्षांचे होते

---

चित्राक १६१



श्रीमत राजेसाहेब दिल्ली येथील दिवाण-इ-खासमध्ये उभे आहेत

[स पा. ८११

## प्रकरण २० वे

# श्रीमंत राजेसाहेबांचा प्रवास

### त्रिस्थळी यात्रा

सन १९२४ साली कामाची काही दिवस सवड मिळाल्यामुळे काशी, प्रयाग, गया या क्षेत्राच्या त्रिस्थली यात्रेस जाण्याचे श्रीमंत राजेसाहेब यांनी ठरविले. त्याप्रमाणे श्रीमंत राजेसाहेब ता. १२ फेब्रुवारी रोजीं श्री. सौ. राणी-साहेब व बरोबरच्या मंडळीसह यात्रेस निघाले. प्रथम ते प्रयाग येथे गेले. तेथे श्रीक्षेत्र रामेश्वराहून आणलेला सेतु तेथील गंगेत टाकला. नंतर काशीस जाऊन यथाशास्त्र तीर्थविधी केला. काशीहून श्रीमंत राजेसाहब गयेस गेले. गया येथील मुक्काम संपल्यावर दिल्लीस जाऊन तेथे नेक नामदार व्हाइसरॉय लॉर्ड रीडिंग आणि कौन्टेस ऑफ रीडिंग यांच्या व त्यांचे प्रायव्हेट सेक्रेटरी आणि पोलिटिकल सेक्रेटरी यांच्या भेटी घेऊन २२ दिवसांनी ता. ७ मार्च १९२४ रोजीं या प्रवासाहून श्रीमंत राजेसाहेब बरोबरच्या सर्व मंडळीसह सुखरूप भोरास परत आले.

### दिल्ली-नैनिताल

मध्यमहाराष्ट्रातील दक्षिणेतील सहा संस्थानांतर्फे त्या संस्थानाधिपतींनी नरेन्द्र-मंडळाचे प्रतिनिधि म्हणून श्रीमंत राजेसाहेब यांना निवडून दिले, त्यामुळे १९२४ च्या नोव्हेंबर महिन्यात श्रीमंत राजेसाहेब दिल्लीस गेले. नरेन्द्र-मंडळाची बैठक संपल्यावर ता. २३ रोजीं त्यांनी दिल्ली सोडली व अंबाला-सहारणपूर मार्गे ते नैनितालला जाण्यास निघाले. उत्तरेकडील हिमालयाचे देशविभागात ऑक्टोबरमध्ये पाऊस बराच पडतो. पाऊस फार पडल्यामुळे या वेळी नेहमीचा नैनितालला जाण्याचा मार्ग नादुरुस्त झाला होता, म्हणून वर वर्णिलेल्या दूरच्या मार्गाने श्रीमंत राजेसाहेब यांना जावे लागले. २४ ते २७ तारखेपर्यंत नैनिताल येथे मुक्काम करून तेथील प्रेक्षणीय स्थळे, नैनी सरोवर, नैनी देवी वगैरे पाहिली. ज्या ठिकाणाहून बर्फाच्छादित हिमालयाची शिखरे स्पष्ट दिसतात ते 'चीना पीक' पाहिले. ता. २७ रोजी नैनितालहून निघून ता. २८ रोजी दिल्लीस व लगेच ता. २९ रोजी मुंबईस परत आले.

## सांगली

सागलीला एकदा भेट द्यावी अशी श्रीमत राजेसाहेबाना सागली सस्थानचे अधिपति श्रीमत अप्पासाहेब पटवर्धन यानीं विनति केली होती सागली येथील विलिंग्डन कॉलेजचा समारभ नेक नामदार गव्हर्नरसाहेब याच्या हस्ते ता ६ ऑगस्ट १९२४ रोजीं व्हावयाचा होता ती सधि साधून श्रीमत राजेसाहेब ता ५ ऑगस्ट रोजीं सागलीस गेले तेथें त्यानीं श्रीमत सागलीकर याचे पाहुणे म्हणून २ दिवस मुक्काम केला विलिंग्डन कॉलेजच्या उद्घाटन-समारभास ते हजर राहिले तेथील मुक्कामात सागली येथील सर्व प्रेक्षणीय स्थळे पाहिलीं व लोकोपयोगी सस्थाना भेटी दिल्या नेक नामदार गव्हर्नर-साहेबाच्या भेटीमुळे श्रीमत अप्पासाहेब हे जरी गडबडीत होते तरी त्यानीं श्रीमत राजेसाहेबाची सर्व व्यवस्था उत्तम प्रकारची ठेविली होती

हि हा श्रीमत अप्पासाहेब पटवर्धन राजासाहेब सागली याच्या कन्येचा विवाह सागली येथें मे १९२७ मध्ये झाला त्याकरिता निमत्रण आल्यावरून श्रीमत राजेसाहेब सागली येथें लग्नसमारभास हजर राहण्यासाठी गेले होते चालीप्रमाणे अहेर करण्यात आले

## हैद्राबाद

हैद्राबाद येथील श्रीमत राजे शामराज राय रायन् अमानत्वन्त ( हल्ली राजवत) याना श्रीमत राजेसाहेब याची भाची श्री सौ जान्हवीबाई याना देण्यात आले आहे त्याची तब्बेत थोडी नादुरुस्त असल्याचे समजल्यावरून फेब्रुवारी १९२५ चे शेवटचे आठवड्यात श्रीमत राजेसाहेब त्याच्या भेटीकरिता हैद्राबादेस गेले श्री सौ राणीसाहेब हैद्राबादेस बरोबर गेल्या होत्या या मुक्कामात श्रीमत राजेसाहेब यानीं तेथील अलम् उस्मानिया, सागरतलाव, फलाकनामा, वेधशाळा इत्यादि प्रेक्षणीय स्थळे पाहिलीं

## पाईट गांवास श्रीमंतांची भेट

पुणे जिल्ह्यातील पाईट गाव सचिव घराण्यास खासगी इनाम आहे. श्रीमत राजेसाहेब गादीवर आल्यावर २४ नोव्हेबर १९२५ रोजीं प्रथमच या गावास त्यानीं भेट दिली इनामदार फार दिवसानीं गावीं आले तेव्हा गावकऱ्यानीं त्याचे मोठ्या उत्साहाने थाटाचे स्वागत केले, व पानसुपारी केली

चित्रांक १६२



दिवाण-इ-खासमधील नक्षीकाम, दिल्ली किल्ला

[स. पा ८११

तेथें १ दिवस श्रीमतानीं मुक्काम केला होता सर्व गावकऱ्याना ता २५ रोजी जेवण घालण्यात आले

पाईट गावीं पतसचिव घराण्यातील शिवाबाई या स्त्रीची समाधि आहे या बाईचा टाक ( पजा ) पतसचिवाचे देवात करून ठेवण्यात आलेला असून सचिव घराण्यातील पुरुषानीं पाईट येथें निदान एक वेळ तरी जाण्याची वहिवाट पूर्वापार चालत आलेली आहे या पाईट गावाविषयीं अशी एक आख्यायिका तेथें प्रचलित आहे कीं, शकराजी नारायण याचे पूर्वजापैकीं एक कुटुब पाईट येथें उदरनिर्वाहाकरिता येऊन राहिले होते त्याच्याकडे शिवाजी-महाराज रात्रीच्या वेळीं जेवणाकरिता आले त्याच्या पाठीमागे मोंगलाचे धरणे असल्यामुळे त्यानीं आपले नावगाव काहींहि सागितले नाहीं त्याना जेवण घातल्यावर त्या पूर्वजाचे शिवाबाई नावाच्या स्त्रीने त्या दिवशीं भाऊबीज असल्याने शिवाजीमहाराजाना ओवाळिले पुढे त्याना आपण ज्याना ओवाळिले ते महाराज होते, असे समजून अत्यत आनद झाला या शिवाबाई आपल्या नवऱ्याच्या मृत्यूनतर त्याचे शवाबरोबर सती गेल्या ह्या ठिकाणीं लहानसे देऊळ बाधण्यात आले आहे याच घराण्यात जन्मास आलेल्या श्रीशकराजी नारायणास त्याच्या पराक्रमाबद्दल श्रीराजाराममहाराजानीं हेच पाईट गाव इनाम म्हणून दिले. श्रीमत राजेसाहेब यानी वरील भेटीच्या वेळीं या देवळाची डागडुजी करून, त्या ठिकाणीं शिवाबाई आपल्या पतीचे शवाबरोबर सती गेल्या या आशयाचा ‘ स्मृति-फलक ’ लाविला आहे.

## अक्कलकोट

श्रीमत राजेसाहेब पूर्वीं अक्कलकोटला गेले नव्हते. ता २७ मार्च रोजीं अक्कलकोटच्या अधिपतींच्या भगिनी याचा विवाह जतच्या राजेसाहेबाबरोबर व्हावयाचा होता. त्यास निमत्रण आल्यावरून सदरहू सधीचा फायदा घेऊन श्रीमत राजेसाहेब अक्कलकोटला गेले व तेथें लग्नसमारभास हजर राहिले तेथील अक्कलकोटच्या स्वामींची समाधि वगैरे प्रेक्षणीय स्थळे व सस्था याना भेटी देऊन ते दुसरे दिवशी परत आले

## इचलकरंजी

श्रीमत नारायणराव बाबासाहेब घोरपडे, अधिपति सस्थान इचलकरजी, याच्या नातवाचा व्रतबधसमारभ ता २७ जानेवारी सन १९२८ रोजी इचलकरजी मुक्कामीं मोठया थाटाने साजरा करण्यात आला या समारभाकरिता श्रीमत राजेसाहेब इचलकरजीस गेले होते त्या वेळीं श्रीमताना ९ तोफाची सलामी देण्यात आली व्रतबधानिमित्त चालीप्रमाणे अहेर करण्यात आला तेथील मुक्कामात मेजर लॅग, रेसिडेंट कोल्हापूर, याची श्रीमतानी भेट घेतली तसेच इचलकरजी येथील बॉयस्काउटस् व गर्लगाइटस् याचे खेळ श्रीमतानी पाहिले स्काउट व गर्लगाइडचे फडास रु ५० श्रीमतानीं देणगी दिली

## निघोज गांवास भेट

ब्रिटिश हद्दीतील निघोज गावहि पाईटप्रमाणेच पतसचिवाना इनाम आहे हे इनाम श्रीराजारामछत्रपति याचे वेळीच देण्यात आलेले आहे या गावीं श्रीमत राजेसाहेब सन १९२९ साली मार्च महिन्यात गेले होते तेथें ता १०।११ दोन दिवस मुक्काम केला होता या मुक्कामात तेथील गावकरी मडळीना भोजन घालण्यात आले तसेंच या वेळी मागील काही थकबाकी राहिली होती ती सूट दिल्याचे श्रीमतानीं जाहीर केले

## विलायतची सफर

श्रीमत राजेसाहेब याच्या मनात युरोपची सफर करण्याचे ते युवराज असल्यापासून होते परतु सन १९३० पावेतों कोणत्या ना कोणत्या तरी अडचणीमुळे त्याना ही इच्छा पूर्ण करता आली नाही गादीवर आल्यावर आठ वर्षांत राज्यकारभाराची घडी व्यवस्थित बसवून सर्व स्थिरस्थावर झाल्यावर ते ता ३० मे सन १९३० रोजी श्रीमत युवराज याचेसह 'व्हाइसरॉय ऑफ इडिया' बोटीने विलायतेस जाण्यास निघाले जाण्यापूर्वीं सस्थानातील व सस्थानाबाहेरील अशा बऱ्याच प्रमुख सस्थानीं, सस्थानचे अधिकारी व प्रजाजन यानी, व श्रीमताच्या ओळखीच्या सद्गृहस्थानीं श्रीमत राजेसाहेबास प्रेमाने निरोप दिला ता २८ एप्रिल रोजीं भोर येथें श्रीराम-मडपात दरबार भरवून कायदे-मडळाच्या सभासदानीं निरोप दिल्या वेळी श्रीमताचे आभाराचे भाषण झाले, ते परिशिष्ट १६ मध्ये दिले आहे बोटीवर असताना श्रीमत राजेसाहेब याची

चित्रांक १६३



विलायतेंत असताना घेतलेला फोटो ( सन १९३० )

१ रा सा अ रा जोशी, २ रा ब श्री आ सातभाई,
३ श्री. युवराज भाऊसाहेब, ४ श्रीमत राजेसाहेब,

[ स. पा. ८१५

हिंदुस्थानचे भावी सर सेनापति नेक नामदार जनरल सर फिलिप चेटवुड याच्या-बरोबर ओळख झाली लंडनला जाताना मधूनमधून बंदरावर बोट थाबत असे, त्याचा फायदा घेऊन वाटेने त्यानीं एडन व माल्टाची राजधानी व्हॅलेटा, कैरो व ईजिप्तमधील पिरामिडस् वगैरे पाहिले श्रीमत राजेसाहेब ता १७ मे रोजीं लंडन येथें पोहोचले व्हिक्टोरिया स्टेशनवर स्टेट सेक्रेटरीचे पोलिटिकल ए डी सी कर्नल एस. बी पॅटरसन हे श्रीमताचे स्वागत करण्यास आले होते स्टेट सेक्रेटरीच्या कौन्सिलचे सभासद डॉ आर पी पराजपे हेहि स्टेशनवर आले होते लंडन येथें मेट्रोपोल हॉटेलमध्ये राहण्याची श्रीमत राजेसाहेबानां सोय केली होती लंडन येथें श्रीमत राजेसाहेबानीं दोन महिने मुक्काम केला. त्या अवधींत पुढील महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्या

ता २८ मे १९३० रोजी बकिंगहॅम राजवाड्यात रॉयल कोर्ट भरविण्यात आले त्या वेळी श्रीमत राजेसाहेब व श्रीमत युवराजसाहेब हे हजर राहिले होते बादशहाची तब्बेत थोडी नादुरुस्त झाल्यामुळे महाराणीसाहेब ह्याचेच अध्यक्षतेखाली वरील समारभ झाला त्या वेळीं श्रीमत राजेसाहेब याना महाराज्ञीसाहेबाना भेटून त्याच्याविषयींची आपली राजनिष्ठा व पूज्यबुद्धि व्यक्त करण्याची संधि मिळाली

ता १८ जून १९३० रोजी ॲस्कॉट येथील रेसचे वेळीं बादशहा व महाराणी याचेबरोबर श्रीमत राजेसाहेबाना लंच घेण्याचा लाभ मिळाला

ता २८ जून १९३० रोजी बादशहाचे बरोबर श्रीमत राजेसाहेबाची भेट झाली ता २४ जुलै रोजी बकिंगहॅम राजवाड्यात रॉयल गार्डन पार्टीस श्रीमत राजेसाहेब गेले होते

ता १३ जून रोजी प्रिन्स ऑफ वेल्स ( हल्लीचे ड्यूक ऑफ विंडसर ) व ता २८ जून रोजी ड्यूक ऑफ कॅनॉट याच्या श्रीमत राजेसाहेब यानी भेटी घेतल्या

बादशहा, प्रिन्स ऑफ वेल्स व ड्यूक ऑफ कॅनॉट याना श्रीमत राजेसाहेबानीं भोर संस्थानच्या इतिहासाची एक एक प्रत भेट म्हणून पाठविली

ता ८ जुलै सन १९३० रोजी इंडिया हाउसचा उद्घाटनसमारभ बादशहाचे हस्ते झाला, त्या वेळी श्रीमत राजेसाहेब हजर राहिले होते

श्रीमत राजेसाहेब यानीं ‘ हाउस ऑफ कॉमन्स ’ व ‘ हाउस ऑफ लॉर्डस् ’ याच्या बैठकींच्या वेळीं हजर राहून तेथें होणारी चर्चा ऐकली तसेच स्टेट सेक्रेटरी दि राइट ऑनरेबल मि वेजवुड बेन, अडर सेक्रेटरी मि एस एफ स्टुअर्ट व लॉर्ड रसेल, पार्लमेटचे काही सभासद, इडिया कौन्सिलचे सभासद सर अतुल चतर्जी, हायकमिशनर, याच्याकडे डिनर व लच घतले व ते गृहस्थहि डिनर व लचला श्रीमत राजेसाहेब याजकडे आले होते

तसेच माजी गव्हर्नर्स लॉर्ड लॅमिग्टन, लॉर्ड सिडनहॅम, लॉर्ड लॉइड, सर लेस्ली विल्सन, इत्यादि आणि व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिंज व लॉर्ड रीडिंग व पोलिटिकल एजटस् मि स्विफ्ट, मि शेपर्ड व इतर कमिशनर याच्या भेटी घेतल्या ऑक्सफर्ड, केंब्रिज व विंचेस्टर येथील कॉलेजें पाहिली. तसेच लडन येथील अनेक सस्था, प्रेक्षणीय स्थळे, ग्रथालये, पदार्थसग्रहालये वगैरे पाहिली त्या दोन महिन्यात होणारे ‘ट्रूपिंग दी कलर’, डर्बी व अॅस्कॉट रेसेस, टॅटू, एअर-फोर्स डिस्प्ले आणि लॉर्डच्या व विंबेल्डन येथील मॅचेस वगैरे पाहिल्या

हॉटेल मेट्रोपोलमध्ये डयूक ऑफ कॅनॉट याच्या अध्यक्षतेखाली ब्रिटिश इडियन युनियनने ता ८ जुलै रोजीं लच दिला त्या लचला श्रीमत राजेसाहेब गेले होते त्या वेळीं लॉर्ड रीडिंग यानीं टोस्टचे भाषण केले, त्यात श्रीमत राजे-साहेब याच्या भेटीचा उल्लेख केला.

लडन सोडण्यापूर्वी ईस्ट इडिया असोसिएशनतर्फें श्रीमत राजेसाहेबानी ता. २३ जुलै रोजीं दुपारीं चहापार्टी (आफ्टरनून रिसेप्शन) दिली त्या वेळी The Indian Princes and The Present Constitution या विषयावर एक महत्त्वाचे भाषण केले. ( परिशिष्ट ७ पहा )

ता. २५ जुलै रोजीं लडनहून निघून मॅचेस्टर, लिव्हरपूल, साउथपोर्ट, ब्लॅकपूल, विंडरमिअर, ग्लासगो, ओबन, आयर, बेलफास्ट, डब्लिन, लिमिंग्टन-स्पा व स्ट्रॅटफोर्ड-ऑन-अॅव्हॉन इत्यादि शहराना भेट देऊन तेथील सृष्टिसौंदर्यपरिपूर्ण प्रदेश, सरोवरे व प्रेक्षणीय स्थळे पाहून १४ ऑगस्ट रोजीं श्रीमत राजेसाहेब लडनला परत आले

चित्रांक १६४



लडन येथील पार्लमेन्ट गृह

[स पा. ८१६

# युरोपमधील इतर देशांतून प्रवास

श्रीमत राजेसाहेब यानी फ्रान्समधील पॅरिस या शहरीं, जर्मनीतील कलोन व बर्लिन, ऑस्ट्रियातील प्राग आणि व्हिएन्ना या शहरी काही दिवस मुक्काम केला नतर स्वित्झर्लंडमधील झूरिच, ल्यूसर्न, इटरलाकन आणि जिनीव्हा व इटलीतील व्हेनिस, फ्लॉरेन्स, नेपल्स, रोम आणि जेनोआ इत्यादि शहरास भेटी देऊन फ्रान्सच्या दक्षिण किनाऱ्यावरील मॉंटे कार्लो आणि नाइस या शहरी जाऊन मार्सेलिस येथें परत आले आणि ता १० ऑक्टोबर रोजी हिंदु-स्थानास परत येण्याकरिता फ्रान्सचा किनारा एस् एस् रझमाक या बोटीने सोडला

पॅरिस येथें मुबई एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलचे माजी सभासद सर जॉर्ज कर्टिस हे ब्रिटिश व्हॉइस-कॉन्सल होते त्याची आणि बडोद्याचे माजी महाराज श्रीमत सयाजीराव गायकवाड याची भेट श्रीमत राजेसाहेबानी घेतली

व्हिएन्ना येथें ब्रिटिश मिनिस्टर सर फिप्स यानी श्रीमत राजेसाहेबाना लचला बोलाविले होते. व्हिएन्ना येथें बगालमधील त्रिपुरा सस्थानचे महाराज युरोपचे सफरीवर आले होते त्याची व श्रीमत राजेसाहेब याची गाठ पडली

रोम शहरी हिज होलिनेस दि पोप याची श्रीमत राजेसाहेब यानी भेट घेतली या भेटीचे स्मरणार्थ त्यानी श्रीमत राजेसाहेबाना एक मेडल दिले त्यावर पोपचा फोटो कोरलेला आहे

हिंदुस्थानच्या स्टेट सेक्रेटरीचे पोलिटिकल ए डी सी यानी श्रीमताच्या आगमनाबद्दल श्रीमतानी ज्या ज्या देशातून प्रवास केला त्या त्या ठिकाणच्या सरकाराना आगाऊच कळविले असल्यामुळे प्रवासात तेथील स्थानिक अधिकाऱ्याकडून श्रीमत राजेसाहेबाना सर्व प्रकारच्या सवलती मिळाल्या व प्रवास सुखकर झाला

फ्रान्स सरकारतर्फे त्याच्या पोलिसखात्याचा अधिकारी श्रीमत राजे-साहेब पॅरिस सोडीपर्यंत त्याच्या तैनातींत होता आणि व्हिएन्ना येथील, इटाली-तील आणि दक्षिण फ्रान्समधील सर्व शहरातील पोलिस अधिकारी सर्व प्रवासात श्रीमत राजेसाहेब याच्या सुखसोईकडे—रेल्वेतून सुद्धा—काळजीपूर्वक लक्ष पुरवीत होते

फ्लॉरेन्सचे प्रिफेक्ट ( Count Guiseppe, Dell a Gherudesu, Senator Del Regno, Potestodi Firenze ) आणि त्याचे डेप्युटी हे फ्लॉरेन्सला गेल्या वेळीं श्रीमताचे स्वागताकरिता आणि तेथून निघाल्या वेळी निरोप देण्यास स्वत हजर होते

पॅरिस येथें श्रीमत राजेसाहेबानी नेपोलियनचे थडगे, बर्लिन येथें कृत्रिम आकाशगगा ( Planetarium ), आर नदीची दरी, व पर्वतावरील रेल्वे आणि पर्वताचीं बर्फाच्छादित शिखरे, स्वित्झर्लंडमधील व्हेनिस येथील जलमार्ग, पाण्यातून चालणारे पडाव ( गोंदुला Gondola ) आणि काचेचे कारखाने, फ्लॉरेन्समधील शिल्पकाम आणि नक्षिकाम ( Mosaic ), नेपल्स येथील ज्वालामुखी, पॉम्पि शहराचा उत्खनित प्रदेश आणि तेथील ऐतिहासिक पुराण-वस्तुसग्रह, रोम येथील मिचेल एन्जेलो या प्रख्यात शिल्पकारानें बाधलेले सेंट पिटरचे कॅथेड्रल, शववापिका ( The Catacombs ), व्हिक्टर इमॅन्युअल स्मारक, फवारे, आणि फ्रान्स व इटालीचा रिव्हीएरा, आणि व्हर्साइल पॉटस्डॅम व शोनब्रुन येथील राजवाडे इत्यादि अनेक स्थळे पाहिली

जिनीव्हा येथे श्रीमत राजेसाहेबाचा मुक्काम असताना राष्ट्रसघाची बैठक चालू होती या बेठकीपैकीं काहीं सभाना श्रीमत राजेसाहेब हजर राहिले जिनीव्हा येथील आतरराष्ट्रीय मजूरसघाचे कचेरीस त्यानी भेट दिली या सस्थेचे डायरेक्टर एम् आल्बर्ट-थॉमस यानीं या सस्थेंत चालणाऱ्या काम-काजाची माहिती श्रीमताना सागितली

राष्ट्रसघाचे बैठकीस सस्थानिकाचे प्रतिनिधी म्हणून या वेळी बिकानेरचे महाराज येथे आलेले होते त्याची श्रीमत राजेसाहेबानी भेट घेतली व हिदुस्थानच्या प्रतिनिधींनी दिलेल्या डिनरपार्टीस व इग्लडचे परराष्ट्रीय मत्री मि हेडरसन यानीं दिलेल्या ॲटहोम पार्टीस श्रीमत राजेसाहेब हजर राहिले होते

रोम येथे जिनीव्हाप्रमाणे एक आतरराष्ट्रीय शेतकी सस्था आहे, ती सस्थेचे अध्यक्ष व सेक्रेटरी यानीं श्रीमत राजेसाहेब याना दाखविली

वर वर्णन केल्याप्रमाणे सुमारे सहा महिनेपर्यंत प्रवास करून ता २३ ऑक्टोबर रोजीं श्रीमत राजेसाहेब मुबईस आले. त्या वेळीं बेलार्डपिअरवर

चित्राक १६५



जुग्फ्रा शिखरावर श्रीमत राजेसाहेब व बरोबरची मडळी स्लेज गाडीत बसली आहेत
१ मि सावे, २ भाऊराव पारखी, ३ शकर महाशब्दे, ४ अ रा जोशी, ५ श्री राजेसाहेब
[स पा ८१८

चित्राक १६६



जुग्फ्रो शिखरावर बर्फामध्ये खोदलेली प्रेक्षणीय गुहा
[स पा ८१८

चित्राक १६७



व्हेसूव्हिअस ज्वालामुखी पर्वत
[स पा ८१८

श्री सौ राणीसाहेब, श्री सौ जान्हवीबाई, आप्त, स्नेही, संस्थानचे अधिकारी, काहीं सार्वजनिक संस्थाचे प्रतिनिधी यानी पुष्पहार समर्पण करून त्याचे स्वागत केले मुंबई सरकारचे अंडरसेक्रेटरी मि मॅकइल्हेनी, आय सी एस्, हे सरकारतर्फे स्वागत करण्यास आले होते त्या वेळी ९ तोफाची सलामी देण्यात आली

ता २४ रोजी श्रीमंत राजेसाहेब पुण्यास आले तेथे मुंबई सरकारचे पो सेक्रेटरी मि सी डब्ल्यू ए टर्नर, पो ए मि इ डब्ल्यू पेरी, पुणे शहर म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष रा ब हणमंतराम रामनाथ आणि काही सरदार मंडळी यानी त्याचे स्वागत केले

त्यानंतर ता १० नोव्हेंबर १९३० रोजी श्रीमंत राजेसाहेब यांनी विलायतचे प्रवासाहून आल्यावर भोर शहरात प्रथम प्रवेश केला त्या वेळी सर्व नागरिकांनी अत्यंत उत्साहाने त्याचे स्वागत केले व त्याना पुष्पहार समर्पण केले भोर म्युनिसिपालिटीने त्याचे सन्मानार्थ दरबार भरवून मानपत्र अर्पण केले

१९३१ च्या नोव्हेंबरचे ६ तारखेस श्रीमंताचे विनंतीवरून नेक नामदार सर फ्रेडरिक साइक्स यांनी भोरला दुसरी भेट दिली व पुलाची कोनशिला बसविण्याचा समारंभ झाला, त्या वेळी केलेल्या भाषणात श्रीमंताच्या विलायतचे सफरीसंबंधी खालील उद्गार काढले ते म्हणाले —

"As this is my first visit to Bhor since you yourself returned from the European tour which in company with the Yuwaraj you undertook during the summer of last year, this is a fitting occasion for me in my turn, to congratulate you on the successful accomplishment of an enterprise which, I am sure, must have enlarged your experience in many ways both interesting and valuable to you as a Ruler"

## सोलापूर

श्रीमंत राजेसाहेबाना प्रकृतिस्वास्थ्याकरिता कोरड्या हवेचे ठिकाणी राहावे असा वैद्यकीय सल्ला पडल्यावरून श्रीमंत राजेसाहेब ता २ ऑगस्ट १९३२ रोजी सोलापूर येथे काही दिवस राहावयास गेले सोलापूर येथे

पाऊस फार कमी पडतो व तेथील हवा फार कोरडी असते तेथे मोदीखान्या-जवळ चडक याचे बगल्यात श्रीमत राजेसाहेब राहिले या मुक्कामात तेथील देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणसस्थेस श्रीमत राजेसाहेब यानी ता १३ रोजी भेट दिली त्या वेळीं सस्थेच्या चालकानी श्रीमत राजेसाहेबाचा सत्कार करून पानसुपारी केली सस्थेने हातीं घेतलेल्या कार्यक्रमास मदत म्हणून रु ३०० श्रीमतानीं देणगी दिली सोलापूर येथील सर्वात जुनी गिरणी ‘ मुरारजी गोकुळदास मिल्स ’ पाहिली तसेच मॅकॉनकी थिएटर, मार्केट, डॉ चाटी अनाथ विद्यार्थिगृह वगैरे पाहिली त्या सस्थेने श्रीमताना मानपत्र दिले त्या वेळी श्रीमतानी आभारप्रदर्शक भाषण करून सस्थेस रु ३०० ची देणगी दिली ता १४ रोजीं टिकेकरवाडी येथील टेक्स्टाइल ॲण्ड मेटल फॅक्टरी पाहिली श्रीमत राजेसाहेब ता १६ रोजीं परत पुण्यास आले

## कारवार व गोव्याची सफर

१९३२ मध्ये श्रीमत राजेसाहेब याचे स्नेही रा रा कोडो महादेव कुमठेकर, बी ए , एलएल. बी., हे कारवार येथें डिस्ट्रिक्ट ॲन्ड सेशन्स जज्जाचे काम करीत होते. हा प्रात सृष्टिसौंदर्याविषयी प्रसिद्ध आहे तो प्रदेश पाहण्याकरिता यावे अशी श्रीमत राजेसाहेब याना त्यानी विनति केल्यावरून श्रीमत राजेसाहेब यानीं कारवार, गैरसप्पा, गोकर्ण व गोवा हे प्रदेश पाहण्याचे ठरविले ता २१ ऑक्टोबर १९३२ रोजीं श्रीमत राजेसाहेब श्रीमत युवराज याचेसह बरोबर जरूरीपुरती मडळी घेऊन वरील प्रवासास जाण्याकरिता पुण्याहून निघाले दुसरे दिवशीं सकाळी सर्व मडळी बेळगाव येथें पोहोंचली बेळगाव स्टेशनवर श्रीमत अण्णासाहेब बुध्याळकर आले होते ठळकवाडी येथील त्याचे बगल्यात दुपारचे भोजन करून सायकाळी मुक्कामास धारवाड येथें श्रीमत राजेसाहेब आले धारवाड येथें सरदार आबासाहेब हेबळीकर याचेकडे मुक्काम केला दुसरे दिवशीं सकाळी भोजनोत्तर सर्व मडळी मोटारने कारवारकडे जाण्यास निघाली. वाटेनें सृष्टिसौंदर्य पाहत पाहत सर्व मडळी कारवारास पोंचली धारवाडपासून कारवार १०६ मैल लाब आहे रा रा कुमठेकर सामोरे आले होते श्रीमत राजेसाहेबानी कारवार येथें ग्रॅड हॉटेलमध्ये मुक्काम केला दोन दिवस मुक्काम करून आसपासचे विभागातील नयनाल्हादक

चित्रांक १६८




कृत्रिम आकाशगगा गृह, बर्लिन (Planetarium) [स पा ८१८

चित्रांक १६९




बाकगहम राजवाडा, लडन [स. पा. ८१६

सृष्टिसौंदर्यनिरीक्षण केले रा. रा कुमठेकर याचा पाहुणचार स्वीकारला ता. २६ रोजीं भोजनोत्तर श्रीमत राजेसाहेब रा कुमठेकर याना बरोबर घेऊन सर्व मडळीसह गैरसप्पा धबधबा पाहण्यास गेले तेथें धबधबा व इतर प्रेक्षणीय स्थळे पाहून ता २७ रोजी गोकर्ण-महाबळेश्वर येथें मुक्कामास आले ता २८ रोजी श्रीमहाबळेश्वराची पूजा-अर्चा, ब्राह्मणभोजन वगैरे झाल्यावर तेथील तालुका लोकल बोर्डाचे अध्यक्ष रा गोपी व रिटायर्ड मामलेदार रा जोगळेकर याच्या पानसुपारीचा स्वीकार करून श्रीमत राजेसाहेब सर्व मडळीसह परत कारवार येथे आले तारीख ३० रोजी कारवारहून निघून धारवाडास परत येऊन तेथील डाक बगल्यात मुक्काम केला ता ३१ रोजी सकाळी १० वाजता रेल्वेने गोव्याकडे जाण्यास श्रीमत राजेसाहेब निघाले वाटेत दुधसागर नावाचा एक धबधबा लागतो सायकाळी ७ वाजता वास्को-ड गामा या गोव्यातील शहरी गाडी पोंचते तेथे ४ दिवस मुक्काम करून दररोज मोटारीतून हिंडून गोव्यातील पणजीच्या आसपासची सृष्टिसौंदर्याविषयी प्रसिद्ध असलेली सर्व प्रमुख व प्रेक्षणीय स्थळे श्रीमत राजेसाहेब यानी पाहिली गोव्यात खिस्ती चर्चेस व हिंदूची जुनी देवालये फार प्रसिद्ध आहेत तेथील मुक्कामात मार्मागोवा येथील ब्रिटिश कॉन्सल व पोर्तुगीज इडियाचे गव्हर्नर-जनरल याच्या अनुक्रमे ३ व ४ तारखेस श्रीमत राजेसाहेबानीं भेटी घेतल्या ता ५ रोजीं वास्को-ड-गामाहून निघून दुसरे दिवशी सर्व मडळीसह श्रीमत राजेसाहब पुण्यास सुखरूप येऊन पोंचले

## दिल्ली-हरिद्वार प्रवास

श्रीमत राजेसाहेब दरसालप्रमाणे ९ मार्च १९३३ रोजी दिल्ली येथे नरेंद्र-मडळाचे बैठकीस हजर राहण्याकरिता गेले तेथे २५ तारखेपर्यंत मुक्काम करून नरेंद्र-मंडळातील सर्व काम सपल्यावर श्रीमत राजेसाहेब सर्व मडळीसह ता. २६ मार्च रोजी हरिद्वाराला गेले तेथे इदूर कोठीत मुक्काम केला तेथून हृषीकेशला जाऊन लक्ष्मण-झूला पाहिला. गुरुकुल व ऋषिकुल या शिक्षण-सस्थाना भेटी दिल्या हरिद्वाराहून श्रीमत राजेसाहेब बनारसला आले तेथे तीर्थविधि करून ता २ एप्रिल रोजी सर्व मडळीसह श्रीमत राजेसाहेब पुण्यास परत आले. या प्रवासात श्री युवराज भाऊसाहेब बरोबर होते

## कोल्हापूर-कुरुंदवाड

दक्षिणेतील सर्व सस्थानाचा एक गट (Agency) बनवून ती सर्व सस्थाने मुबई सरकारचे ताब्यातून काढून हिंदुस्थान सरकारचे ताब्यात ता १ एप्रिल १९३३ पासून घेण्यात आली या सस्थानावर आजपर्यंत जिल्हा कलेक्टरची पो ए या नात्याने देखरेख असे त्याऐवजी कोल्हापूरचे रेसिडेट याना 'एजट टू दि गव्हर्नर-जनरल फॉर डेक्कन स्टेटस् एजन्सी' हा नवीन हुद्दा देऊन सर्व सस्थाने त्याचे देखरेखीखाली देण्यात आली नवीन घटनेने झालेले ए जी जी याना एजन्सींतील सर्व अधिपतीनी ता ६ एप्रिल सन १९३३ रोजी मानपत्र दिले त्याकरिता श्रीमत राजेसाहेब कोल्हापूर येथें गेले मानपत्र-समारभ झाल्यावर सर्व सस्थानाधिपतीना ए जी जीं नी लच दिला ता ७ रोजीं श्री राजेसाहेबानीं श्रीमत छत्रपति राजाराममहाराज याची भेट घेतली या मुक्कामात श्रीमत राजेसाहेब यानी कोल्हापूर येथील श्रीमहालक्ष्मीचे देवालय, रकाळा व पद्माळा ही तळीं, रेमकोर्स, टाउन हॉल, शेतकीची शाळा, प्रदर्शन इत्यादि पाहिलीं श्रीमत राणीसाहेब रीजट कुरुदवाड सीनिअर याच्या विनतीवरून श्रीमत राजेसाहेब कुरुदवाडला गेले होते त्यानी श्रीक्षेत्र नरसिहवाडी येथील श्रीदत्तात्रयाचे दर्शन घेतले ता ८ रोजी श्रीमत राजेसाहेब कुरुदवाड येथून निघून ता ९ रोजी पुण्यास आले

रेसिडेटचे ठाण्याचे गाव कोल्हापूर हे करण्यात आल्यामुळे कामकाजा-निमित्त त्याचे भेटीस श्रीमत राजेसाहेबाना कोल्हापूर येथें जावे लागते त्या बहुतेक प्रसगीं मे रेसिडेटसाहेब श्रीमत राजेसाहेबाना लचला बोलावीत असतात

## माथेरानचा प्रवास

नोव्हेबर १९३३ मध्ये श्रीमत राजेसाहेब, श्रीमत राजकुमार बापूसाहेब, रावसाहेब व श्रीमत राजकुमारी पद्मावतीराजे याचेसह ता १८ रोजी माथेरानला गेले तेथील सेट्रल हॉटेलच्या मालकीच्या एका बगल्यात राहण्याची व्यवस्था करण्यात आली होती माथेरान येथें रिक्षा नावाचे वाहन वापरतात रिक्षेतून त्यानी अलेक्झाड्रा पॉइट, स्प्रिग पॉइट आणि मार्झरी नूक इत्यादि पाहिले तसेच कपाडिया मार्केट, श्रीराममदिर, व डेजर पॉइट, शार्लट लेक, सेलिय पॉइट, एडवर्ड दि सेव्हन्थ पॉइट, एको पॉइट, लॅडस्केप पॉइट व लॉन्सा

चित्रांक १७०



गिरसप्पा धबधब्याजवळ–१ श्रीमंत राजेसाहेब, २ श्री. के. भिडेमास्तर.

[ स. पा. ८२०

चित्रांक १७१



दुधसागर धबधबा ( गोवा )

[ स. पा ८२१

पॉइंट वगैरे पाहिले ता २० रोजीं दुसरे पॅनोरमा पॉइंट, माउंट बेरी पॉइंट, कॉरोनेशन पॉइंट, मॅलेट स्प्रिंग व रुम्बीपार्क इत्यादि पॉइंट व प्रेक्षणीय स्थळे पाहून ता २३ रोजीं श्रीमंत राजेसाहेब पुण्यास परत आले श्री रा वासुदेव गोपाळ पुराणिक व श्री सौ अम्मासाहेब ही दोघे या प्रवासात बरोबर होतीं

## ग्वाल्हेर

श्रीमंत राजेसाहेब अक्कलकोट यांचा विवाह २३ फेब्रुवारी १९३४ रोजी ग्वाल्हेर येथें महाराजसाहेब ग्वाल्हेर यांच्या भगिनी श्रीमंत राजकुमारी कमला-राजे यांच्याशी झाला विवाहसमारंभाकरिता श्रीमंत राजेसाहेब यांना उभय पक्षाकडून निमंत्रण आली होती श्रीमंत राजेसाहेब ता १२ फेब्रुवारी १९३४ रोजी नरेंद्र-मंडळाचे बैठकीस हजर राहण्याकरिता दिल्लीस गेले होते या महिन्यातच विवाह असल्यामुळे त्याकरिता विवाहसमयीं हजर राहण्याची श्रीमंतास इच्छा होती, परंतु दिल्ली येथें ता २३ रोजीच हर एक्सलन्सी कौंटेस ऑफ विलिंग्डन यांची भेट ठरली असल्यामुळे ते त्या दिवशीं मुख्य समारंभास हजर राहू शकले नाहीत तथापि, श्रीमंत महाराजसाहेब ग्वाल्हेर व श्रीमंत राजेसाहेब अक्कलकोट हे दोघेहि नाखुष होऊ नयेत म्हणून ता २७ रोजी श्रीमंत राजेसाहेब ग्वाल्हेरला गेले तेथें श्रीमंत राजेसाहेब यांना ९ तोफांची सलामी देऊन स्वागत करण्यात आले ग्वाल्हेरच्या महाराजांनी आपल्या प्रधान-मंडळीसमवेत येऊन श्रीमंतांचे स्वागत स्टेशनवर केलें त्याच दिवशीं दुपारी दरबार हॉलमध्ये महाराजसाहेबांची भेट होऊन एकमेकांना अहेर करण्यात आले ता १ मार्च रोजीं श्रीमंत राजेसाहेब यांनी अक्कलकोटच्या डॉवेजर राणीसाहेब व श्रीमंत राजेसाहेब यांच्या भेटी घेतल्या व अहेर केला

या ग्वाल्हेरच्या मुक्कामात श्रीमंत राजेसाहेब यानीं तेथील प्रसिद्ध ऐतिहासिक स्थळे, ग्वाल्हेरचा किल्ला, मानसिंग राजवाडा, सास-बाहू देवालये, सरदार स्कूल, मुरादच्या कैदेची जागा, डोंगरात खोदलेल्या गुहा व बुद्धाचे मोठमोठे पुतळे, टाउन हॉल, जुना राजवाडा, सिटी मार्केट व पदार्थसंग्रहालय इत्यादि पाहिली ता १ रोजी ग्वाल्हेरहून निघून श्रीमंत राजेसाहेब दुसऱ्या दिवशी पुण्यास आले त्या वेळीं ९ तोफांची सलामी देण्यात आली व स्टेशनवर

सरदार श्रीमत सर अप्पासाहेब शितोळे, एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलचे सभासद घोरपडे आणि कर्नल हस्कर हे निरोप देण्यास आले होते

## हैद्राबाद

श्रीमत राजेसाहेब ता १६ फेब्रुवारी १९३५ रोजीं हैद्राबाद (निजाम) येथे गेले स्टेशनवर श्रीमत राजे शामराज रायरायन राजवन्त बहादुर हे श्री सौ जान्हवीबाईसह स्वागताकरिता आले होते राजे शामराज याच्या बजारा रोड-वरील बगल्यात श्रीमत राजेसाहेबाचा मुक्काम होता त्यानी राजे शामराज यानी आपले शालीबडा येथील वाड्यात तयार केलेले वाचनालय पाहिलें त्यातील पुस्तकाचा सग्रह फार मोठा आहे तेथील इम्प्रूव्हमेंट ट्रस्टने गरीब लोकाकरिता बाधलेली घरे पाहिली व दुसरे दिवशीं पुण्यास परत आले

यानतर सप्टेबर महिन्यात श्री राजे शामराज व श्री सौ जान्हवीबाई याच्या ज्येष्ठ कन्येचे प्रसूतीनतर तब्बेत बिघडून दुखणे विकोपास गेले त्या मुलीच्या समाचाराकरिता ता ९ सप्टेबर सन १९३५ रोजीं श्रीमत राजेसाहेब हैद्राबादेस जाऊन भेट घेऊन परत आले ही मुलगी श्री सौ शारदाराजे पुढे ८-१० दिवसात ता १९ रोजी निवर्तली हिचे बालपण सर्व भोर येथें कै श्री रावसाहेब व कै श्री सौ जिजीसाहेब याच्या प्रेमळ छत्राखाली गेले असल्याने त्याचा तिला फार लळा होता श्रीमत राजेसाहेब याचेबद्दलहि तिला फार आदर व प्रेम वाटत असे त्यामुळे तिच्या अकाली निधनाने श्रीमत राजेसाहेब याना फार वाईट वाटले

श्री सौ शारदाराजे याच्या निधनानतर श्रीमत राजेसाहेब याना हैद्राबादेस श्री सौ जान्हवीबाईस व श्रीमत राजेसाहेब शामराज याच्या भेटीस जाण्यास कामकाजामुळे सवड झाली नाही थोडी सवड मिळताच डिसेबर सन १९३५ च्या २५ तारखेस ते हैद्राबादेस गेले व तेथें ता १ जानेवारी सन १९३६ पावेतों मुक्काम केला त्या वेळी बजारा हिलवरील श्रीमत राजे शामराज याच्या बगल्यात त्यानी मुक्काम केला होता श्रीमत सौ जान्हवी-बाई यानी श्रीमत राजेसाहेब याना दोन चहाचे सेट भेट दिले या मुक्कामात त्यानी हैद्राबाद येथील टाउन हॉल, सार्वजनिक बगीचा व हि ए हा निझाम-साहेब याच्या लवकरच होणाऱ्या रौप्यज्युबिलीनिमित्त उभारण्यात आलेले त्या

चित्राक १७२



श्रीमगेशाचे देवालय, गोवा. [स. पा. ८२१

चित्राक १७३



श्रीशातादुर्गादेवीचें देवालय, गोवा. [स. पा. ८२१

**चित्रांक १७४**



दी ऑल्टर ॲण्ड टुब ऑफ सर फ्रॅन्सिस झेविअर, गोवा.

[स. पा. ८२०

**चित्राक १७५**



दी श्राइन ऑफ सेन्ट फ्रॅन्सिस झेविअर, गोवा

[स पा. ८२०

उद्यानातील स्मारक इत्यादि ता २६ डिसेंबर रोजीं पाहिले ता २७ रोजी उस्मानसागर व गादीपेठ येथील हिमायत सागर हे तलाव हैद्राबादेपासून सुमारे १२ मैल लाब आहेत ते पाहून आले ता १ रोजीं श्रीमत राजेसाहेब पुण्यास परत आले

## जमखिंडी

श्रीमत राजेसाहेब जमखिंडी येथें श्रीमत आप्पासाहेब पटवर्धन, अधिपति संस्थान जमखिंडी, याच्या मुलाचे उपनयनसमारभास श्रीमत युवराज याचेसह ता ५ मार्च सन १९३५ रोजी गेले श्रीमत सरदार रास्ते यानी श्रीमत राजेसाहेबाचे स्वागत केले ९ तोफाची सलामी देण्यात आली पोलो पॅलेसमध्ये श्रीमताचा मुक्काम होता ता ६ रोजी दुपारी श्रीमतानी तेथील सरकारी इमारती व प्रेक्षणीय स्थळे पाहिलीं त्यात क्लब, रामतीर्थ पॅलेस, पोहण्याचा तलाव, त्रिपुरा देवाचे देवालय, दरबार हॉलची इमारत, श्रीमेहेरलिंगाप्पा नावाचे श्रीशकराचे देवालय इत्यादि प्रमुख होतीं ता ७ रोजीं उपनयन समारभास श्रीमत राजेसाहेब हजर राहिले या समारभानिमित्त श्रीमत राजे-साहेबानी अहेर केला दुपारी श्रीमत राजेसाहेब जमखिडी यानीं अहेर परत दिला दुपारी भोजनोत्तर श्रीमत राजेसाहेब जमखिडीहून निघून दुसरे दिवशी सकाळी पुण्यास आले

## औंध

औंधचे अधिपति बाळासाहेब याचे निमत्रणावरून व तेथें 'भवानराव' गौरव-ग्रथाच्या इग्रजी भाषातराची प्रत श्रीमत बाळासाहेब याना अर्पण करण्या-बद्दल पुण्याचे भाडारकर प्राच्यविद्यासशोधनमदिरातील प्रो ताडपत्रीकर यानी श्रीमताना विनति केल्यावरून श्रीमत राजेसाहेब श्रीमत युवराजसाहेब याच्यासह ता २२ मार्च सन १९३५ रोजी मोटारने औंधला गेले भोराहून औंध ७० मैल आहे औंध येथें श्रीमत बाळासाहेब यानी त्याचे स्वागत केले व त्याच्या सन्मानार्थ दरबार भरविण्यात आला सर्व दरबारी अधिकाऱ्याची ओळख करून देण्यात आल्यावर श्रीमत बाळासाहेब यानी श्रीमत राजेसाहेबाना साडेतीन वस्त्राचा पोषाख अर्पण केला श्रीमत युवराजसाहेबाना शेला देण्यात आला रात्री भोजनोत्तर राजवाड्यानजीकचे नाटकगृहात शाळेतील विद्यार्थ्यानी केलेल्या

‘ स्वर्गावर स्वारी ’ या नाटकाचा प्रयोग पाहिला दुसरे दिवशीं सकाळीं शिवजयन्ति उत्सवानिमित्त श्रीशिवाजीमहाराज याच्या रुप्याचे मूर्तीची पालखीतून लवाजम्यानिशी थाटाने मिरवणूक काढण्यात आली मिरवणुकींत श्रीमत बाळासाहेब याचेबरोबर श्री राजेसाहेब, श्रीमत युवराज व पतप्रतिनिधि याचे घराण्यातील सर्व मडळी होती मिरवणूक श्रीयमाईचे देवालयात पोचल्यावर तेथें बडोद्याचे वकील श्री रा वासुदेव विनायक जोशी, वामनशास्त्री किंजवडेकर, रगाचार्य रड्डी वगैरे वक्त्याचीं भाषणे झाली दुपारीं श्री रा बाबासाहेब देशपाडे यानी मराठ्याचा स्वार्थत्याग यावर व्याख्यान दिले नतर श्रीमत बाळासाहेब पतप्रतिनिधि याना ‘ भवानराव ’ गौरव ग्रथाचे इग्रजी भाषातराची प्रत श्रीमत राजेसाहेब याच्या हस्ते अर्पण करण्याचा समारभ झाला श्रीमत राजेसाहेबानी छोटेसे भाषण करून वरील पुस्तकाची प्रत श्रीमत बाळासाहेब याना अर्पण केली श्रीमत बाळासाहेब यानी तिचा स्वीकार करून आभारदर्शक भाषण केले तिसरे प्रहरी श्रीमत राजेसाहेब व श्रीमत युवराज यानीं औंधपासून सुमारे १।। मैल लाबीवर असलेल्या टेकडीवरील श्रीयमाईदेवीचे दर्शन घेतले रात्री श्रीमत बाळासाहेब यानी स्वत कीर्तन केले त्यास श्रीमत राजेसाहेब हजर राहिले होते कीर्तनाचा विषय ‘ श्रीशिवाजीमहाराजाची आग्र्याहून सुटका ’ असा होता

या औंधचे मुक्कामात श्री रा सदाशिवराव आळतेकर, वासुदेवराव जोशी वकील बडोदे, ठाण्याचे मोडक वकील, श्रीखडे, रड्डीशास्त्री, श्री दा सातवळेकर, लक्ष्मणराव किर्लोस्कर, गुरुनाथराव ओगले, करमरकर व सातारचे डिस्ट्रिक्ट आणि सेशन्स जज्ज मि लाड, आय् सी एस् , हे श्रीमत राजेसाहेबाना भेटण्यास आले होते

ता २४ रोजीं दुपारी श्रीमत बाळासाहेब यानीं श्रीमत राजेसाहेब व बरोबरची मडळी याना मेजवानी दिली भोजनोत्तर तेथील पदार्थ-सग्रहालय, वाचनालय, वगैरे पाहिल्यानतर दरबार भरविण्यात येऊन श्रीमत राजेसाहेब याना निरोप देण्यात आला. व श्रीमत राजेसाहेब औंधहून निघून मोटारने भोरास परत आले

चित्रांक १७६



हरिद्वार येथील गंगेचे घाटावरील दृश्य.

चित्रांक १७७



हरिद्वार येथील गंगेचे घाटावरील दृश्य.

[ स. पा. ८२१

# सिंहगड

उन्हाळ्यात सिंहगडावरील हवा चांगली असते श्रीमंत राजेसाहेब, श्रीमंत युवराज, श्रीमंत बापूसाहेब, श्रीमंत रावसाहेब, श्रीमंत कु पद्मावती राजे यांचेसह ता २५ एप्रिल सन १९३५ रोजी एक आठवडाभर राहण्याचे ठरवून सिंहगडावर गेले तेथ श्रीमंत राजेसाहेबांनी फेरोजशहा होरमासजी यांच्या 'रत्नशाळा' नावाचे बंगल्यात मुक्काम केला व बरोबरची मंडळी फरदुमजी दोराबजी यांच्या 'राजवाडा' बंगल्यात राहिली तेथें श्रीमंत राजेसाहेब यांनी देवटाके, तानाजी मालुसरे यांची समाधी व देवळदेवी व कमलकुमारी यांचे दगड वगैरे पाहिली सायंकाळी फिरताना पूर्वेकडील तट पाहावयास श्रीमंत राजेसाहेब गेले होते तटावरून आसपासचे प्रदेशाचा देखावा मोठा प्रेक्षणीय दिसतो दुसऱ्या दिवशी सकाळीं कल्याण दरवाजा अथवा उत्तरेकडील दरवजा पाहण्यात आला त्यावर पुढील शब्द खोदलेले आहेत 'श्रीशालिवाहन शके १६७२ श्री बाळाजीराव पंडित प्रधान यांची कारकीर्द' त्यानंतर क्रमानेच झुंजार बुरुज, भैरवाचे देऊळ वगैरे स्थळे पाहण्यास श्रीमंत राजेसाहेब गेले ती सर्व हल्ली पडिक स्थितीत आहेत तिसरे प्रहरीं लोकमान्य टिळक, प्रसिद्ध कादंबरीकार हरी नारायण आपटे, दाजी आबाजी खरे यांचे बंगले पाहण्यास श्रीमंत राजेसाहेब गेले होते त्या वेळी छत्रपति श्री-राजाराममहाराज यांची समाधि, नवीन दुरुस्त केलेला तट, सिंहगड जिंकण्या-करिता झालेल्या चकमकींत तानाजी मालुसरे याचा हात ज्या ठिकाणी तुटला ती जागा, कलावतिणीचा बुरूज, तानाजी मालुसरे यांनी प्रथम ज्या ठिकाणीं घोरपड लाविली व किल्ल्यावर चढले तो कडा, उदयभानूच्या वाड्याची जागा व श्रीकोंडाणेश्वराचे देऊळ वगैरे ठिकाणे पाहिली ता २७ रोजी अश्वशाळा, गणेशटाक्याजवळ असलेली जुन्या नमुन्याची तोफ, उदयभानूच्या राजवाड्या-तील नवीन संशोधन केलेला दिवाणखाना, रामटाके, इत्यादि प्रेक्षणीय स्थळे श्रीमंत राजेसाहेब यांनीं पाहिली या ठिकाणचे देवटाक्याचे पाणी हलके पाचक असल्यामुळे सिंहगडावरून परत आल्यावर कित्येक दिवसपर्यंत तेथील पाणी आणवून पिण्याचा क्रम श्रीमंतांनी चालू ठेविला होता

## सातारा

कोल्हापुराहून परत येताना श्रीमत राजेसाहेबानीं ३१ जानेवारी सन १९३६ रोजी सातारा येथें मुक्काम केला ता १ रोजी देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण सस्थेच्या वसतिगृहास भेट दिली दुसरी भोर येथील त्या वेळचे फॉरेस्ट सेटलमेन्ट ऑफिसर रा त्रिबक रघुनाथ ग्वर्शीकर यानी श्रीमताना मेजवानी केली तिसरे प्रहरी श्रीमत ताराराजे राणीसाहेब सातारा व श्रीमत बालमहाराज याची श्रीमतानीं भेट घेतली दुसरे दिवशीं श्रीमंत राजेसाहेब साताऱ्याहून माहुलीस गेले तेथील व्यायाममडळाने मडळाकरिता माहुली येथील वाडयाचा काही भाग मागितल्यावरून सार्वजनिक कार्य व व्यायामाचा सद्धेतु लक्षात घेऊन मामुली भाडयाने काही भाग मडळाचे उपयोगाकरिता दिला सरदार पटिंतराव, खडेराव निघोजकर व विनायक विश्वनाथ बावडेकर वकील सातारा, याच्याकडील चहा, पानसुपारी घेऊन ता ९ रोजी सायकाळीं श्रीमत राजेसाहेब भोरास आले.

## केडगांव व अहमदनगर

केडगाव येथें एक आठवडाभर वेद, शास्त्रे, पुराणे याची घन पारायणे व चर्चा सद्गुरु नारायणमहाराज यानीं फेब्रुवारी सन १९३६ मध्ये केली तो समारभ पाहण्यास श्रीमत राजेसाहेब श्रीमत राजकुमार याचेसह ता २९ रोजी तेथें गेले तेथील सर्व समारभ पाहून ता १ रोजीं श्रीमत राजेसाहेब नगर येथें श्रीमताचे स्नेही रा रा कोंडो महादेव कुमठेकर, बी ए, एल्एल् बी, डिस्ट्रिक्ट ॲड सेशन्स जज, याच्याकडे त्याच्या मुलाचा व्रतबध ता २ रोजी व्हावयाचा होता, त्याकरिता गेले त्या वेळी रा दादासाहेब याना योग्य अहेर केला तेथें श्रीमत सदाशिव शिवराम निसळ याचे वाडयात श्रीमत राजेसाहेब यानी मुक्काम केला ता १ रोजी रात्री श्रीमत सरदार नानासाहेब मिरीकर याचे ज्ञानेश्वरीवरील प्रवचन झाले दुसरे दिवशीं रा रा कुमठेकर याचेकडील व्रतबध समारभ झाल्यावर भोजनोत्तर नगर येथील ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मणसस्था व ज्ञानेश्वरमडळ याचेतर्फे करण्यात आलेल्या पानसुपारीचा स्वीकार करून रात्रीं मुक्कामास श्रीमत राजेसाहेब पुण्यास परत आले

चित्रांक १७८

विलायतच्या दुसऱ्या सफरीच्या वेळी बरोबर असलेली राजकुटुंबातील मंडळी ( सन १९३७ )



बसलेले.—१ श्री युवराज, २ श्री. राजेसाहेब, ३ रा कु बापूसाहेब

मागे उभे.—१ रा कु. विमलाराजे, २ रा कु रावसाहेब, ३ रा. कु पद्मावतीराजे

[स पा. ८३०

## पांडवदऱ्याम भेट

शिरवळनजीक पाडवदऱ्याचे डोंगरात काही कोरीव लेणीं आहेत असे श्रीमताना समजले हीं लेणीं पडिक स्थितींत असल्याचे कळले तेव्हा श्रीमत राजेसाहेब यानीं विचित्रगट तालुक्याचे मामलेदार श्री रा अमृत कृष्ण ऊर्फ आप्पासाहेब गाडेकर याना त्या लेण्यात भरलेली माती उकरून काटून साफसूफ करण्यास सागितले त्याप्रमाणे मामलेदारसाहेब यानीं बरेच परिश्रम घेऊन लवकरच या सर्व लेण्याची साफसुफी केली तेव्हा ही लेणी पाहण्याकरिता श्रीमत राजेसाहेब यानीं ता २९ जून सन १९३६ रोजी बनारस हिंदु युनिव्हर्सिटीतील प्रसिद्ध इतिहासज्ञ प्रो अनत सदाशिव आळतेकर याचेसह भेट दिली या ठिकाणी पूर्वाभिमुख अशा एकदर सात खोल्या कोरलेल्या असून मध्यभागी सभामडप व त्याचे दोन्ही बाजूस तीन तीन खोल्या आहेत येथें इतर लेण्याप्रमाणे कोरीव कलाकुसरीचे नक्षीकाम, बुद्धाचे पुतळे वगैरे काहीएक नाहीं फक्त एका खोलींत एक स्तूप आहे या लेण्याच्या साधेपणावरून त्या इ स पूर्वी ५० ते १५० या कालावधीत कोरलेल्या लेण्यापैकीं दक्षिणेतील अगदीं प्रारभीच्या असाव्यात, असा प्रोफेसर मजकुराचा तर्क आहे या लेण्याचा उल्लेख भोर येथील वस्तुसग्रहालयात असलेल्या राष्ट्रकूट वशातील ध्रुव राजाने इ स ७८० मध्ये दिलेल्या ताम्रपटात आढळतो हीं लेणीं पाहिल्यानतर शिरवळ येथील काही लोकानी व अधिकारी वर्गांनी केलेल्या पानसुपारीचा व अल्पोपाहाराचा श्रीमतानीं स्वीकार केला या लेण्यात भरलेली माती काढण्याचे व लेण्यापर्यंत वाट तयार करण्याचे परिश्रम घेतल्याबद्दल शिदेवाडी येथील लोकाना श्रीमत राजेसाहेब यानी बक्षिस दिले दुपारी २ चे सुमारास सर्व मडळी भोरास परत आली

## प्रयागचा प्रवास

श्रीमत राजेसाहेब, श्रीमत युवराज भाऊसाहेब, श्री सौ माईसाहेब व त्याच्या मुली याचेसह ता १६ सप्टेबर १९३६ रोजीं अलाहाबादेस गेले मुंबईहून नैनी स्टेशनपर्यंत रेल्वेने प्रवास केला व नैनीपासून अलाहाबादेस मोटारने गेले नैनीपासून अलाहाबाद ४ मैल लाब आहे अलाहाबाद येथे दारागजमधील इदुरच्या महाराजाच्या होळकर कोठीत मुक्काम केला तेथें

गगा, यमुना आणि सरस्वती या तीन नद्याच्या सगमात दशाश्वमेघ घाटावर श्रीमत राजेसाहेबानी स्नान केले या ठिकाणी श्री सौ माईसाहेब याच्या वेणीदानाचा विधि यथाशास्त्र करण्यात आला या दिवशी दुपारीं श्रीमत राजेसाहेब दी राइट ऑनरेबल सर तेजबहादुर सप्रू याचेकडे त्याचे बगल्यात लचला गेले होते सायकाळीं अलाहाबाद येथील तत्त्वज्ञान या विषयाचे प्रोफेसर आर डी रानडे हे श्रीमतास भेटण्यास आले होते दुसरे दिवशी सकाळी श्रीमत राजेसाहेबानीं फोर्टमधील अक्षय्य-वट देऊळ, अशोकस्तभ, आणि राजवाडा पाहिला दुपारी श्रीमत राजेसाहेब प्रो रानडे याचेकडे चहास गेले होते ता २२ रोजी श्रीमत राजेसाहेबानी राइट ऑनरेबल सर तेजबहादुर सप्रू याना डिनर दिले ता २३ रोजी अलाहाबादेहून निघून श्रीमत राजेसाहेब सर्व मडळीसह ता २४ रोजी पुण्यास सुखरूप पोंचले

## श्रीमंत राजेसाहेब यांचा बादशहांचे राज्यारोहणाकरितां आणि प्रकृतिस्वास्थ्यासाठी दुसऱ्या वेळीं विलायतचा प्रवास

सन १९३६ च्या अखेर, बादशहा सहावे जॉर्ज याचा राज्यारोहण-समारभ सन १९३७ च्या मे महिन्याच्या १२ तारखेस लडन येथे मोठ्या थाटाने साजरा होणार असल्याचे वृत्त प्रसिद्ध झाले तेव्हापासून या समारभा-करिता लडनला जावे व बादशहाच्या व इग्लडच्या राजघराण्याविषयीं आपल्या ठिकाणीं असलेली आदरबुद्धी व राजनिष्ठा व्यक्त करण्याची सधी साधावी असा विचार श्रीमत राजेसाहेब याचे मनात घोळू लागला सन १९३२ साली श्रीमत राजेसाहेब बरेच आजारी होते त्यानतर त्याची तब्बेत सुधारली तथापि तब्बेत जितकी सुधारावयास पाहिजे तितकी न सुधारल्यामुळे व अन्नपचन चागले होत नसल्यामुळे स्वत ची तब्बेत युरोपमधील नामाकित डॉक्टर्सना दाखवावी, तसेच श्रीमन युवराज भाऊसाहेब याच्या पायात १९१२ सालच्या आजारीपणा-पासून काहींतरी दोष शिरला असल्यामुळे त्याना नेहमी लगडत चालावे लागते याबाबत काहीं उपाय करता येण्यासारखा असल्यास पाहावा, हा एक हेतू होता याशिवाय फ्रान्समध्ये पॅरिस येथे एक जागतिक प्रदर्शन भरणार असल्याचे वृत्त वर्तमानपत्रातून प्रसिद्ध झाले होते तेव्हा विलायतची सफर करण्यात वरील हेतु होते वरील हेतूस अनुसरून प्रवासास जाण्याची सर्व

चित्राक १७९
व्हिएन्ना येथील फोटो ( सन १९३७ )



खुर्चीवर — १ मिसेस् पाजेस,   २ श्री राजेसाहेब,   ३ डॉ. पोर्जेस

पूर्वतयारी झाल्यावर श्रीमत राजेसाहेब, श्रीमत युवराज भाऊसाहेब, श्रीमत राजकुमार बापूसाहेब व रावसाहेब व श्री राजकुमारी पद्मावतीराजे व विमला-राजे ( श्रीमत राजेसाहेबाची नात ) याचेसह ता १७ एप्रिल १९३७ रोजी एस् एस् राची या बोटीने मुबईहून निघाले

जाण्यापूर्वी भोर कायदेमडळाने भोर येथे श्रीराम-मडपात दरबार भरवून श्रीमत राजेसाहेबाना जाहीर निरोप दिला श्रीमत राजेसाहेब भोराहून पुण्यास आले त्या वेळीं वाटेत कासुरडी, नसरापूर येथील रहिवाशानीं तसेच पुणे स्टेशनवर भोरचे बहुतेक सर्व अधिकारी व नोकरवर्गाने आणि मुबई बदरावर श्रीमताचे आप्त, मित्र, प्रजाजन आणि अधिकारी या सर्वांनीं पुष्पहार अर्पण करून सन्मानपूर्वक श्रीमताना व त्याचेबरोबरचे सर्व मडळीना निरोप दिला अनेक सस्थानातील व सस्थानाबाहेरील सस्थानींहि श्रीमताना निरोप देण्यास आपले प्रतिनिधी पाठविले होते

ता १७ रोजी मुबई सोडली बोट ता ३० रोजी मार्सेलीसला पोचली तेथून पी ॲण्ड ओ च्या स्पेशल एक्स्प्रेसने निघून श्रीमत राजेसाहेब ता १ मे रोजी लडन येथें पोंचले तेथें व्हिक्टोरिया स्टेशनवर श्रीमताचे स्वागता-करिता श्रीमत राजेसाहेब जमखिंडी, थॉमस कुकचे कॅप्टन ॲलनसन, मुबईचे रिटायर्ड एक्झिक्यूटिव्ह एजिनिअर मि ए बी टिम्स इत्यादि मडळी आली होती

लडन येथें श्रीमत राजेसाहेबानीं एक महिनाभर मुक्काम केला ता १२ मे रोजीं बादशहा व महाराणी एलिझाबेथ याचा राज्यारोहणसमारभ झाला या समारभास हजर राहण्यास अर्ल मार्शल याचेकडून श्रीमत राजेसाहेबाना निमत्रण आले होते त्याप्रमाणे श्रीमत राजेसाहेब या समारभास वेस्ट मिन्स्टर ॲबेमध्ये हजर राहिले होते याची हकीकत मागे राज्यारोहणसमारभाचे हकीकतीत दिली आहे

या प्रवासास जाण्यापूर्वी श्रीमत राजेसाहेब यानी आपल्या १९३० च्या सफरीचे वृत्त *Twentyone Weeks in Europe, 1930* या नावाने प्रसिद्ध केले होते त्याच्या काही प्रती त्यानीं बरोबर नेल्या होत्या त्यापैकी काहीं प्रती इडिया ऑफिस व इडिया हाउस याचे लायब्ररींत, त्याचप्रमाणे तेथें भेटलेल्या काहीं ओळखीच्या सद्गृहस्थाना व अधिकाऱ्याना भेट म्हणून दिल्या

ता ३१ रोजी व्हिएन्नास जाण्याकरिता ॲल्बर्ग आणि ओरिएन्टल एक्स्प्रेसनें त्यानीं लडन सोडले दुसऱ्या दिवशी सायकाळी श्रीमंत राजेसाहेब व्हिएन्नाला पोचले व्हिएन्ना येथें ' ब्रिस्टल हॉटेल 'मध्ये श्रीमतानी मुक्काम केला तेथील प्रसिद्ध डॉक्टर ओटो पोर्जेस याना श्रीमतानी आपली तब्बेत दाखविली व त्याच्या सल्ल्याप्रमाणे औपधोपचार सुरू केला डॉ स्वॅम याना श्रीमत युवराज याचा पाय दाखविला, त्यावर काही उपाय होणार नाही असे त्यानी सागितलें

व्हिएन्ना येथें हिज हायनेस महाराजा ऑफ म्हैसूर याच्या ५३ व्या वाढदिवसानिमित्त तेथील ॲग्लो-इडियन इन्स्टिटयूट ऑफ कॉमर्स या सस्थेतर्फे डॉ अग्निहोत्री यानी दिलेल्या रिसेप्शन पार्टीस श्रीमत राजेसाहेब गेले होते श्रीमत राजेसाहेबानी थोडेसे भाषण करून म्हैसूरच्या महाराजाचे वाढदिवसा-निमित्त अभिनदन केले त्यात त्याच्या उज्ज्वल व प्रगतिपर राज्यकारभाराचा गौरवपर उल्लेख केला या पार्टीला व्हिएन्ना येथील ब्रिटिश मिनिस्टर हिज एक्सलन्सी सर वॉलफोर्ड सेल्बी हे आले होते त्याच्याबरोबर श्रीमताची ओळख झाली

व्हिएन्नाहून डॉ पोर्जेस याच्या सल्ल्यावरून श्रीमत राजेसाहेब ता १८ रोजी रात्री १०-३० वाजता कार्ल्सबाद या झेकोस्लोव्हाकियामधील हवा खाण्याच्या ठिकाणीं गेले कार्ल्सबाद येथें सेव्हॉय वेस्ट एण्ड हॉटेलच्या व्हिला क्लिओपाट्रामध्ये श्रीमतानी मुक्काम केला.

डॉ पोर्जेस यानी सागितल्यावरून कार्ल्सबाद येथील डॉ न्यूबॅरिअर (Neubarier) या डॉक्टरना त्यानीं आपली तब्बेत दाखविली, आणि त्याच्या सल्ल्याप्रमाणे १० दिवसपर्यंत औषधोपचार घेतला आणि झोडर इन्स्टिटयूटमध्ये शारीरिक व्यायामाचे व स्नानाचे उपचार करून पाहिले

झेकोस्लोव्हाकियाचे लोकसत्ताक राज्याचे त्या वेळचे अध्यक्ष डॉ बेनेस याची श्रीमत राजेसाहेब यास कार्ल्सबाद येथील थिएटरमध्ये ऑपेरा पाहण्यास गेले असताना ओळख करून घेण्याची सधि मिळाली श्रीमत राजेसाहेब तेथें आले आहेत असे समजल्यावरून त्यानी आपले सेक्रेटरीना

चित्राक १८०



आल्प पर्वतातील जुंग्फ्रो शिखरावरील रेल्वे स्टेशन आणि शास्त्रीय वेधशाळा

[ स पा ८१८

पाठवून श्रीमताना बोलवून घेतले व ओळख झाल्याबद्दल आनद व्यक्त केला ( हल्ली व्हिएन्ना व झेकोस्लोव्हाकिया जर्मनीत सामील झाले आहेत )

कार्ल्सबाद येथील औषधोपचार झाल्यावर तेथून श्रीमत राजेसाहेब ता २८ रोजीं निघून फ्रान्समधील पॅरिस येथे दुसऱ्या दिवशी पोंहोचले

पॅरिसहून श्रीमत राजेसाहेब व्हिची नावाच्या अत्यत प्रसिद्ध अशा हवेविषयीं प्रसिद्ध असलेल्या ठिकाणीं गेले व्हिची येथे हाटेल मॅजेस्टिकमध्ये उतरले व्हिचीला Queen of Spas असे म्हणतात व्हिची येथून निघून श्रीमत राजेसाहेब मार्सेलिस येथे ता ८ जुलै रोजी सकाळी येऊन पोहोंचले एस एस रणपुरा या बोटीने मार्सेलिसहून निघण्याचे ठरले होते ता १० रोजी चार वाजता बोटीने मार्सेलिस सोडले व मुबई येथे ता २२ रोजी श्रीमत राजेसाहेब सुखरूप येऊन पोंहोचले

## श्रीमंत राजेसाहेबांचे स्वागत-समारंभ

बदरावर श्रीमताचे आप्त, स्नेही, अधिकारीवर्ग, प्रजाजन, काही सार्वजनिक सस्थाचे प्रतिनिधि स्वागतास आले होते त्यानीं सर्वांचे आदरपूर्वक प्रेमाने स्वागत करून पुष्पहार अर्पण केले त्याच दिवशीं रात्रीच्या गाडीने निघून श्रीमत राजेसाहेब पुण्यास आले पुणे येथे सरदार विंचूरकर, श्री आण्णाराजे व इतर बरीच मडळी स्वागत करण्यास आली होती ज्याना मुबई येथे अगर पुणे स्टेशनवर स्वागतास येण्यास सवड मिळाली नाही त्यानी लक्ष्मीविलास बगल्यावर येऊन पुष्पहार अर्पण करून श्रीमताचे आगमनाने झालेला आनद व त्याचे विषयींचा आदरभाव व्यक्त केला. ता २५ जुलै रोजीं श्री चीफसाहेब इचलकरजी यानीं येऊन प्रवास सुरक्षितपणे पार पडल्याबद्दल श्रीमताचे अभिनदन केले. तारीख २८ जुलै रोजी श्रीमत राजेसाहेब भोरास आले. या विलायतेच्या प्रवासानतर प्रथम-प्रवेशाचे वेळी भोरच्या नागरिकानी त्याचे अत्यत उत्साहाने स्वागत केले वाटेत नसरापूर येथील मामलेदार यानी पुष्पहार घातला रामबागनजीक उत्रवलीच्या गावकऱ्यातर्फे रा राघू तुकाराम शेटे यानी हार घातला भोर येथे धर्मशाळेपाशीं भोर म्युनिसिपालिटीच्या अध्यक्षानी व नागरिकानी स्वागत करून हार समर्पण केला, व त्या वेळी ९ तोफाची सलामी देण्यात आली

नतर सर्व लवाजम्यानिशीं वाजतगाजत थाटाची मिरवणूक काढून श्रीमताना राजवाड्यात नेण्यात आले.

तारीख ६ ऑगस्ट रोजीं श्रीराम-मडपात खास दरबार भरवून श्रीमत राजेसाहेब प्रवासाहून सुखरूप परत आल्याबद्दल भोर म्युनिसिपालिटीचे मानपत्र अर्पण करण्याचा समारभ झाला भोर म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष श्री रा वि गो रानडे याची प्रकृति नादुरुस्त असल्यामुळे उपाध्यक्ष श्री वासुदेव सदाशिव पाटणकर यानी मानपत्र वाचून दाखवून ते श्रीमत राजेसाहेबाना अर्पण केले श्रीमत राजेसाहेब यानी मानपत्राबद्दल आभार मानून प्रवासात घडलेली हकीकत सविस्तर वाचून दाखविली ही हकीकत अतिशय मनोरजक व उद्‌बोधक होती ती परिशिष्ट १७ त दिली आहे या भाषणात श्रीमतानी लिहिलेल्या पहिल्या प्रवासवर्णनाचे पुस्तक लिहिण्याचे कामी झालेल्या रा सा अनत रामचद्र जोशी याच्या मदतीचा गौरवपूर्वक उल्लेख करून त्याना त्याजबद्दल रुपये १००० पारितोषिक दिल्याचे जाहीर केले

पुणे येथील भोरच्या रहिवाश्यानी पुणे येथे सत्कारमडळ स्थापून श्रीमत राजेसाहेबाना मानपत्र देऊन श्रीमताचा ता ८ ऑगस्ट १९३७ रोजीं सत्कार केला या समारभास पुण्याचे कलेक्टर मि ट्रॉटमन व इतर सुमारें ३००-३५० निमत्रित मडळी होती हे मानपत्र चादीच्या बोटीतून अर्पण करण्यात आले नतर आयुर्वेदरसशाळेतर्फें आयुर्वेदाचार्य नानलशास्त्री यानीं, आयुर्वेद हॉस्पिटलतर्फें डॉ. माधव पुरुषोत्तम जोशी यानी व वैदिक सशोधनमडळातर्फें श्री ना श्री सोनटक्के यानी हार घालून श्री सोनटक्के यानी ‘श्रीमत्सायणाचार्यविरचितभाष्यसमेता ऋग्वेदसहिता’ या पुस्तकाचा पहिला खड व द्वितीय विभाग अशीं पुस्तकें अर्पण केलीं. समारभ झाल्यावर सत्कारमडळाने सर्व निमत्रित मडळींना ॲटहोम पार्टी दिली.

ता ९ रोजीं नूतन मराठी विद्यालयात सुपरिंटेडेट प्रो एन् जी नारळकर यानीं श्रीमताचा सत्कार केला. त्या वेळीं भाषण करून श्रीमत राजेसाहेबानी प्रवासवृत्त थोडक्यात सागितले व विद्यार्थ्यांना उपदेशपर भाषण केले. श्रीमताना येथे अल्पोपाहार देण्यात आला व फोटो घेण्यात आला.

यानतर भोर येथील नागरिकातर्फे ता १८-८-१९३७ रोजी श्रीमत राजेसाहेब याचे राज्यारोहणाच्या वाढदिवशीं मानपत्र अर्पण करून सत्कार करण्यात येऊन श्रीमताना रु १५०१ ची थैली अर्पण करण्यात आली याच समारभाचे वेळीं राजगड, प्रचडगड, पौनमावळ, सुवागड या तालुका लोकल बोर्डांतर्फे, व पाली सॅनिटरी बोर्डातर्फे मानपत्रे अर्पण करून सत्कार करण्यात आला श्रीमत राजेसाहेब यानी भाषण करून सर्वांचे आभार मानले व थैलीतील रु १५०१ मध्ये स्वत ची भर घालून या समारभाचे स्मरणार्थ भोर येथे एक दगडी कमान बाधण्याचे ठरविले असल्याचे सागितले या कमानीचे काम पूर्ण झालेले असून राजवाड्यापुढील चौकास शोभा आली आहे या कमानीस 'राजा रघुनाथराव कमान' असे नाव देण्यात आले आहे

पुणे येथे ता ५-९-१९३७ रोजी श्रीमतास चोभे क्लबची पार्टी झाली

ता २१-११-१९३७ रोजी शिरवळ येथील नागरिकानी व मामलेदार श्री रा आप्पासाहेब गाडेकर व कचेरींतील नोकर लोकानी शिरवळ येथे श्रीमताना मानपत्र अर्पण करून सत्कारपूर्वक रु १०१ ची थैली व झुलत्या पुलाचे चादीचे मॉडेल अर्पण केले

## निरा-नरसिगपूर प्रवास

पुणे जिल्ह्यात निरा आणि भीमा या नद्याचे सगमावर नरसिगपूर हा गाव आहे निरा-नरसिगपूर या नावाने तो प्रसिद्ध असून पुण्याहून अदमासे १०० मैल लाब आहे या ठिकाणी श्रीनृसिहाचे देवस्थान असून त्याची सर्व व्यवस्था पुणे येथील श्रीमत सरदार विंचुरकर याचेकडे आहे श्रीमती वहिनीसाहेब विंचुरकर ( कै श्री भाऊसाहेब विचुरकर याच्या पत्नी ) यानी श्रीमत राजेसाहेब याना निरा-नरसिगपुरास यावे अशी विनति केल्यावरून श्रीमत राजेसाहेब ता. २५ डिसेबर १९३७ रोजी दुपारीं पुण्याहून निघून सायकाळीं मुक्कामास नरसिंगपूरास गेले. गावाच्या एका बाजूस निरा व दुसऱ्या बाजूस भीमा या दोन नद्या असल्यामुळे गावात नावेतून जावे लागते नावेत बसून गावात गेल्यावर श्रीमत राजेसाहेबाचे श्रीमती वहिनीसाहेब विचूरकर यानी स्वागत केले तेथून प्रथम श्रीनृसिंहाचे दर्शनास जाऊन श्रीमताची स्वारी विंचूरकर याच्या वाड्यात येऊन पोहोंचली

दुसरे दिवशीं श्रीमत राजेसाहेबानीं श्रींची पूजा, महानैवेद्य करून श्रीस महावस्त्र ( पीताबर ) व दक्षिणा समर्पण केली इतर देवताची पूजा करून दक्षिणा, वस्त्रे वगैरे अर्पण केलीं सायकाळीं विद्वान् ब्राह्मणास बोलावून सभावना दिली

ता २७ रोजीं श्रीमत सरदार ख रा ऊर्फ बापूसाहेब विंचूरकर हे निरा-नरसिंगपूर येथें आले होते श्री वहिनीसाहेब विचूरकर यानीं श्रीमत राजेसाहेबाना मेजवानी दिली पानसुपारी वगैरे झाल्यावर श्रीमत राजेसाहेबाना व बरोबरच्या मडळीस पोषाख दिले नतर श्रीमत राजेसाहेब बरोबरच्या सर्व मडळीसह निघून मोटारने पुणे येथें परत आले

## इंदूरचा प्रवास

सप्टेबर १९३८ मध्ये श्रीमत राजेसाहेब याची प्रकृति रक्तदाबाच्या ( High Blood Pressure ) विकाराने एकाएकीं बिघडली त्या आजारातून योग्य औषधोपचारानतर त्याना थोडे बरे वाटल्यावर, काही दिवस हवापालट करावा असा डॉक्टर याचा सल्ला पडला हवापालट करण्यास इदूरला यावे, असा श्रीमताचे इदूरचे साडू श्रीमत सरदार भय्यासाहेब पळशीकर ( वशपरपरा दिवाण ) व त्याचे मेहुणे रा. रा. बाबूराव पुराणिक, B E, A M I. (Struck) E, असिस्टट एजिनिअर यशवत वॉटर वर्क्स बादरखा, याचा विशेष आग्रह पडल्यामुळे श्रीमतानीं हवापालट करण्यासाठी इदूरला जाण्याचे ठरविले इदूरला जाण्याचे ताबडतोबीने ठरल्यामुळे त्याबद्दल रेसिडेण्टच्यामार्फत इदूर दरबारला कळविण्यात आलें नाहीं शिवाय त्या वेळीं इदूरचे महाराजहि तेथे नव्हते त्यामुळे श्रीमत राजेसाहेबाची ही भेट खासगी स्वरूपाची झाली प्रवासाचा कार्यक्रम ठरल्यावर श्रीमत राजेसाहेब, श्रीमत राजकुमार बापूसाहेब, रावसाहेब, राजकुमारी पद्मावतीराजे याना त्या वेळीं सुट्टी असल्यामुळे त्याचेसह आणि श्री सौ आम्मासाहेब व कु वेणुताई पुराणिक याचेसह पुण्याहून ता १८ ऑक्टोबर रोजीं मुबईस गेले, व मुबईहून ता २० रोजीं बी बी सी आय रेल्वेने निघून ता २१ रोजी ११-३० वाजता इदूर येथे सर्व मडळीसह पोंचले इदूर स्टेशनवर दरबारतर्फे रा एन जी खाजगीवाले, खासगी दिवाण, यानीं व श्री भय्यासाहेब पळशीकर व रा बाबूराव

चित्रांक १८१

इदूर मुक्कामीं घेतलेला फोटो ( सन १९३८ )



१ श्री भय्यासाहेब पळशीकर, ( श्रीमताचे साडू )   २ श्री राजेसाहेब,   ३ रा. बाबूराव पुराणीक ( श्रीमताचे मेहुणे )

[ स पा. ८३६

पुराणिक यानी त्याचे स्वागत केले इदूर येथें श्रीमताचा मुक्काम इदूर सस्थानच्या न्यू गेस्ट हाउस न १ मध्ये होता राहण्याची व भोजनाची वगैरे सर्व व्यवस्था इदूर दरबारकडूनच करण्यात आली होती येथील मुक्कामात सर हुकूमचद यानी बाधलेले दिगबर जैनमदिर, देवधरम हिलनजीकचे वॉटरवर्क्स, छत्रीबाग, जुना राजवाडा, पिपिया तलाव, यशवत क्लब, बादरखा येथील सायफन्स, यशवतसागर डॅम, (Phulkaria Pumping Station ) वगैरे प्रेक्षणीय स्थळे पाहिली ता २४-१०-१९३८ रोजी श्रीमत राजेसाहेब इदूरचे माजी महाराज सर तुकोजीराव होळकर याच्या भेटीस गेले होते तसेच इन्दूरचे मुक्कामात तेथील मुख्य प्रधान वजीर उद्दौलत राय बहादूर सर एस एम् बापना, के टी., सी आय ई , यारचे दिवाण रा ब नाडकर, सरदार एम व्ही किबे, सरदार रेशीमवाले वगैरे मडळी येऊन श्रीमतास भेटली ता २५-१०-१९३८ रोजी श्रीमत राजेसाहेब देवास येथे देवास ज्यूनिअरचे महाराज हिज हायनेस खासेसाहेब पवार याचे भेटीस गेले होते इदूरहून देवास २० मैल आहे

इदूरहून ता. २६ रोजी श्रीमत राजेसाहेब, पुराणिक व पळशीकर मडळीसह उज्जनीस गेले उज्जनी ४० मैल आहे तेथें राहण्याची व जेवणाची व्यवस्था ग्वाल्हेर दरबारकडून करण्यात आली होती कालिया देह राजवाड्यात मुक्काम होता श्रीमत राजेसाहेब यानीं येथील वेधशाळा Jiwaji Observatory पाहिली ही जुन्या पद्धतीची वेधशाळा आहे परतु जुन्या काळी ज्योतिषी कशा प्रकारे ग्रहाचे वेध घेत होते ते घेण्याकरिता व प्रेक्षकाना समजावून सागण्यासाठी तेथे एक मनुष्य नेमिला आहे हल्लीं रा जोशी नावाचे गृहस्थ तेथें आहेत ते श्रीमताची स्वारी तेथें गेली त्या वेळीं वेध घेणे वगैरे कामे करीत होते श्रीगोपाळकृष्ण, ओंकार, महाकाळेश्वर, अवती याचीं मदिरे, राघोजीराव शिदे याची छत्री, श्री चिमाबाई, अन्नपूर्णाबाई, भवानीबाई शिंदे याच्या समाधी, अक्षयवट, वगैरे ठिकाणे पाहिली ता २७ रोजीं सायकाळीं इदूरास परत आले तेव्हा हिज हायनेस तुकोजीराव गेस्ट हाउसमध्ये श्री राजेसाहेब याचे भेटीस आले होते सायकाळी फिरून येताना डॅली राजकुमार कॉलेज, तुकोजीरावमहाराज, शिवाजीमहाराज, कृष्णाबाईमहाराज याच्या

छत्र्या, दत्तमदिर वगैरे स्थळे पाहिली ता २८ रोजीं दुपारीं श्रीमत राजेसाहेब धारला गेले इदूरहून धार ४७ मैल आहे धार येथें श्रीमताच्या आगमनार्थ ९ तोफाची सलामी देण्यात आली दिवाणबहादुर नाडकर यानी श्रीमताचे स्वागत केले धार येथे श्रीमताचा मुक्काम इडियन गेस्ट हाउसमध्ये होता धारचे राजेसाहेब हिज हायनेस आनदरावमहाराज हे श्रीमताच्या भेटीस आले होते येथील मुक्कामात श्रीमतानी धारचा किल्ला, भोजशाला, अथवा कमाल मोहला, महमद गिझनीची मशीद, श्रीकालिकादेवीचे मदिर, १३०० शतकातील लाट मशीद, लोहस्तभ, पठाण मशीद, Studfarm, Central Cattle Breeding Farm and State Dairy वगैरे पाहिले

धारहून श्रीमत राजेसाहेब सर्व मडळीसह २२ मैलावर असलेले मडू अगर माडवगड पाहण्यास गेले तेथें हिंदोळा महाल, चपाबावडी विहीर, हमाम, दिलावर खानाची मशीद, जहाजमहाल, झनाना पॅसेज, माडवकिल्ला, तबेला महाल, सत्यमती महाल, बझबहादुर पॅलेस, एको पॉइट, इत्यादि स्थळे पाहिलीं दुसरे दिवशी श्रीनीळकठेश्वर येथे नीळकठ महाल, युरोपिअन गेस्ट हाउस अथवा छपन्नमहाल, जुम्मामशीद, अशरफीमहाल, खिलजी घराण्याचा मकरबा, हुशगशहाचा मकरबा, वगैरे पाहून श्रीमत राजेसाहेब भोजनोत्तर महेश्वर येथे गेले मडूपासून महेश्वर ४८ मैल आहे महेश्वर येथे चहाची व्यवस्था इदूर दरबारने केली होती तेथे श्रीमार्तंड मदिर व राजराजेश्वराचे दर्शन घेऊन, अहिल्याबाईंची छत्री पाहून सर्व मडळी बढवई येथे गेली बढवई ३६ मैल आहे येथें राहण्याची व जेवणाची व्यवस्था इदूर दरबारने केली होती मुक्काम नर्मदा पॅलेसमध्ये होता ता ३१ रोजी सकाळीं सर्व मडळी बढवईहून १३ मैलावर असलेल्या ओंकार येथे आली तेथे ओंकारेश्वर, महाकाळेश्वर याचे दर्शन घेऊन भोजन उरकून परत बढवईस आले बढवईस दर्यामहालमध्ये चहा घेऊन सर्व मडळीसह श्रीमत राजेसाहेब इदुरास मुक्कामास आले बढईहून इदूर ३९ मैल आहे इदूर येथे रा केशवराव पुराणिक व सरदार रेशीमवाले यानी पानसुपारी केली महाराष्ट्र साहित्य परिषद, इदूर, या सस्थेचे चिटणीस मि रावेरकर यानीं श्रीमताना सात पुस्तके भेट म्हणून दिली त्याना रु १२५ देणगी दिली तारीख १ नोव्हेंबर रोजीं श्रीमत राजेसाहेब यानी

चित्रांक १८२



हिंदोळा महाल, माडवगड. [स पा. ८३८

चित्रांक १८३



जहाज महाल, मुजा तलाव, माडवगड [स. पा. ८३८

मल्हार आश्रमास भेट दिली दुपारीं सर बापना भेटीस आले होते श्रीमतानी ५ वाजता इदूर सोडले निघण्यापूर्वी इदूर दरबारतर्फे सरदार खाजगीवाले यानीं श्रीमताना साडेतीन वस्त्राचा अहेर आणि राजकुमार बापूसाहेब, रावसाहेब व कु पद्मावतीराजे याना वस्त्रे एकदर आकार रु ८०० पर्यंत देऊन निरोप दिला श्रीमतानींहि दरबारच्या व्यवस्थापकाना रु ३०० देणगी म्हणून दिले स्टेशनवर इदूर दरबारतर्फे श्री सरदार खाजगीवाले यानी श्रीमताना पानसुपारी व हार अर्पण केला व श्री पळशीकर व पुराणिक वगैरेनी श्रीमताना निरोप दिला ता २ रोजी श्रीमत राजेसाहेब मुबईस आले व सायकाळीं पुण्यास पोहोचले

## चेबरच्या बैठकीकरितां दिल्लीचा प्रवास

श्रीमत राजेसाहेब १९२३ साली नरेद्र-मडळावर दक्षिण महाराष्ट्रातील मध्यगटातर्फे प्रतिनिधी म्हणून निवडून आल्यावर त्या सालापासून ते १९३० पर्यंत झालेल्या नरेद्र-मडळाच्या सहा बैठकीस नियमाने हजर राहिले

दिल्ली येथें गेल्यावर नरेद्र-मडळाच्या Informal meetings व formal Session ला ते हजर राहत त्याचप्रमाणे व्हाइसरॉयसाहेब, गार्डन पार्टी, रिसेप्शन्स, ॲटहोम, डिनर पार्टी वगैरे देत, त्या वेळी निमत्रणावरून ते जात नरेद्र-मडळाचे चॅन्सेलर गार्डन पार्टी अगर डिनर पार्टी सर्व राजे लोकाना देत, त्यासहि श्रीमत राजेसाहेब जात असत त्याचप्रमाणे बिकानेरचे महाराज याचे-कडेहि डिनर, लच वगैरेस श्री. राजेसाहेब जात याखेरीज नेक नामदार व्हाइस-रॉय, हर एक्सलन्सी, पोलिटिकल सेक्रेटरी, प्रायव्हेट सेक्रेटरी, मिलिटरी सेक्रेटरी, वगैरे लाटसाहेब व बडे अधिकाऱ्याच्या खासगी भेटी घेत असत व त्याच्या सवडी-प्रमाणे त्याना डिनर, लच अगर टी देत व त्याच्याकडे त्याकरिता जात सन १९३१ नतर ते जरी नरेद्र-मडळाचे प्रतिनिधि सभासद म्हणून नसले, तरी नरेद्र-मडळाच्या कामकाजाची आपणास माहिती राहावी या हेतूने पुढेंहि सन १९३९ पर्यंत ज्या ज्या वर्षी नरेन्द्र-मडळाच्या बैठकी झाल्या, त्या त्या वेळी दिल्ली येथें जाऊन ते बैठकीस हजर राहिले

तेथील मुक्कामात सवडीनुसार लेजिस्लेटिव्ह असेब्लीच्या बैठकीस हजर राहून तेथें चालणाऱ्या चर्चा, वादविवाद वगैरे अवलोकन करून त्या सस्थेच्या कामकाजाची माहितीहि श्रीमतानीं करून घेतली

नरेन्द्र-मडळाचे प्रातिनिधिक सभासद म्हणून ते दिल्लीस सन १९२४ ते सन १९३० पर्यंत दरवर्षी गेले, त्या वेळीं दिल्ली स्टेशनवर पोलिटिकल खात्याचा एखादा अधिकारी त्याचे स्वागताकरिता येत असे त्या वेळीं ९ तोफाची सलामी त्याना देण्यात येत असे

नरेन्द्र-मडळाच्या बैठकीकरिता दुसरे सस्थानिक येत, त्याच्या खासगी भेटी घेऊन ते ओळख करून घेत असत

सन १९३१ सालीं दान्ताच्या महाराणाच्या अध्यक्षतेखालीं ९ तोफाच्या सलामीचा मान असलेल्या सस्थानिकाचे एक डेप्युटेशन नेक नामदार व्हाइसरॉयसाहेब याच्या भेटीस गेले त्या डेप्युटेशनमध्ये श्रीमत राजेसाहेब होते १९३६ साली लॉर्ड विलिंग्डन याची मुदत सपल्यामुळे ते विलायतेस गेले, तेव्हा ता १५ एप्रिल रोजीं दिल्ली स्टेशनवर निरोपाचा समारभ झाला त्या समारभास श्रीमत राजेसाहेब गेले होते याच वेळी व्हाइसरॉय लॉर्ड लिनलिथगो याचा शपथविधि व्हाइसरॉय हाउसमधील दरबार हॉलमध्ये ता १८ एप्रिल रोजी होऊन त्यानी अधिकारसूत्रे हाती घेतली त्या समारभासहि श्रीमत राजेसाहेब हजर राहिले होते

— —

चित्रांक १८४



लॉर्ड बिलिंग्डन व श्रीमत राजेसाहेब पार्टीच्या वेळीं बोलत असताना ( दिल्ली येथें ).

[ स. पा. ८४०

चित्रांक १८५




सगमरवरी खडक, जब्बलपूर.

## प्रकरण २१ वें

# वाङ्मयाची अभिरुची



## श्रीमंत राजेसाहेबांचें स्वतःचें ग्रंथ-प्रकाशन

### सफर पहिली

१९०९ साली श्रीमत राजेसाहेब यानीं उत्तर हिदुस्थानात प्रवास केला त्या प्रवासाचे वेळीं प्रवासात पाहिलेल्या निरनिराळ्या गावाची व तेथील प्रेक्षणीय स्थळाची टिपणे त्यानी दररोजच्या डायरीत ठेवली होती व त्यावरून ' आमच्या हिदुस्थानातील ठिकठिकाणच्या सफरी, -सफर पहिली ' हे पुस्तक १९३६ साली स्वत लिहून प्रसिद्ध केले या पुस्तकात हिंदुस्थानातील बडोदा, अहमदाबाद, अबूचा पहाड, अजमीर, जयपूर, भरतपूर, आग्रा, मथुरा, सिमला, काशी, अयोध्या इत्यादि ठिकाणाचे वर्णन आले आहे या पुस्तकाचा प्रकाशनसमारभ ता १४ जानेवारी १९३७ रोजीं मकरसक्रातीचे दिवशीं झाला त्या दिवशी पुस्तकप्रकाशनाचे कामी मदत केल्याबद्दल श्रीमताचे त्या वेळचे प्रायव्हेट सेक्रेटरी श्री रा. भालचद्र हणमत देशपाडे, बी ए , एलएल बा , याना रुपये १०० पारितोषिक म्हणून दिले या पुस्तकावर चागल्या साहित्यिकाचे पुस्तक चागले असल्याबद्दल बरेच अभिप्राय आले त्यात श्री न चिं केळकर ( केसरीत ), प्रो पोतदार व श्री सरदार एम् व्ही किबे याचेहि अभिप्राय आलेले आहेत

### Twenty-one Weeks in Europe-1930

### ( युरोपांतील २१ आठवडे )

सन १९३० साली श्री राजेसाहेब, श्रीमत युवराज भाऊसाहेब याचेसह युरोपचे सफरीस गेले होते एकदर प्रवास २१ आठवडे मुदतीचा झाला या सफरीत लडन व इग्लड, स्कॉटलड, आयर्लंड, फ्रान्स, जर्मनी, ऑस्ट्रिया, झेकोस्लोव्हाकिया, स्वित्झर्लंड, इटली इत्यादि देशातून प्रवास केला व प्रेक्षणीय स्थळे पाहिलीं त्या प्रेक्षणीय स्थळाच्या सविस्तर वर्णनाचे सुमारे ५५० पानाचे इग्रजी भाषेत पुस्तक लिहून श्रीमतानी सन १९३७ साली प्रसिद्ध केले या पुस्तकाच्या प्रकाशनाचे कामीं श्रीमताचे वरील प्रवासाचे वेळी बरोबर असलेले, भोर सस्थानचे

माजी न्यायमत्री कै रा सा अनत रामचद्र जोशी, बी ए , एलएल बी , याची अतिशय मदत झाली या मदतीबद्दल श्रीमत राजेसाहेबानी त्याना रु १००० पारितोषिक देऊन त्याचा गौरव केला या पुस्तकावर खालील वर्तमानपत्राचे अभिप्राय आलेले आहेत *Times* London (Literary Supplement 19-6-1937 ), *Asiatic Review* (July 1937 ), *Progress of Education* ( Sept 1937 ), *Oriental Literary Digest*, Poona, *Mahratta* ( 8 10-1937 ), केसरी (ता १७-१२-१९३७), ज्ञानप्रकाश (ता १९-११-१९३७) याखेरीज प्रसिद्ध साहित्यिक गुरुवर्य महादेव हरी मोडक, बी ए , राहणार पडघवली, सर फेरोजखान नून, हाय कमिशनर, अर्ल ऑफ लिमरिक, मि पूली, प्रि भाटे याचेहि अभिप्राय आलेले आहेत

## सफर दुसरी

श्रीमत राजेसाहेब युवराज असताना सन १९११-१२ साली दिल्ली-दरबाराकरिता गेले व त्यानतर केलेल्या प्रवासवर्णनाचे पुस्तक छापून 'सफर दुसरी' या नावाने प्रसिद्ध केले या प्रवासात दिल्ली, हरिद्वार, डेहराडून, मसुरी, लखनौ, कानपूर, प्रयाग, काशी, भोपाळ, साची इत्यादि शहरे व तेथील प्रेक्षणीय स्थळे पाहिलीं त्याचे विस्तृत वर्णन दिले आहे याखेरीज नव्या दिल्लीचे सविस्तर वर्णन व तेथील मध्यआशियातील पुराणवस्तुसग्रहाल्याचे वर्णनहि परिशिष्टरूपाने दिले आहे या पुस्तकाचा प्रकाशनसमारभ ता १४ जानेवारी १९३९ या दिवशी सक्रातीच्या सुमुहूर्तावर होऊन ग्रथ प्रकाशित करण्याच्या कामीं केलेल्या मदतीबद्दल रा भालचद्र हणमत देशपाडे, बी ए , एल्एल् बी , त्या वेळीं असलेले प्रायव्हेट सेक्रेटरी, याना रु १०० पारितोषिक देऊन त्याचा श्रीमतानीं गौरव केला या पुस्तकावरहि पुरुषार्थ, महाराष्ट्र साहित्यपत्रिका या मासिकाचे आणि प्रो न ग दामले, प्रि भाटे, सरदार किबे वगैरेचे चागले अभिप्राय आले आहेत

## दरबारतर्फे प्रसिद्ध केलेले ग्रंथ

### १ भोर संस्थानचा इतिहास ( इग्रजी )

श्रीमत राजेसाहेब याची स्वारी विलायतेस सन १९३० साली प्रथम गेली त्या वेळीं सन १९३० पर्यंत भोर सस्थानचा सक्षिप्त इतिहास ( *A Short*

चित्राक १८६



दोन सेक्रेटरिएट इमारतींच्या मध्यभागीं व्हाइसरॉयाची कोठी, न्यू दिल्ली

[ स. पा. ८३९

*History of the Bhor State* ) छापून तयार करविला हा इतिहास भोरचे त्या वेळचे चीफ सेक्रेटरी श्रीयुत वि गो रानडे, एम् ए , एलएल बी , व रा वा ना जोशी, शाळाधिकारी, यानी लिहिला विलायतेस गेल्यावर थोडक्यात भोर सस्थानची माहिती तेथील अधिकारीवर्गास व इतर लोकास देता यावी असा हे पुस्तक तयार करण्याचा हेतु होता लडन येथील मुक्कामात माजी बादशाह पाचवे जॉर्ज, स्टेट सेक्रेटरी, पार्लमेटचे काहीं सभासद याना या इतिहासाची एक एक प्रत भेट म्हणून देण्यात आली हा इग्रजी इतिहास १९३० सालापर्यंत केलेला आहे तो आतापर्यंत लिहून पूर्ण करून छापण्याचा श्रीमताचा विचार आहे

## २. **म्यूझिअम गाइड** ( मराठी-इग्रजी )

भोर येथे श्रीमत राजेसाहेब यानी अजबवस्तुसग्रहालय तयार केल्यावर त्या सग्रहाचे वर्णनात्मक एखादे पुस्तक असावे अशी आवश्यकता वाटू लागली तेव्हा पुणे येथील भारत इतिहास सशोधन मडळाचे प्रो द वा पोतदार, बी ए , याच्या साहाय्याने तेथील श्री ग ह खरे याचेकडून ‘ भोर सस्थान ऐतिहासिक वस्तुसग्रहालयप्रदर्शिका ’ व ‘ *The Bhor Museum, Historical Section*–A Guide–1935 अशी मराठी व इग्रजी दोन पुस्तके दरबारतर्फे तयार करण्यात आली या पुस्तकाचे प्रकाशन पुणे येथील अखिल हिंदुस्थान अर्वाचीन इतिहास परिषदेचे वेळीं १९३५ साली करण्यात आले

## ३. **अबवडे येथील प्रेक्षणीय स्थळांचे वर्णन** ( मराठी व इग्रजी )

भोर सस्थानातील अबवडे या, श्रीशकराजी नारायण याची समाधि, जिजीसाहेब झुलता पूल, पचगगा आणि नागेश्वर या प्रेक्षणीय स्थळाविषयी व सृष्टिसौंदर्याविषयी, प्रसिद्ध स्थळाचे वर्णनात्मक एक छोटेसे पुस्तक इग्रजींत प्रसिद्ध केले हे पुस्तक श्री रा वि गो रानडे, एम् ए , एलएल बी , सेकड कौन्सिलर, यानी लिहिले या पुस्तकाचे मराठी भाषातर भोर हायस्कूलमधील शिक्षक श्री रा व्यकटेश अनत ढेकणे, बी एस्सी , यानी केले वरील पुस्तके दरबारतर्फे छापून ता १४ जानेवारी १९३७ रोजीं झालेल्या दरबारात प्रसिद्ध करण्यात आली या पुस्तकाचे लेखक श्री रानडे व रा ढेकणे यास अनुक्रमे रु ५० व रु २० पारितोषिक देऊन या दरबारात त्याचा गौरव करण्यात आला

## ४. भोर संस्थानचे भूवर्णन

भोर येथील राजा रघुनाथराव हायस्कूलचे हेड मास्तर व शाळाधिकारी रा विष्णु केशव सामक, बी ए, यानी 'भोर सस्थानचे भूवर्णन' नावाचे पुस्तक लिहिले तेंहि दरबारतर्फे प्रसिद्ध करण्यात येऊन ता १४ जानेवारी १९३७ रोजी झालेल्या दरबारात श्री सामक याना रु ५० पारितोषिक देऊन त्याचा गौरव करण्यात आला

## इतर ग्रंथकारांचे ग्रथप्रकाशनास मदत

### चिपळूणकर आणि मडळीस मदत

पुणे येथील गणेश विष्णु चिपळुणकर आणि मडळीचे मालक ( Proprietor ) भोरचे रहिवाशी वे शा स बाळकृष्ण पाडुरग ठकार यानी रामायण, महाभारत इत्यादि मोठमोठ्या व महत्त्वाच्या सस्कृत ग्रथाची भाषातरे मराठींतून प्रसिद्ध केली त्याच्या पुस्तकप्रकाशनाकरिता घेतलेल्या परिश्रमाचे लोकानीहि सहानुभूतिपूर्वक चीज केलेले आहे श्री ठकार याना त्याच्या या स्तुत्य कार्यास बऱ्याच सस्थानिकानी व सपन्न सद्गृहस्थानीं आर्थिक साहाय्य केले आहे श्रीमत राजेसाहेब गादीवर आले त्या सुमारास रा ठकार यानी योगवासिष्ठ या ग्रथाच्या तिसऱ्या भागाचें मराठी भाषातर नुकतेच प्रसिद्ध केले होते ते श्रीमत राजेसाहेब यास अर्पण करावे असा त्याचा हेतु होता तो हेतु श्रीमत राजेसाहेबानी मान्य केल्यावर पुस्तक अर्पण करण्याचा समारभ ता ३ डिसेबर १९२२ रोजी भोर येथें झाला. त्या वेळी समारभास हजर असलेले कै चिं वि वैद्य यानी मडळीतर्फे मानपत्र वाचून योगवासिष्ठाचे पुस्तक श्रीमताना अर्पण केले या पुस्तकात श्रीमताचे अल्प चरित्र देण्यात आले आहे या समारभाचे वेळीं रा ठकार याचे परिश्रम लक्षात घेऊन त्याना राष्ट्रीयग्रथप्रकाशनाचे कामीं मदत म्हणून श्रीमत राजेसाहेब यानी रु ३००० ची देणगी दिली

पुढे ता १४ जानेवारी १९२६ मध्ये श्रीमत् देवी भागवताचा भाग १ ला श्री ठकार यानीं छापून प्रसिद्ध केला हा भाग श्रीमत राजेसाहेब याच्या परमपूज्य मातोश्री कै श्रीमत सौ जिजीसाहेब याना त्यानी अर्पण केला आहे या भागाचे सुरुवातीस त्याचे सक्षिप्त चरित्र व फोटो घालून त्यास हा ग्रथ अर्पण केल्याबद्दल अर्पणपत्रिका घातलेली आहे १९२६ च्या

चित्राक १८७



हिंदुस्थानचे पार्लमेन्ट-गृह, न्यू दिल्ली
( या इमारतींत नरेंद्र-मडळाच्या बैठकी भरतात )

[ स. पा ८३९

जानेवारीच्या १४ तारखेस मकरसक्रातीच्या दरबारात हा भाग श्रीमत राजे-साहेब याना श्रीयुत ठकार यानीं भेट म्हणून दिला या ग्रथाच्या प्रकाशनाचे कामीं मदत म्हणून श्रीयुत ठकार याना रु २००० ची देणगी श्रीमत राजेसाहेब यानीं दिली

सन १९२७ सालीं वरील ग्रथप्रकाशनसस्थेने ‘ रामायण-समालोचना ’ नावाचे रामायणावरील पुस्तक दोन भागात प्रसिद्ध करून त्याचा पहिला भाग श्रीमताचे प्रथम कुटुब कै श्री सौ गगूताईसाहेब याना अल्प चरित्रासह व दुसरा भाग श्रीमताचे द्वितीय कुटुब कै श्री सौ लक्ष्मीबाई राणीसाहेब याना अल्प चरित्रासह अर्पण केला त्याकरिता ता २६ ऑगस्ट १९२७ रोजी व ता २७ डिसेबर १९२७ रोजीं खास दरबार भरविण्यात आले होते ता २७ डिसेबर रोजी श्री सौ लक्ष्मीबाईसाहेब याचा वाढदिवस होता व त्या वेळीं त्या अर्धाग-वाताच्या भयकर दुखण्यातून नुकत्याच बऱ्या झाल्या होत्या त्यामुळे गावातील सर्व स्त्रियाना भोजनास बोलावून हा दिवस विशेष उत्साहाने साजरा करण्यात आला होता या पुस्तकाचे प्रकाशनास मदत म्हणून रु २००० ची देणगी श्रीमत राजेसाहेब यानीं दिली

मेसर्स चिपळूणकर आणि मडळी ही रामायण, महाभारत इत्यादि पुस्तकप्रकाशन करणारी सस्था स्थापन झाल्यास १९२८ सालीं २५ वर्षे पूर्ण झाली तेव्हा सस्थेने आपला रौप्य-महोत्सव नूतन मराठी विद्यालयात ता २८ ऑक्टोबर १९२८ रोजीं मोठ्या थाटाने साजरा केला त्या वेळीं श्रीमत राजेसाहेब यानी श्रीयुत ठकार याच्या विनतीवरून या समारभाचे अध्यक्षस्थान स्वीकारले होते

## ‘ वेत आणि कुस्ती ’ अर्पणसमारंभ

पुणे येथील महाराष्ट्र क्रीडामडळाचा बक्षिससमारभ ता २९ एप्रिल १९३० रोजी पुणे येथे झाला या समारभाचे अध्यक्षस्थान श्रीमत बाबासाहेब यानी स्वीकारले होते. या समारभाचे वेळी पुणे येथील बॅरिस्टर अनत हरिहर खाजगीवाले यानीं आपले ‘वेत आणि कुस्ती’ हे पुस्तक प्रसिद्ध करून श्रीमत राजेसाहेब याना अर्पण केले. या पुस्तकप्रकाशनास श्रीमत राजेसाहेब यानी रु १००० मदतीदाखल दिले यानतर लवकरच श्रीमत राजेसाहेब हे

विलायतचे प्रवासाकरिता निघणार होते, म्हणून श्री खासगीवाले यानी पुस्तक अर्पण करते वेळीं केलेल्या भाषणात "श्रीमत राजेसाहेब याचा युरोपचा प्रवास सुखाचा होवो" अशी आशा प्रदर्शित केली या समारभाचे वेळीं महाराष्ट्र क्रीडामडळास श्रीमतानी रु २५१ देणगी दिली, व मडळाचे आश्रयदाते ( पेट्रन ) झाले

## भोर संस्थान 'सूर्यकांत' मासिकाचा 'भोर विशेषांक' अर्पणसमारंभ

भोर येथील नागरिक श्री रा नरेन्द्र काशिनाथ बावडेकर व श्री रा श्रीकृष्ण शकर दिघे, वकील, याचे सपादकत्वाखालीं 'सूर्यकात' नावाचे मासिक काहीं दिवस चालू होते या मासिकाचा 'भोर सस्थान वार्षिक १९३४' भोर विशेषाक म्हणून खास अक सपादकद्वयानीं श्री राजेसाहेबाच्या परवानगीने काढला या अकाचा अर्पणसमारभ भोर येथे ता २४ मार्च सन १९३४ इ रोजीं करून तो त्यानीं श्री राजेसाहेब याना जाहीर रीतीने अर्पण केला या मासिकात भोर सस्थानची भौगोलिक व ऐतिहासिक, पतसचिव घराण्याची, सस्थानचे गादीवर आतापर्यंत आलेल्या राजपुरुषाची, सचिव घराण्यातील राजस्त्रियाची, श्रीमत राजेसाहेब याच्या दहा वर्षांच्या प्रगतिपर राज्यकारभाराची, श्रीरामनवमी उत्सवाची, सस्थानच्या शैक्षणिक स्थळाची, श्रीमताच्या नरेन्द्र-मडळातील कामगिरीची, श्रीशकराजी नारायणाच्या समाधीविषयी प्रसिद्ध अशा अबवडे गावची, भोर सस्थानची लोकसख्या व उपजीविकेचीं साधने व उपयुक्त सस्था, वगैरेची सर्वांगीण माहिती परिश्रमपूर्वक सपादकद्वयानी एकत्र आणिली आहे प्रसगानुरूप बरींच चित्रेहि घातली आहेत विषयाची विविधता व चित्रवैपुल्यामुळे अक आकर्षक झाला आहे पृष्ठसख्या २५० पर्यंत झालेली आहे या अकाच्या अर्पणप्रसगीं, पुणे येथील व सस्थानातील बरेच साहित्यिक खास निमत्रणावरून समारभास हजर राहिले होते. प्रथमत श्री. रा. दिघे, वकील, यानीं समारभास हजर राहिलेल्या सर्व पाहुण्याचे स्वागत करून अशा प्रकारचा भोर सस्थानच्या माहितीचा अक काढण्याची मूळ कल्पना व तिची वाढ कसकशी होत गेली त्याची हकीकत थोडक्यात सागितली व या अकाचे महत्त्व किती आहे ते सागून त्याचे सर्व वाचक योग्य प्रकारें स्वागत करतील, अशी आशा व्यक्त केली. नतर जमलेल्या साहित्यसेवकापैकीं प्रो पोतदार

व श्री आबा चादोरकर यानीं भाषणे करून, ऐतिहासिक दृष्टया अशा सकलित अकाची उपयुक्तता विशेष आहे असे सागितले प्रोफेसर कर्वे यानीं मासिकाचा अक श्रीमत बाबासाहेब याना अर्पण केला त्याचा आनदाने स्वीकार करून श्रीमत राजेसाहेब यानी उद्बोधक सुश्राव्य भाषण केले त्यात त्यानीं, सध्याच्या काळात ऐतिहासिक एकत्र माहितीची किती गरज आहे, हिंदुस्थानची सयुक्त घटना व ब्रिटिश हिंदुस्थान याच्या दृष्टीने सस्थानच्या सविस्तर माहितीचा किती उपयोग आहे, अशा प्रकारची सस्थानाची खात्रीशीर, विश्वसनीय, साधार, ऐतिहासिक माहिती, त्याच्या राज्य-कारभाराची माहिती एकत्र मिळण्यासारखी नसल्यास सस्थानाबाहेर कसे गैरसमज पसरविले जातात, त्याचे निराकरण करण्यास एकत्र माहितीचा कसा उपयोग आहे, अशा आशयाचे भाषण करून या प्रकारच्या माहितीने पूर्ण असा अक काढण्याच्या सपादकाच्या इच्छेस वरील उपयुक्ततेच्या दृष्टीने व सस्थानाबद्दल त्याचे ठिकाणीं वसत असलेला आदर व प्रेम लक्षात घेऊन समति दिल्याचे सागितले श्री बावडेकर व श्री दिघे यानीं तो प्रसिद्ध करण्याच्या कामीं घेतलेल्या परिश्रमाबद्दल त्याना रु १२०० बक्षिस दिल्याचे जाहीर केले नतर ज्या ज्या लेखकानीं वरील अकाकरिता लेख लिहून अक माहितीपूर्ण करण्याचे कामी मदत केली व त्या समारभास हजर राहिले त्याना अकाची एक एक प्रत श्रीमताचे हस्ते बक्षिस देण्यात आली. पानसुपारी देण्यात आल्यावर हा समारभ आटोपला.

## ‘साहित्यतोरण’ अर्पणसमारभ

भोर सस्थानातील सर्व प्रसिद्ध व अप्रसिद्ध अशा सर्व दर्जांच्या लेखकानी आपापल्या आवडीचे विषयावरील लेख एकत्र करून ‘साहित्यतोरण’ नावाचा ग्रथ प्रसिद्ध केला यात काव्य, वाङ्मय, तत्त्वज्ञान, निबध, गोष्टी इत्यादि सर्व प्रकार आले आहेत हे पुस्तक छापून झाल्यावर भोर येथे श्रीरामनवमीच्या उत्सवात श्रीराम मडपात दरबार भरवून श्रीमत युवराज भाऊसाहेब याच्या हस्ते श्रीमत राजेसाहेब याना हा ग्रथ अर्पण करण्यात आला हा समारभ ता १५-४-१९३२ रोजीं साजरा झाला त्या वेळीं पुणे येथील प्रमुख साहित्यिक व या ‘तोरणा’चे सर्व लेखक हजर होते डॉ आर पी पराजपे, श्रीमत

सरदार मुजुमदार, श्री न चिं केळकर हेहि उपस्थित होते हा समारभ झाल्यावर सर्व पाहुणेमडळींना अल्पोपाहार देण्यात आला हा समारभ श्रीमत युवराजसाहेब याचे प्रोत्साहनामुळे यशस्वीपणे पार पडला

## त्रिदळ

याप्रमाणेच श्रीमत युवराज भाऊसाहेब, श्री गिरिजाबाई विंचुरकर व श्रीमती शाताबाई हेबळीकर ( श्रीमत युवराज याच्या मावशी ), या तिघानी केलेल्या कविता एकत्र छापून त्या 'त्रिदळ' या नावाने सन १९२९ मध्ये प्रसिद्ध केल्या या कविताहि उत्कृष्ट असल्याबद्दल त्याची प्रशसा झाली

## ' निर्झरिणी ' अर्पणसमारंभ

सन १९३१ च्या एप्रिलमध्ये श्रीरामनवमीचे दिवशी दुपारी ४ वाजता श्रीराममडपात दरबार भरवून श्रीमत युवराज भाऊसाहेब व श्री. सौ माईसाहेब या उभयतानीं केलेल्या कवितासग्रहाचे पुस्तक 'निर्झरिणी' श्रीमत राजेसाहेब याना अर्पण करण्याचा समारभ झाला या समारभास पुणे येथील बरेच विद्वान् लेखक व साहित्यसेवक आले होते त्यात कै भारताचार्य चिं वि वैद्य, साहित्यसम्राट् श्री तात्यासाहेब केळकर, प्रो वा म जोशी, प्रो. दत्तो वामन पोतदार वगैरे मडळी प्रामुख्याने उपस्थित होती श्री तात्यासाहेब केळकर वगैरेंनीं समयोचित उद्बोधक भाषणे करून श्रीमत युवराज व श्री युवराज्ञी यानीं आपल्या कविता एकत्र प्रसिद्ध केल्याबद्दल अभिनदन करून त्याचा गुणगौरव केला या प्रसगी श्रीमत राजेसाहेब यानीं पुढीलप्रमाणे भाषण केले

श्रीमत राजेसाहेब याचे भाषण

" भारताचार्य नानासाहेब वैद्य, मराठी साहित्यसम्राट् श्री तात्यासाहेब केळकर, निर्झरिणी काव्याचे प्रस्तावना-लेखक व वाङ्मयचिकित्सक प्रो वा म जोशी, सुप्रसिद्ध इतिहाससशोधक प्रो दत्तोपत पोतदार व इतर रसिक कवी, ग्रथकार व विद्वज्जनहो,

आजचा हा समारभ खरोखर अपूर्व आहे या अपूर्वतेचे मुख्य कारण असे आहे कीं, आमच्या या भोरसारख्या लहान शहरात सुप्रसिद्ध विद्वान् मडळी एकत्र जमण्याचा सुयोग आजपर्यंत कधींहि आलेला नव्हता, तो आज आलेला पाहून मला अत्यत आनद वाटत आहे. हा सुयोग घडवून आणण्याचे

सर्व श्रेय आमचे चिरंजीव भाऊसाहेब यानाच दिले पाहिजे आज येथे हे लहानसे साहित्यसमेलनच भरले आहे असे म्हटले असता अतिशयोक्ति होईल असे मला वाटत नाही चि भाऊसाहेब याचा ‘ त्रिदल ’ नावाचा काव्यग्रथ पूर्वीच प्रसिद्ध झाला असून त्यावर विद्वानानीं दिलेले अभिप्रायहि प्रसिद्ध झाले आहेत ते पाहता तो काव्यग्रथ बऱ्याच विद्वानाना पसत पडला असे म्हणण्यास हरकत नाहीं त्या अनुकूल अभिप्रायामुळे प्रोत्साहन मिळून त्यानी हा दुसरा काव्यग्रथ तयार केला असावा असे मला वाटते हल्लीचा ग्रथ मला अर्पण करण्याची त्यानी आपली इच्छा जेव्हा मला कळविली तेव्हा मला प्रथम त्याचे म्हणणे मान्य करणे प्रशस्त वाटले नाही परतु त्यानी फारच आग्रह केला, तेव्हा त्याची पितृभक्ति पाहून मलाहि पुत्रवात्सल्यामुळे त्याची इच्छा मोडवेना म्हणूनच मी त्याचे इच्छेप्रमाणे करणेस समति दिली

सद्गृहस्थहो, हल्ली जो काव्यग्रथ मला अर्पण करणेत आला आहे, त्यात भाऊसाहेब व आमच्या सूनबाई चि सौ माईसाहेब या उभयताची काव्ये आहेत चि भाऊसाहेब याच्याप्रमाणेच चि सौ माईसाहेब याचे अगीहि काव्यगुण आहे, हे पाहून त्याचेबद्दल कोणालाहि कौतुक वाटल्यावाचून राहणार नाही त्या बुद्धिमान् असून त्याचा स्वभाव प्रेमळ, मनमिळाऊ व निगर्वी आहे उभयताच्या अगी वसत असलेल्या या काव्यगुणाचा परस्पराच्या सहवासात उत्तरोत्तर विकास होत जाईल अशी मला उमेद आहे

विद्वज्जनहो, या उभयतानी केलेल्या काव्यातील गुणदोष पाहणेचे काम आपल्यासारख्या काव्यसमीक्षकाचे आहे व ते आपलेकडून होईलच मला त्याबद्दल काही सागावयाचे नाही व मीं सागणेहि शक्य व इष्ट नाही तथापि एक गोष्ट सागण्यास मला मोठा अभिमान वाटतो की, चि भाऊसाहेब यानी आपल्या अभ्यासाकडे यत्किंचितहि दुर्लक्ष न करिता फावल्या वेळेचा योग्य उपयोग करून काव्य निर्माण करण्याचे सामर्थ्य सपादन केले आहे व साहित्य-सेवकाच्या प्रेमास ते पात्र होत आहेत याबद्दल त्याचे कौतुक करणे माझे कर्तव्य आहे रसिक व मार्मिक विद्वज्जनाकडून आपल्या पुत्राचा गौरव होत असलेला पाहून कोणत्या सहृदय पित्याला धन्यता वाटल्यावाचून राहील ? सद्गृहस्थहो, आमच्या युरोपच्या प्रवासात चि भाऊसाहेब याचे अगचे जे विशेष गुण

प्रामुख्याने आमचे निदर्शनास आले त्याबद्दल आजचे प्रसगीं उल्लेख केला असता अप्रस्तुत होईल असे मला वाटत नाहीं आम्हीं जीं स्थळे पाहणेचे ठरविले होते त्या स्थळाच्या माहितीचीं पुस्तके वाचून त्यातील विशेष गोष्टी कोणच्या पाहावयाच्या याबद्दल त्यानीं अगोदरच ठरवून ठेविलेले असे आम्ही एखादे स्थळ पाहणेस गेलों म्हणजे ते आम्हाला त्या स्थळाबद्दल सपूर्ण माहिती देत, त्यावरून असें वाटे कीं, त्यानीं ते स्थळ पूर्वीं पाहिलेले असावे त्याना फोटोग्राफीचा नाद असून ते चागले फोटो घेतात, ही गोष्ट प्रवासात विशेष माझे नजरेस आली निरीक्षणशक्ती, चौकस बुद्धि, सोदर्यदृष्टि, सृष्टिप्रेम, सहृदयता इत्यादि त्याचे अगी असलेल्या गुणाची मला कल्पना होती तरी नित्य सहवासामुळे मला त्याचा प्रत्यक्ष अनुभव आला व हे गुण काव्याला पोपकच होत असतात हे मी आपणास साागावयास पाहिजे असे नाहीं आम्ही लडन शहरीं असताना वग कविसम्राट् रविद्रनाथ टागोर याचे भेटीचा योग चि. भाऊसाहेबाना आला व त्याचा त्याच्याशीं काव्यामुळे परिचय झाला त्याचप्रमाणे स्कॉटलडमधील लेकडिस्ट्रिक्ट, बर्न कवीचे निवासस्थान, स्वित्झरलड व इटली या देशातील नैसर्गिक भावनोत्पादक रमणीय स्थळे हीं आम्हीं पाहिलीं व हीं सर्व स्थळे काव्यस्फूर्ति उत्पन्न करणारीं असल्यामुळे त्याचा चि भाऊसाहेब याच्या काव्यानुकूल मनोवृत्तीवर परिणाम होणे स्वाभाविक आहे चि भाऊसाहेब व सूनबाई चि सौ माईसाहेब यानी आपला विद्याव्यासग अखड चालू ठेवून वाङ्मयसेवा करावी अशी माझी इच्छा आहे परमेश्वर उभयताना दीर्घायु करून उत्तम आरोग्य देवो व त्याचा सर्व प्रकारे उत्कर्ष करो एवढीच त्याचेजवळ प्रार्थना आहे हे कळविण्या-पलीकडे दुसरी माझी काय इच्छा असणार ?

शेवटीं प्रवासाची दगदग सोसून येथे येण्याची ज्या विद्वानानी तसदी घेतली व आजच्या समारभास शोभा आणिली त्याचे मी मन पूर्वक आभार मानतों. आपल्यासारख्या विद्वानाचे व महाराष्ट्रातील सुप्रसिद्ध कवी याचे येथे आगमन होणे म्हणजे ज्ञानगगेत अवगाहन करण्याची अमूल्य व आनददायक सधि मिळणे असें आम्ही समजतों ”

—

चित्रांक १८८



श्रीमत राजेसाहेब मिलिटरी पोषाखात. [स. पा. ८५१

( सेरिमोनिअल परेडोच्या वेळीं श्रीमतांनीं हा पेहराव केला. सन १९३८ ).

## प्रकरण २२ वें

# राज्यारोहण-वाढदिवस, वार्षिक रिपोर्ट व संस्थाननें दिलेलें पदवीदान



### राज्यारोहण-वाढदिवस

श्रीमत राजेसाहेब १८ ऑगस्ट १९२२ इसवी रोजी भोर संस्थानच्या गादीवर बसले दरसाल वरील दिवशी या मंगल प्रसंगाचे स्मरणार्थ दरबार भरवून लोकांना राज्यकारभार कशा प्रकारे चालला आहे हे कळविण्याचे हेतूने त्या त्या वर्षांत घडलेल्या प्रमुख गोष्टींचा अहवाल त्या दरबारात वाचून दाखविण्याची पद्धति नवीन सुरू केली आहे या दिवशी सकाळी परेड ग्राउंडवर सेरिमोनिअल परेड करण्यात येते त्या वेळीं श्रीमंत राजेसाहेब स्वत हजर राहून सलामीचा स्वीकार करितात दुपारीं संस्थानचे प्रमुख नोकरवर्गांना आणि प्रतिष्ठित लोकांना भोजनास बोलविण्यात येते भोजनोत्तर ३-३० वाजता श्रीराम-मंडपात दरबार भरविण्यात येतो या दरबारास सर्व अधिकारी, नोकरवर्ग आणि गावातील शेटसावकार इत्यादींना निमंत्रण देण्यात येते ते सर्व युनिफॉर्म पोषाख करून दरबारास हजर राहतात श्रीमत राजेसाहेब दरबारात येतेसमयी ९ तोफांची व स्वार–शिबंदीची सलामी देण्यात येते दरबारात येऊन श्रीमत राजेसाहेब उच्चासनावर अधिष्ठित झाल्यावर दरबारास सुरुवात होते संस्थानचे दिवाण गेल्या बारा महिन्यांतील राज्यकारभारातील महत्त्वाच्या गोष्टी, श्रीमंतांच्या हालचाली, भेटी-परतभेटी, प्रवास इत्यादि गोष्टींचे इतिवृत्त वाचून दाखवितात त्यानंतर श्रीमत राजेसाहेबांचे भाषण होऊन त्यात निरनिराळ्या खात्यांतील कामकाजाचे पर्यालोचन करण्यात येते नंतर हारतुरे, अत्तरगुलाब, पानसुपारी देण्यात आल्यावर दरबार समाप्त होतो दरबारनंतर जमलेल्या मंडळीस अल्पोपाहार देण्यात येतो या दिवशी भोर येथील शाळा-कचेऱ्यांना सुट्टी देण्यात येते आणि विद्यार्थ्यांना मिठाई वाटण्यात येते गोरगरिबांस अन्नदान करण्यात येते

१९२४ सालापासून संस्थानांतील तालुक्यांचे ठिकाणी आणि पिरगूट येथें दरबार भरवून त्या त्या ठिकाणच्या प्रमुख लोकांना कचेरीस बोलाविण्यात

येते आणि तेथे राज्यारोहणदिन साजरा करण्यात येतो समारभानतर सर्वांना अल्पोपाहार देण्यात येऊन शाळा-कचेऱ्याना सुट्टी देण्यात येते

श्रीमत राजेसाहेबाच्या राज्यारोहणाचा तृतीय वार्षिक दिन १८ ऑगस्ट १९२५ रोजी भोर येथें साजरा झाला त्या प्रसगीं श्रीमत राजेसाहेबानी राज्यकारभारातील महत्त्वाच्या गोष्टीचा निकाल कार्यकारी मडळाच्या विचार-विनिमयाने समतोल बुद्धीने, नि पक्षपातीपणाने व्हावा या उद्देशाने, राज्यातील प्रत्येक खात्याची कामे त्याचे विचाराने सत्वर करण्याची सोय व्हावी याकरिता तीन सभासदाचे एक कार्यकारी मडळ ( Executive Council ) लवकरच स्थापन करण्याचे जाहीर केले त्याप्रमाणे लवकरच असे कौन्सिल स्थापन करण्यात आले

सन १९२७ च्या ऑगस्ट महिन्याच्या १८ तारखेस श्रीमत राजेसाहेब गादीवर आल्यास ५ वर्षे पूर्ण झाली ता १८ ऑगस्ट रोजी झालेल्या दरबारात श्रीमत राजेसाहेबाच्या पचवार्षिक कारकीर्दीचे सस्थानचे कारभारी यानी वाचलेल्या अहवालात सिंहावलोकन करण्यात आले त्यात मागील पाच वर्षांत केलेल्या सुधारणा आणि ठळक महत्त्वाच्या गोष्टी सागून सुधारणा करण्यात आल्यामुळे सुमारे १६,००० रुपये वार्षिक उत्पन्नात घट येऊन खर्चांत सुमारे ६०,००० रुपयाची वाढ दरसाल झाली असल्याचे सागण्यात आले या समारभास त्या सालच्या सुधागड तालुका सभेच्या अधिवेशनाचे अध्यक्ष आणि भोर सस्थानचे सुधागड तालुक्यातील विद्वान् प्रजाजन रा म ह मोडक हे आले होते त्यानी दिवाणसाहेबानी अहवाल वाचून दाखविल्यावर श्रीमताच्या प्रगतिपर धोरणाबद्दल गौरवपर भाषण केले त्याचे भाषण पुढें परिशिष्ट १८ मध्ये दिले आहे

ता १८ ऑगस्ट १९२८ रोजी श्रीमत राजेसाहेबाच्या राज्यारोहणाचा सहावा वार्षिकदिन साजरा झाला १९२७च्या नोव्हेबरमध्ये श्रीमत राजेसाहेबाना वशपरपरा ९ तोफाचे सलामीचा मान मिळाला, त्याप्रीत्यर्थ प्रजाजनानी श्रीमत राजेसाहेबाना ता २९ जानेवारी १९२८ रोजी दरबार भरवून मान-पत्रे दिलीं त्या वेळी मानपत्राना दिलेल्या उत्तराचे भाषणात भोर सस्थानात कायदेमडळ स्थापन करण्याचा आपला हेतु श्रीमत राजेसाहेबानीं जाहीर केला

या भाषणात केलेल्या घोषणेस अनुसरून ता १८ ऑगस्ट १९२८ रोजी भरलेल्या दरबारात कायदेमडळ स्थापन करून सभासदाची यादी श्रीमत राजेसाहेबानी आपल्या भाषणात जाहीर केली या दिवशीं सस्थानचे दिवाण-साहेबानी गतसालचा अहवाल वाचून दाखविल्यानतर सस्थानातील इनामदार-सस्था, अखिल भोर सस्थान प्रजापरिषद आणि सुधागड तालुका सभा या सस्थाची डेप्युटेशन्स आली होती त्याचे म्हणणे श्रीमत राजेसाहेबानीं ऐकून घेतल्यानतर सर्वांना उत्तरादाखल विस्तृत भाषण करून वर लिहिल्या-प्रमाणे कायदेमडळाची घटना जाहीर केली श्रीमत राजेसाहेबाचे भाषण आणि समारभाकरिता आलेल्या विद्वान् सद्गृहस्थाची भाषणे 'कायदेमडळाची स्थापना' या सदरात प्रकरण ५ मध्ये सविस्तरपणे देण्यात आलीच आहेत

श्रीमत राजेसाहेब १९३० साली विलायतचे सफरीस गेले असल्यामुळे या सालचे राज्यारोहण-वाढदिवससमारभास ते हजर नव्हते सालाबादप्रमाणे ता १८ ऑगस्ट रोजी भोर येथें आणि तालुक्याचे ठिकाणी दरबार भरविण्यात येऊन अहवाल वाचून दाखविण्यात आला

श्रीमत राजेसाहेब गादीवर आल्याला ता १८ ऑगस्ट १९३२ रोजीं १० वर्षे पूर्ण झाली तेव्हा या तारखेस झालेल्या दरबारात श्रीमत राजेसाहेबाच्या दशमवार्षिक प्रगतिपर राज्यकारभाराचा अहवाल वाचून दाखविला या वर्षीची दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे कायदेमडळाची पुनर्घटना आणि तालुका लोकलबोर्डांची स्थापना ही होय ता २७ जानेवारी १९३२ रोजी पहिल्या कायदेमडळाच्या शेवटच्या बैठकीचे वेळी श्रीमत राजेसाहेबानी भाषण करून कायदेमडळाची पुनर्घटना आणि तालुका बोर्डाची स्थापना करण्याचा हेतु जाहीर केला होता त्या हेतूप्रमाणे नवीन कोन्सिल व लोकल बोर्ड स्थापन करून त्याची घटना व त्यातील सभासदाची नावे ता १८च्या दरबारात जाहीर केली या वेळीं झालेली भाषणे कायदेमडळाच्या हकीकतीत देण्यात आली आहेत

ता १८ ऑगस्ट १९३३ रोजीं अकरावा राज्यारोहणदिन सालाबाद-प्रमाणे करण्यात आला. दिवाणसाहेबानी अहवाल वाचून दाखविल्यावर श्रीमत राजेसाहेब यानी भाषण केले त्यात सस्थानचे माजी शाळाधिकारी श्री रा वासुदेव नारायण जोशी याना या साली सेवानिवृत्त करण्यात आले होते,

त्याच्या नोकरीतील सस्थानबाबतच्या कामगिरीचा श्रीमत राजेसाहेबानीं उल्लेख करून त्याना मानाचा पोपाख देऊन त्याचा गौरव केला

बारावे राज्यारोहणदिनाचे दिवशी श्रीमतानी भापण केले त्यात सस्थानचे सेवक कै रा बापूजी रामचद्र लोहकरे आणि कै विष्णू दादाजी देशपाडे याच्या निधनाबद्दल खेद व्यक्त करून त्याच्या कामगिरीचा गौरव-पूर्वक उल्लेख करून त्याच्या चिरजिवाना अनुक्रमे रु ५०० व रु १००० दिल्याचे जाहीर केले तसेच त्यानी आपल्या भापणात भोरचे इलेक्ट्रिक कॉट्रॅक्टर रा नानाजी पाडुरग थोपटे याना भोर येथे वीज-पुरवठा करून भोरचे सौंदर्यात भर टाकण्याचे कामीं घेतलेल्या परिश्रमाबद्दल ‘ नगरभूपण’ ही पदवी देऊन त्याचा गौरव केला या समारभास हजर असलेल्या कायदेमडळाचे सभासदापैकी उपाध्यक्ष मि सी. जी आगाशे आणि मि एम् एच् देव यानी श्रीमताच्या धोरणाबद्दल समाधान व्यक्त करणारीं भापणे केली

पुढील सालचे ऑगस्ट महिन्याचे १८ तारखेस श्रीमत राजेसाहेब याचा त्रयोदशवार्पिक राज्यारोहणदिन साजरा करण्यात आला सालाबादप्रमाणे अहवालवाचन झाल्यावर श्रीमत राजेसाहेब यानीं भापण करून श्री रा रा नरहर गोपाळ अबेकर, पर्सनल असिस्टट, याना रौप्य ज्युबिलीचे पदक व त्याची सनद आणि श्री रा रा थोपटे याना दिलेल्या ‘ नगरभूपण ’ या पदवीची सनद आणि पदक दिले

१९३७ च्या ऑगस्टमध्ये भोर येथे कॉलऱ्याची साथ चालू होती ती बद पडल्यावर सप्टेबर महिन्याचे ९ तारखेस श्रीमत राजेसाहेब याचा चतुर्दश-वार्पिक राज्यारोहणदिन साजरा करण्यात आला या दिवशी भोर सस्थानचे विचित्रगड तालुक्यातील बावडे गावातील रहिवाश्यानीं, तेथील ग्रामसुधारणा मडळाचे विद्यमाने, श्रीमताच्या राज्यारोहणाचा वाढदिवस सातारा येथील श्रीमत सरदार बाबासाहेब पडितराव याचे अध्यक्षतेखाली बावडे येथें साजरा केला

## वार्षिक रिपोर्ट

सस्थानच्या राजकीय महत्त्वाच्या व सस्थानाधिपतींच्या व्यक्तिगत महत्त्वाच्या प्रत्येक वर्षांतील गोष्टींचा इग्रजी अहवाल सस्थानचे पोलिटिकल एजट,

चित्रांक १८९



हत्ता नवीन खरेदी केल्यावर श्रीमत राजेसाहेब प्रथम सुमुहूर्तावर हत्तीवर बसले त्या वेळचा फोटो.

(सन १९३८)

नतर ए जी जी व हल्लीं रेसिडेट याचेकडे दरसाल पाठविण्याची पद्धति बऱ्याच वर्षांपासून चालू आहे पूर्वीच्या पद्धतीत राजकीय महत्त्वाच्या, सस्थानाधिपतींच्या व्यक्तिगत महत्त्वाच्या व कमी अगर जास्त महत्त्वाच्या अशा सर्वच गोष्टी तारीखवार लिहून त्रोटक अहवाल पाठविण्यात येत असे तसेच भोर येथे ता २५-२६ जानेवारी सन १९२२ रोजीं अखिल भोर सस्थान प्रजापरिषदेचे प्रथम अधिवेशन भोर येथे श्रीयुत न चिं केळकर याचे अध्यक्षतेखाली झाले त्या वेळी झालेल्या भाषणात सस्थानच्या रिपोर्ट लिहिण्याच्या पद्धतीवर बरीच टीका असून त्यात काय सुधारणा व्हावयास पाहिजेत तेहि सूचित केले होते सस्थानचे कारभाराचा रिपोर्ट अधिपतींनीं स्वत चे सहीने लिहिणे, त्यात स्वत चे नाव, वय वगैरे व आपल्या कुटुबाबद्दलची हकीकत लिहून पो एजट यास सादर करणे ह्या गोष्टी कमीपणा आणणाऱ्या आहेत, ह्या सर्व कारणामुळे ही पद्धत श्रीमत राजेसाहेबाना पसत नव्हती तथापि सन १९३२ सालपर्यंत श्रीमत राजेसाहेबाना अन्य अनेक महत्त्वाचे प्रश्नाचा निकाल लावण्याचा असल्यामुळे ह्या गोष्टीकडे लक्ष देण्यास तितकीशी सवड न सापडल्यामुळे पूर्वीच्या पद्धतीस अनुसरूनच रिपोर्ट पाठविण्यात आले राज्यकारभारातील प्रत्येक खात्याची माहिती, सस्थानाधिपतीपेक्षा त्या खात्यावर देखरेख करणाऱ्या सस्थानातील मुख्य कार्यकारी अधिकारी यासच असणे शक्य असल्याने, सस्थानचा अहवाल अधिपतींनीं पोलिटिकल एजट यास सादर न करता त्या कार्यकारी अधिकाऱ्यानीं तो तयार करून अधिपतींनी ब्रिटिश गव्हर्मेंटकडे रवाना करावा असे श्रीमत राजेसाहेब यास वाटत होते त्यास अनुसरून त्यानीं इतर बऱ्याच दुसऱ्या सस्थानाचे अहवाल सूक्ष्म रीतीने वाचून त्याच्यातील योग्य त्या सुधारणाचा समावेश करून कशा प्रकारे अहवालाची रचना असावी अशा बद्दलच्या सूचना आपल्या अधिकाऱ्याना करून नवीन पद्धतीने अहवाल तयार करविला व तो भोर सस्थान हिंदुस्थान सरकारच्या प्रत्यक्ष देखरेखी-खालीं ता १ एप्रिल १९३३ पासून देण्यात आल्यावर दक्षिणेतील सस्थानाचे पहिले ए जी जी ले-कर्नल एच विल्बरफोर्स-बेल याजकडे कोल्हापुरास पाठविण्यात आला या रिपोर्टांत पहिल्या प्रकरणाचे तीन विभाग पाडून प्रथम सस्थानची ऐतिहासिक व भौगोलिक माहिती, राजघराण्याची

कौटुबिक माहिती, संस्थानचा दर्जा, राज्यकारभारपद्धति, ब्रिटिश सरकारशीं व इतर संस्थानाशीं संस्थानाचा संबंध हे पहिल्या विभागात, अहवालाच्या वर्षांत घडलेल्या महत्त्वाच्या गोष्टी दुसऱ्या विभागात, संस्थानाधिपतीच्या हालचाली, भेटी, प्रवास, देणग्या वगैरे तिसऱ्या विभागात व पुढे प्रकरण २ पासून ९ पर्यंत संस्थानातील प्रत्येक खात्यातील प्रगतीचा तपशील देण्यात आलेला असून, सर्वसामान्य राज्यकारभाराचे समालोचन व त्यापुढे खातेनिहायचे तपशीलवार माहितीचे तक्ते आणि त्यानतर एका स्वतंत्र विभागात परिशिष्टरूपाने अहवालाचे सालातील महत्त्वाचीं भाषणे देण्यात आलेली होती तसेच हा अहवाल संस्थानचे चीफ सेक्रेटरी यानी तयार करून तो संस्थानचे अधिपतींना सादर करण्यात आला होता या नवीन रचनेमुळे अहवाल सर्वांगपरिपूर्ण होऊन संस्थानविषयक महत्त्वाची माहिती चटकन् मिळू शकते अशा प्रकारचा रिपोर्ट ए जी जी कडे पाठविण्यात आल्यावर त्याना ही पद्धती पसत पडून त्याबद्दल श्रीमंत राजेसाहेबाचे त्यानी पत्र पाठवून अभिनदन केले वर वर्णन केलेल्या पद्धतीस अनुसरून हल्ली दर सालचा वार्षिक रिपोर्ट तयार करून तो रेसिडेंटसाहेब याचेकडे पाठविण्यात येत असतो हा रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यानतर तो भोर कायदेमडळाच्या सर्व सभासदाकडे नेहमीच्या पद्धतीस अनुसरून माहितीकरिता पाठविण्यात आला त्यानतर लवकरच ता १८ ऑगस्ट सन १९३४ रोजी भरलेल्या राज्यारोहण-वाढदिवसाचे दरबारास कायदेमडळाचे सभासद श्री एम् एच् देव यानीं वार्षिक रिपोर्टाची रचना योग्य तो फेरफार करून सविस्तर व माहितीपूर्ण अशी तयार केल्याबद्दल श्रीमताचे हार्दिक अभिनदन केले.

## संस्थानने दिलेलें पदवीदान

श्रीमत राजेसाहेब १९२२ सालीं गादीवर आले त्या वेळी त्यानी केलेल्या भाषणात पुढील उद्गार काढले होते –

" संस्थानातील ज्या ज्या लोकानीं, मग ते सरकारी नोकर असोत किंवा स्वतंत्र धदेवाले असोत–लोकोपयोगी किंवा संस्थानची कामगिरी द्रव्य, अगमेहनत किंवा बौद्धिक सामर्थ्य इत्यादि द्वारानीं विशेष प्रकारची केलेली दृष्टोत्पत्तीस येईल त्याना त्याना, ब्रिटिश सरकार किंवा दुसरीं काही संस्थाने

यात चालू असलेल्या धर्तीवर तिकडील मानमरातबाचीं चिन्हे किंवा पदव्या याच्याशीं विरोध न येईल अशा प्रकारे मानमरातब व किताब देण्याची पद्धति, माननीयाचा मान व्हावा व प्रशसनीय कर्तबगारी दाखविण्यास दुसऱ्या लोकानाहि उत्तेजन यावे या हेतूने सुरू करून तिचा अल्पारभहि हल्ली चालू असलेल्या समारभात करावा असे आम्हास वाटते ”

या उताऱ्याप्रमाणे श्रीमतानी त्या वेळेपासून भोर सस्थानातील लायक गृहस्थाना त्याच्या राजकीय, सामाजिक व सस्थानहिताच्या कामगिरीबद्दल किताब देऊन त्याचा गौरव करण्याची प्रथा पाडली

## श्रीमंत राजेसाहेब यांनी केलेले पदवीदान

### ‘नगरशेट’

भोर येथील दानशूर व उदार व्यापारी शेठ रामदास किसनदास यानी अनेक दातृत्वाची कृत्ये केली धर्मादाय करण्याकडे व गोरगरिबाचे उपयोगी पडण्याकडे त्याची प्रवृत्ति फार आहे सस्थानातील रामक्रीडाभुवन या सस्थेस रु १५०, श्री सौ गगुताईसाहेब वाचनालय या सस्थेस रु २०० आणि रु २००० च्या प्रॉमिसरी नोटा खरेदी करून त्याचे व्याजाचा विनियोग गरीब विद्यार्थ्यास मदत देण्याकरिता याप्रमाणे त्यानी देणग्या दिल्या या त्याच्या उदारपणाचा श्रीमत राजेसाहेब यानीं १९२२ सालीच ‘नगरशेट’ हा बहुमानाचा किताब व त्याचे मेडल देऊन गौरव केला

### ‘नगरभूषण’

भोर येथील इलेक्ट्रिक कॉन्ट्रॅक्टर रा नानाजी पाडुरग थोपटे यानी भोर येथें वीज आणण्याच्या कामी सस्थानशी वडाडीने स्वार्थत्यागपूर्वक केलेले सहकार्य व तत्परता लक्षात घेऊन त्याना ‘ नगरभूषण ’ हा किताब व त्याचे मेडल देऊन त्याचा सन १९३४ साली गौरव केला

### ‘ग्रामभूषण’

बावडे येथील रहिवासी रा तुकाराम बापूजीराव पवार यानी ग्रामसुधारणेच्या कामी दिलेल्या रु १००० या उदार देणगीबद्दल श्रीमतानी आपल्या षष्ट्यब्द-पूर्तिसमारभाच्या वेळी ता १६ डिसेबर १९३८ रोजीं ‘ग्रामभूषण’ ही पदवी देऊन त्याचा गौरव केला त्याबद्दलचे पदक त्याना लवकरच देण्यात येणार आहे

## 'व्यवसायविभूषण'

पुण्याचे व्यापारी व पुणे शहर म्युनिसिपालिटीचे माजी नगराध्यक्ष रा शकर नाना करपे यानीं रु १००० भोर येथील सिल्व्हर ज्युबिली हॉस्पिटलला देणगी दिली त्याबद्दल, षष्ट्यब्दिपूर्तिप्रसगीं 'व्यवसायविभूषण' पदवी देऊन त्याच्या औदार्याचा गौरव केला त्याबद्दलचे पदक लवकरच त्याना देण्यात येणार आहे

## श्रीमतांच्या शिफारशीवरून ब्रिटिश सरकारांतून पदवीप्राप्ति

### ' रावसाहेब '

भोरचे माजी न्यायमत्री कै रा अनत रामचद्र जोशी हे सस्थानच्या नोकरींत असताना भाटघर धरणाचे कामीं सस्थानतर्फे लॅण्ड ॲक्विझिशन ऑफिसर म्हणून त्यानी केलेल्या उत्कृष्ट कामगिरीबद्दल श्रीमताच्या शिफारशी-वरून त्याना ब्रिटिश सरकारकडून रावसाहेब हा किताब व त्याचे पदक सन १९२७ सालीं देण्यात आले

### ' रावबहादुर '

रा सा माधव नारायण हुल्याळ, बी ए , याना १९३१ सालीं भोर येथे दिवाण नेमण्यात आले भोर येथे आल्यावर राज्यकारभारात सुधारणा घडवून आणण्याच्या व शातता प्रस्थापित करण्याच्या कामीं त्याची सस्थानला बरीच मदत झाली तेव्हा श्रीमत राजेसाहेबाच्या शिफारशीवरून सन १९३५ सालीं ब्रिटिश सरकारकडून त्याना 'रावबहादुर' करण्यात येऊन त्याचे मेटल् देण्यात आले

## मेडल्स प्राप्ति

माजी बादशाह पचम जॉर्ज याच्या कारकीर्दीची रौप्य-जुबिली ता ६ मे १९३५ इ रोजीं साजरी करण्यात आली त्या ज्युबिलीनिमित्त श्रीमत राजे-साहेबाच्या शिफारशीवरून युवराज श्रीमत भाऊसाहेब, रा रघुनाथ केशव देशपाडे, दरबार वकील, भोर, व रा नरहर गोपाळ अबेकर, बी ए , याना ब्रिटिश सरकारकडून सिल्व्हर ज्युबिली-मेडल्स् देण्यात आलीं तीं ता ६ मे रोजीं भोर येथें ज्युबिलीनिमित्त भरविण्यात आलेल्या दरबारात श्रीमतानीं स्वहस्ताने वरील गृहस्थाना दिलीं

चित्रांक १९०

**श्रीशंकराजी नारायण याचे पुण्यतिथि समारंभास आलेली पाहुणे मंडळी ( सन १९३१ ).**



बसलले —१ डा. बेलवलकर, ३ सेन्ट निहालसिंग, ४ डॉ कालीदास नाग, ५ श्री राजेसाहेब, ६ मिसेस् निहालसिंग, ८ श्री युवराज.

[स पा. ८७०

ता १२ मे १९३७ इ. रोजीं बादशहा सहावे जॉर्ज याचा राज्यारोहण-समारभ झाला या समारभानिमित्त ‘ कॉरोनेशन मेडल्स ’ वाटण्यात आलीं श्रीमत राजेसाहेब यानीं शिफारस केल्यावरून श्रीमत युवराज भाऊसाहेब, रा रा कोंडो महादेव कुमटेकर, बी ए , एल्‌एल्‌ बी , रिटायर्ड डिस्ट्रिक्ट व सेशन्स जज्ज व हल्लीं सस्थानचे दिवाण, आणि कै गणेश बाळकृष्ण फडके, त्या वेळचे सस्थानच्या प्रचडगड तालुक्याचे मामलेदार, याना ब्रिटिश सरकारातून ‘ कॉरोनेशन मेडल्स् ’ आलेली त्याना देण्यात आलीं

## ‘ महामहोपाध्याय ’

भोरचे रहिवासी वे शा स सितारामशास्त्री हे कलकत्ता सस्कृत कॉलेजात सस्कृतचे प्रोफेसर आहेत त्याची कामगिरी लक्षात घेऊन व सस्कृत भाषेवरील त्याचे प्रभुत्व पाहून त्याना ‘ महामहोपाध्याय ’ ही उच्च पदवी व पोषाख देऊन हिंदुस्थान सरकारने त्याचा गौरव केला आहे

## प्रकरण २३ वे

# वतनी खात्याकडील कारखान्याची सुधारणा

आतापावेतों लिहिलेल्या हकीकतींत श्रीमत राजेसाहेब यानीं दौलतीकडील मुलकी, दिवाणी या सस्थानातील राज्ययत्रास आवश्यक अशा खात्यात राज्यकारभार सुव्यवस्थितपणे प्रगतिपर धोरणाने चालण्याकरिता काय काय सुवारणा आपल्या सप्तदशवार्षिक कारकीर्दीत घडवून आणल्या याविषयीचे विस्तृत विवेचन वाचकाना सादर केले या राजकीय विभागाखेरीज सस्थानास अत्यत आवश्यक असलेला असा वतनी (खासगी) विभाग व त्यात समाविष्ट करण्यात आलेले व पूर्वीपासून म्हणण्यात येत असलेले अठरा कारखाने अथवा खातीं याच्या प्रगतीचा या प्रकरणात विचार करावयाचा आहे

कै. श्रीमत रावसाहेब याचे वेळीं सस्थानचा कारभार एकतत्री पद्धतीने करण्यात येत असल्यामुळे सस्थानच्या खर्चात खाजगी, स्टेट वगैरे भेद त्याचे वेळीं नव्हते त्यामुळे राज्यकारभारविषयक मुलकी, दिवाणी, पोलिस, फॉरेस्ट, शाळा, इत्यादि खात्याप्रमाणेच सस्थानाधिपतींच्या स्वत चे तैनातीकडील खर्चहि एके ठिकाणींच केला जात असे श्रीमत बाबासाहेब गादीवर येण्याच्या सुमारास देशात सर्वत्र चळवळीचे वातावरण पसरलेले होते लोकामध्ये हक्काची जागृति होऊ लागली होती अनियत्रित एकतत्री राज्यकारभार बिनविरोध चालू ठेवणे अशक्य करण्याइतकी परिस्थिति बदलत आली होती सस्थानचे उत्पन्नापैकीं काहीं ठराविक रक्कम तोडून घेऊन अधिपतींनीं आपला वैयक्तिक खाजगी खर्च भागवावा, सस्थानचे उत्पन्नावर त्याच्या खर्चाचा बोजा बेसुमार पाडू नये, प्रजेचा पैसा प्रजेच्या हिताकरिता खर्च करावा अशी विचारप्रणाली सर्व प्रजाजनामध्ये दिसून येत होती श्रीमत राजेसाहेब यानीं ही परिस्थिति ओळखून ठेविली असल्यामुळे त्यानीं गादीवर आल्यानतर तीन वर्षांनी १९२५ सालापासून स्वत चे खासगी खर्चाकरिता रु ७०,००० व दरबार उपयोगी खर्चाकरिता रु ३०,००० अशी दरसाल रक्कम तोडून घेऊ लागले व त्यातून खासगी ( वतनी ) विभागाचा खर्च करू लागले सस्थान उपयोगाच्या अनेक खर्चाच्या बाबींस खासगी उत्पन्नातून त्यानीं वेळोवेळीं सढळ हाताने मदत केली

आहे त्याबाबत त्यांनीं खासगीतून ज्या देणग्या दिल्या आहेत त्याकडे नजर टाकल्यास सहज ही मदत लक्षात येणार आहे

वतनी खात्यात त्यातील बाबींचे अठरा विभाग पूर्वीपासूनच पाडलेले आहेत त्यापैकी हल्ली अस्तित्वात असलेले विभाग पुढीलप्रमाणे आहेत त्या प्रत्येकास कारखाना असें सबोधण्यात येते १ शिबदी, २ पागा, ३ रथखाना, ४ पिलखाना, ५ थट्टी व खिल्लार, ६ उष्ट्रखाना, ७ गजीखाना, ८ फरासखाना व बिल्वर, ९ कापडी जामदारखाना, १० जवाहिरखाना, ११ मुदपाकखाना अगर कोठी, १२ शिबिकामहाल, १३ शस्त्रागार व म्यूझिअम, १४ पॅलेस लायब्ररी, १५ नगारखाना अगर नौबतखाना, १६ कलावतखाना हे ते कारखाने होत हे कारखाने निरनिराळ्या अधिकाऱ्याकडे सोंपविलेले आहेत. शिबदी व पागा ही खातीं स्टेटकडील असून त्याचा खर्च स्टेटमधून करण्यात येतो फक्त या खात्याकडील कामकाजाची व्यवस्था वतनीकडून पाहण्यात येते, म्हणून त्याचा या ठिकाणीं उल्लेख केलेला आहे

## शिबंदी खातें

सगिनवाले, अरब, मौलाद, बाणदार आणि ढालाईत या सरक्षक लोकाच्या व्यवस्थेकरिता हे खाते असते या खात्यावर पूर्वी दोन कामगार सबनीस आणि शिबदी कामगार असे होते सबनीस याजकडून अरब व बाणदार हीं खाती काटून ती शिबदी कामगार याजकडे देण्यात आलीं आहेत त्या लोकाना कवाइतीचे शिक्षण देण्यात येते सस्थानचे बॅडचा यातच समावेश होतो नवीन शिकलेला बॅडमास्तर नेमून बारा इसमाचा बॅड शिक्षण देऊन तयार ठेविलेला आहे या खात्यातील वयोवृद्ध व निकामी झालेले लोक काढून त्याना पेन्शन व ग्रॅच्युइटी वगैरे देण्यात आली त्याचे जागीं नवीन तरुण लोकाची भरती करण्यात आली ड्रेस( पोषाख )मध्ये सुधारणा करून ते वेळचे वेळी देण्यात येतील अशी तजवीज करण्यात आली शिबदीकडे पूर्वी मझललोडिंग बदुका वापरण्यात येत असत हल्ली नवीन ( रायफल ) नबर ४१० स्मूथ बोअर ब्रिजलोड मस्केटस् ७५ आणि नबर १२ स्मूथ बोअर ब्रिजलोड मिडलॅंड गन्स २५ देण्यात आल्या आहेत. अरब, मौलाद, बाणदार व पोलिस याना पूर्वी

ड्रिलचे शिक्षण योग्य प्रकारे देण्यात येत नसे त्याना चागले शिक्षण मिळेल अशी तजवीज करून हे खाते पूर्णपणे कार्यक्षम करण्यात आले आहे

## पागा

या खात्यात पूर्वी अमलदारसुद्धा ३४ इसम होते त्याना प्रत्येकीं २५ ते ३० रुपये दरमहा पगार मिळत असे त्यात स्वत चे व घोडयाचे पोट भरणे कठीण पडे घोडीं एका मापाची नसून निरनिराळया रगाची अशी होती ड्रेस व सामान जुन्या पद्धतीचे होते स्वाराना कवाइतीचे शिक्षण बेताचेच असे

श्रीमत राजेसाहेब गादीवर आल्यावर पागेकडील कामगार हे वयातीत झाल्याने त्याना पेन्शन देण्यात आले व त्याचे जागी सस्थानातील नवीन माहितगार कामगाराची या खात्यावर नेमणूक केली स्वार पुष्कळ असण्यापेक्षा थोडेच परतु चागले घोडे व चागले स्वार असणे उपयुक्ततेच्या दृष्टीने चागले असे वाटून, श्रीमतानीं स्वाराची सख्या कमी करून ती अम्मलदारासह २५ केली आणि घोडयाची दाणावैरण आणि स्वारास स्वत चे पोटास पुरेसे अन्न व वस्त्र मिळण्याकरिता पगाराचे प्रमाण रु ३५ ते ४५ पर्यंत वाढविले घोडे एका रगाचे सारख्या मापाचे घेण्यात आले पूर्वीच्या वृद्ध झालेल्या स्वाराना कमी करण्यात येऊन त्याना नोकरीच्या मानाने ग्रॅच्युइटी अगर पेन्शन जे बसले ते त्याना देण्यात आले पूर्वी घोडयाचीं खोगिरे ( जिने ) जुन्या पद्धतीची होतीं तीं काढून टाकून नवीन इग्रजी पद्धतीची कातडी जिने स्वाराना पुरविण्यात आलीं स्वारास व शिबदीस ड्रिल शिकविण्याकरिता व शिस्त लावण्याकरिता एका अनुभवी पेन्शनरची नेमणूक करण्यात आली घोड्यास चदीवैरण दररोज काय प्रमाणात द्यावी याबद्दल व सामान केव्हा द्यावयाचे याबद्दल नियम ठरविले असून त्या नियमाप्रमाणे चदीवैरण व सामान हल्लीं दिले जाते या खात्याकडे शिबदीप्रमाणे वाडा रक्षणाचे काम असून शहर रक्षणाचेहि काम असते शिवाय अडचणीचे प्रसगीं टपालाचे कामहि त्याचेकडून करवून घेतले जाते कारणप्रसगीं पोलिसाचे मदतीस तालुक्याचे ठिकाणीं त्यास जावे लागते यावरून या खात्याचा उपयोग रयतेच्या सरक्षणासाठीं बराच होतो असा अनुभव येत आहे ड्रिल शिकवून शिस्त लावण्यासाठीं, पोलीस, शिबदी व पागा या तीनहि खात्याची शिक्षणाची

चित्रांक १९१



अववडें येथें नवीन बाधलेल्या श्रशिकराजी नारायणाचे समाधीशेजारी श्रीमत राजेसाहेब.

[ स. पा. ८७१

सोय जास्त माणसे नेमून केल्याने ह्या खात्यात चागली सुधारणा झाली असून तीं पूर्ण कार्यक्षम झालीं आहेत या खात्यातील लोकास उत्तेजन मिळावे म्हणून दरवर्षी चढाओढीचे मर्दुमकीच्या खेळाचे सामने करण्यात येतात आणि त्यात प्राविण्य दाखविणाऱ्या खेळाडूना पारितोषिके देऊन त्याचा गौरव करण्यात येतो पोलीसखात्याचे मुख्य अमलदार यानीं या खात्यावर देखरेख ठेविल्या-पासून त्याच्या कार्यक्षमतेत चागलीच भर पडली आहे

## रथखाना

रथखाना या नावावरूनच या खात्यात कोणकोणत्या गोष्टींचा समावेश होतो हे सहज लक्षात येते रथ आणि मोटारगाड्या, टागे, घोड्याच्या गाड्या, ( व्हिक्टोरिया ) याची व्यवस्था ठेवण्यात येते या कारखान्यातील वाहने बरींच नादुरुस्त होतीं तीं दुरुस्त करून सुस्थितींत ठेवलीं आहेत वाहना-करिता चागले उमदे घोडे खरेदी करण्यात आले आहेत रथखाना ही स्वतत्र इमारत असून मध्यभागीं असलेले पटागण बरेच विस्तीर्ण आहे ते बाजूच्या इमारतींपेक्षा खोल असल्यामुळे पावसाळ्याचे दिवसात त्यात पाणी साचून वाहने नेण्याआणण्यास फार गैरसोयीचे होई ही गोष्ट लक्षात घेऊन श्रीमत राजेसाहेबानी जरुर ती भर घालून पाणी साचणार नाही, त्याचा निकाल योग्य प्रकारे होईल, अशी तजवीज केली वाहने ठेवण्याची इमारत बरीच नादुरुस्त झाली होती, तीहि दुरुस्त केली व नवीन बरीच जागा वाढविली

## पिलखाना

पिलखाना म्हणजे हत्तीखाना या कारखान्यात पूर्वी दोन हत्ती होते ते वृद्ध होऊन कालवश झाल्यावर १५–२० वर्षें भोर येथें हत्ती नव्हते १९३८ साली एक नर व एक मादी असे दोन हत्ती आणण्यात आले आहेत श्रीनवमी उत्सवात श्रीरामाच्या मूर्ती सुवर्णकाराकडून पालखीतून आणण्यात येत त्या, हत्तीवरून अबारींतून आणण्याची पद्धत सन १९३९ पासून सुरू केली आहे वर्षप्रतिपदा आणि विजयादशमी या दोन दिवशीं श्रीमताच्या स्वाऱ्या लवाजम्यानिशीं भोर गावातून मिरवून येण्याची पद्धति आहे मध्यतरीं हत्ती नसल्यामुळे ह्या मिरवणुकींच्या वेळी सर्व स्वाऱ्या चार घोड्याचे रथात बसत आता हत्ती नवीन घेतले असल्याने हत्तीवर अबारींत बसून सर्व स्वाऱ्या वरील-

दिवशी मिरवणुकीस जाऊन येतात हत्तीवर घालण्याच्या अबाऱ्या व झुली वगैरे सामान नादुरुस्त झाले होते ते दुरुस्त करण्यात आले आहे व बरेचसे नवीन खरेदी करण्यात आले आहे

## थट्टी व खिल्लार

या कारखान्यात सरकारी गाई, बैल, म्हशी याची जोपासना केली जाते जनावराकरिता नवीन पद्धतीचे गोठे बाधण्यात आले असून स्वच्छता चागली राखली जाईल अशी तजवीज करण्यात आली आहे जनावराना दाणा-वैरण वेळच्यावेळीं देण्यात येऊन तीं निरोगी आणि सशक्त राहतील अशी काळजी घेण्यात येते हे कारखाने सुधारल्याने बैलाचा उपयोग बागेतील कामास व सामानाची नेआण करण्याच्या कामी गाड्यास होत असून, गाई-म्हशीचे पुरेसे व चागले दूध हल्ली नेहमीचे खर्चास वाड्यात येत असते या कारखान्यात १९३८ सालीं तोफाची गाडी मिरवणुकीचे वेळी ओढण्याकरिता नवीन चार बैल खरेदी करण्यात आले आहेत तोफाचे काम वर्षातून २–३ वेळाच पडत असल्यामुळे या बैलाचा उपयोग मोटा ओढण्याकडे व गाड्याना जुपण्याकडेहि करण्यात येतो

## उष्ट्रखाना

उटाचा उपयोग मिरवणुकीचे वेळी वाजविण्याची नौबत वाहण्यासाठी केला जातो सस्थानात बराच डोगराळ भाग आहे, म्हणून कित्येक अडचणीचे भागात सामान नेण्याचे कामीहि उटाचा उपयोग होतो या कारखान्यासाठी इमारत असून ती व्यवस्थित ठेविली आहे व सामान-सुमान चागल्या स्थितीत आहे

## गंजीखाना

यात सरकारी कुरणातील गवत साठविण्यात येऊन नतर दररोज कारखान्याकडे नेमणुकीप्रमाणे ते दिले जाते कुरणातील गवत कारखान्यातील सर्व जनावरास पुरेसे आहे कडबा मात्र विकत घ्यावा लागतो पूर्वी या कारखान्यात गवताच्या छपऱ्या तयार करून गजींवर घालीत यामुळे पावसा-पासून गवताचे रक्षण व्हावे तसे होत नव्हते व जनावरास चागले गवत मिळत नसे म्हणून श्रीमत बाबासाहेब यानीं गवताचे रक्षणाकरिता पत्र्याच्या कायमच्या

२ शेडस् ( निवाऱ्याची जागा ) केल्या आहेत यामुळे आता गवताचे चागल्या प्रकारे रक्षण होत असून जनावरास वैरणहि चागल्या प्रकारे मिळू लागली आहे

## फरासखाना व बिलवर

पूर्वींचे सामान अगदीं तात्पुरते असून तेहि जीर्ण झाले होते त्यामुळे फार अडचण भासत असे, हे मागे सागितलेले आहेच हीं गोष्ट श्रीमत बाबासाहेब याच्या लक्षात ते गादीवर आल्याबरोबर आली तेव्हा बराच खर्च करून त्यानीं बरेच नवीन सामान खरेदी केले व जुन्यापैकी दुरुस्त होण्यासारखे होते त्याची दुरुस्ती केली व नादुरुस्त सामान अजिबात काढून टाकले यामुळे आता वरील कारखान्याची चागली सुधारणा झाली आहे हे दोन कारखाने पूर्वीं स्वतत्र होते व त्यावर कामगारहि निरनिराळे होते कामाच्या सोईच्या दृष्टीने हीं खाती एकाच अधिकाऱ्याकडे हल्ली दिली आहेत या कारखान्यात चादीच्या खुर्च्या दरबारच्या वेळी उपयोग करण्याकरिता नवीन विकत घेतल्या आहेत त्यात एक ( रॉयल ) सिंहासनवजा खुर्ची घेतली आहे

## कापडी जामदारखाना

उची कपड्याची व्यवस्था ठेवण्याचे काम या कारखान्याकडे आहे

## जवाहीरखाना

या कारखान्यात मौल्यवान रत्नाचे जिन्नस, सोन्याची व चादीची भाडीं व नग याची व्यवस्था ठेवण्यात येते सचिव घराण्याचा इतिहास पाहिल्यास कै श्री नानासाहेब, हल्लीच्या श्रीमताचे आजे, याच्या कारकीर्दीपर्यत या कारखान्याकडे लक्ष पुरविण्यास व त्यात विशेप भर घालण्यास कोणाहि पुरुपास अवसर सापडला नाही त्यामुळे सस्थानचे मानाने जडजवाहीर असावयास पाहिजे तेवढे नाही कै श्रीमत नानासाहेब यानी जरूरीपुरते दागदागिने व भाडी खरेदी केली तथापि, कार्याचे वेळी अडचण पडत असे, म्हणून श्रीमत बाबासाहेब यानी अवश्य ते दागदागिने व भाडीं वगैरे तयार करवून कार्यामध्ये नेहमी जी अडचण भासत असे ती दूर केली सध्याचे कारकीर्दीत या कारखान्याकडे बराच खर्च करण्यात आला आहे

## मुदपाकखाना अगर कोठी

या कारखान्यात रोज जें सामान लागत असे ते ठेविले जात नसे गुजराचे दुकानातून आणण्याचा प्रघात होता. तो मोडून लागणारें सर्व सामान या कारखान्यात ठेविले जावे, अशी व्यवस्था करण्यात आली आहे व त्याकरिता जी पूर्वीची इमारत होती, ती दुरुस्त करून सुस्थितींत सामान ठेवता येईल, अशा प्रकारे सोयीची करण्यात आली सामान पाहणे वगैरे कामावर एका स्वतत्र इसमाची नेमणूक करण्यात आली आहे त्यामुळे उत्तम सामान वेळेवर मिळू शकते

## शिबिका महाल

यात मेणे, पालख्या वगैरेंचा समावेश होतो मेणे व पालखी वाहणारे लोकास भोई म्हणतात या भोई लोकास मेणे व पालख्या नेण्याचे काम व शिवाय वाड्यातील किरकोळ कामे करावीं लागतात. श्रीमत बाबासाहेब गादीवर आल्यावर या कारखान्याकडील भोई लोकाची सख्या पुरेशी नसल्यामुळे ती वाढविण्यात आली कै श्री सौ. जिजीसाहेब या बद्रिकेदारचे यात्रेस गेल्या-वेळीं त्यानी आणलेले व श्रीनारायणमहाराज यानीं दिलेले अशी दोन झपाने या कारखान्यात असून त्यातील एक अबवडे येथें ठेवण्यात आले आहे.

## शस्त्रागार व म्यूझिअम

याचे वर्णन मागे अजब वस्तुसग्रहालयाच्या वर्णनाचे सदरात देण्यात आले आहे. या कारखान्यात शिबदीकडील बदुका वगैरे व दारुगोळ्याचे सामान नवीन जागा बाधून त्यात स्वतत्रपणें व्यवस्थित ठेवण्यात आले आहे.

## पॅलेस लायब्ररी

पॅलेस लायब्ररी अगर पुस्तकाल्याचे वर्णन 'लोकोपयोगी कामे' या सदरात देण्यात आले आहे.

## नगारखाना अगर नौबतखाना

सस्थान मूळ स्थापन झाले त्या वेळीं सस्थापकास राजपदाचीं वस्त्रे देण्यात आलीं, त्याबरोबर त्याना चौघडा देण्यात आला त्या पुरुषानींच हा चौघडा राजवाड्यात न ठेवता वाड्यानजीकच असलेल्या श्रीमोरेश्वराचे देवळात ठेवणे

चित्रांक १९२

अंबवडे येथे पंचगंगा कुंडाशेजारीं



१ श्री. युवराज, २ श्रीमत राजेसाहेब, ३ श्री राज शामराज [स पा ८७२

चित्रांक १९३



योग्य वाटल्यावरून तेथें ठेवण्यात आला आहे व प्रत्येक प्रहराप्रहराला तेथे चौघडा वाजविला जातो

## कलावंतखाना

या खात्यात संस्थानचे आश्रित गवयाचा समावेश होतो पूर्वी गवई एक असे व त्याच्याकडे श्रीरामापुढें सकाळीं एक तास गायन करावयाचे काम असे हल्लीं दोन गवई ठेवण्यात आले आहेत श्रीरामापुढे गायन सकाळीं व सायकाळीं एक एक तास करण्यात येते गवयाना गायनाचे वेळीं पेटी व तबला याची साथहि देण्यात येते

सर्व कारखान्यातील सामानाची दरसाल तपासणी करण्यात येऊन सर्व सामान-सुमान चागल्या स्थितीत राहील अशी खबरदारी घेण्यात येते

## प्रकरण २४ वें

# भोर येथील दोन महोत्सव

## श्रीशंकराजी नारायण यांची पुण्यतिथि भोर येथें समारंभ

भोर संस्थानचे आद्य संस्थापक ब्रह्मीभूत श्रीशंकराजी नारायण यांची समाधि भोरपासून आग्नेय दिशेस ९ मैलावर अबवडे या गावीं असून दरसाल कार्तिक शु॥ १२ रोजीं त्यांची पुण्यतिथि तेथे साजरी करण्यात येते त्या वेळी सकाळी लघुरुद्र, ब्राह्मण भोजन, रात्रौ कीर्तन व गोंधळ इत्यादि कार्यक्रम असतो अबवड्याचे स्थान सचिवाच्या कुलदैवताप्रमाणेच आहे त्याचे व्यवस्थेसाठीं ३ गावे तोडून देऊन ते एक स्वतंत्र संस्थानच बनविण्यात आलेले आहे वर उल्लेखिलेल्या तीन गावचे रु १८५० उत्पन्न या संस्थानचे खर्चास देण्यात आलेले आहे महागाईमुळे ही रक्कम पुरेनाशी झाल्याचे दिसून आल्यावर आणखी रु १०५० दरसाल श्रीमंत राजेसाहेब खाजगींतून देतात तेथें बारमाही अनुष्ठाने ठेवण्यात आलीं आहेत वरील तिथीस लहान प्रमाणावर तेथे उत्सव होतो, तरी अबवडे भोरापासून दूर असून लहान खेडे असल्याने मोठ्या प्रमाणावर तेथे उत्सव करणे गैरसोयीचे आहे शिवाय हा उत्सव भोरच्या संस्थापकाचा असल्यामुळे तो खुद्द राजधानीच्या ठिकाणी मोठ्या प्रमाणावर होणे व तोहि थोडा नव्या वळणावर साजरा करणे योग्य आहे, असे वाटल्यावरून श्रीमंत सरकार बाबासाहेब पंतसचिव यांनीं १९३० सालीं विलायतेस जाण्यापूर्वीच हा उत्सव, अबवडे येथे वरील पुण्यतिथीनिमित्त होणारीं धार्मिक कृत्ये झाल्यावर, सायंकाळी श्रीशंकराजी नारायण यांच्या पादुका भोरास आणून मोठ्या प्रमाणावर सुरू करण्याचे ठरविले होते त्याप्रमाणे १९३० च्या नोव्हेंबर ३ तारखेस कार्तिक शुद्ध १२ रोजी अबवडे येथे दुपारचा सालाबादप्रमाणे पुण्यतिथीचा समारंभ झाल्यावर सायंकाळी ब्रह्मीभूत श्रीशंकराजी नारायण यांच्या पादुका भोर येथे आणण्यात आल्या

पादुका शहराबाहेर धर्मशाळेजवळ येताच नऊ तोफांची सलामी होऊन तेथून पादुकांची मिरवणूक पालखींतून निघाली पालखीपुढे संस्थानचा सर्व

चित्राक १९४



श्रीरामनवमी-उत्सवात भोजनाकरिता तयार केलेल्या पक्वान्नाचे ( बुदीच्या लाडवाचे ) दृश्य

[ स. पा ८७५

लवाजमा, सर्व अधिकारी, नोकर, दरकदार, मानकरी असून नगरातील सर्व जातींचे, धद्याचे लोक मिरवणुकींत होते मिरवणूक फारच थाटाची असून सर्व लोकाचे अगीं दिसत असलेला उत्साह व आनद अपूर्व होता

मिरवणूक वाड्याजवळ आल्यावर पालखीतून पादुका काढून त्या श्रीरामाचे मडपात नेऊन तेथें श्रीरामाचे बोहल्यावर बसविण्यात आल्या या समारभाकरिता श्रीराम-मडप शृगारण्यात आला होता मर्व मडळी बसल्यावर भोरचे माजी न्यायमत्री कै रा सा अनत रामचद्र जोशी यानी प्रास्ताविक भाषण करून हा उत्सव दरमाल अबवडे येथें होत असता येथे पुन्हा करण्याचे प्रयोजन काय हे उत्तम रीतीने सागितले ते म्हणाले की, हा उत्सव नवीन होत आहे असे नाही चालू उत्सवास नवीन वळण देऊन व भर घालून, अशा उत्सवात आधुनिक कालास अनुसरून ज्या गोष्टी करणे आवश्यक आहे त्या अबवडे येथें करणे शक्य नसल्यामुळे, अबवडे येथे होत असलेल्या उत्सवाचाच काहीं भाग येथे करण्याचे श्रीमत राजेसाहेबानीं ठरविले इतकेच व त्याबद्दल आपण श्रीमत सरकारचे आभार मानावे तितके थोडेच आहेत हा उत्सव येथे दोन दिवस सुरू ठेवून त्याकरिता इतिहासभक्त वाङ्मयप्रेमी विद्वानाना येथे बोलावून दोन दिवस व्याख्याने, पोवाडे वगैरे कार्यक्रमात ठेवून आपल्या येथील प्रजाजनास ज्ञानामृतपानाची सधि मिळावी, हाच श्रीमताचा येथे उत्सव चालू करण्यात मुख्य हेतु आहे, व त्याप्रमाणे आमच्या विनतीस मान देऊन प्रो द वा पोतदार, प्रो. मायदेव, प्रसिद्ध शाहीर मुळे इत्यादि विद्वान् मडळी येथे आलेली आहेत वरील आशयाचे भाषण करून, त्या वेळीं मुबईस सस्थानिकाची सभा असल्यामुळे श्रीमत राजेसाहेब याना समारभास हजर राहता आले नाही, याबद्दल श्रीमताना दिलगिरी वाटत असून त्यानी पाठविलेला सदेश न्यायमत्री यानीं वाचून दाखविला, आणि प्रो पोतदार याना व्याख्यान देण्याबद्दल विनति केली

प्रो पोतदार यानी अस्खलित भाषण करून शिवकालीन माहिती सागितली, व सभाजीच्या वधानतर महाराष्ट्राची जी स्थिति झाली त्या स्थितीचे हृदयद्रावक वर्णन केले नतर रात्रीं १० वाजता कीर्तन झाले

कार्तिक शुद्ध १३, ता ४ रोजी सकाळी प्रो मायदेव याचे कविता-गायन झाले. दुपारी ५ वाजता पोवाडे-गायन झाले, व भोर येथील नागरिक

रा रा गुप्ते वकील याचे 'अशा उत्सवाचे महत्त्व' या विषयावर व्याख्यान झालें महाराष्ट्राच्या बिकट स्थितींत श्रीशकराजी यानीं कोणती महत्त्वाची कामगिरी बजावली व त्याबद्दल त्याचे आपण किती ऋणी असले पाहिजे हे त्यानी चागल्या प्रकारें सागितले

रात्रीं शाहीर मुळे याचे पोवाडे-गायन झालें त्यानीं तयार केलेला श्रीशकराजी नारायण याचा पोवाडा म्हणून दाखविला श्रीयुत साने याच्या नकला झाल्यावर रा सा जोशी यानीं भाषण करून समारोप केला त्यात सर्वांचे आभार मानले, व उत्तरोत्तर या उत्सवात जास्त सुधारणा होत जातील अशी आशा व्यक्त करून उत्सव समाप्त झाल्याचे जाहीर केले

कार्तिक शुद्ध १४, ता ५ रोजीं सकाळी श्रींच्या पादुकाची पूजा, आरती वगैरे झाल्यावर ८-३० वाजता अबवडे येथें रवानगी करण्यात आली

या सालापासून श्रीशकराजी नारायण पुण्यतिथीचा उत्सव सार्वजनिक झाल्यामुळे या दिवशीं शाळा-कचेऱ्याना सुट्टी देण्यात येते या उत्सवाला इष्ट वळण लावण्यात आले त्याचे सर्व श्रेय श्रीमत राजेसाहेबाना आहे एवढेंच नव्हे, तर त्याच्या कारकीर्दींत ही गोष्ट चिरस्मरणीय होऊन राहील यात शका नाहीं

यानतर दरसाल वरील पद्धतीप्रमाणे श्रीशकराजी नारायण याचा उत्सव साजरा करण्यात येत असतो

सन १९३१ सालीं ता २२ व २३ नोव्हेबर रोजीं भोर येथें श्री शकराजींचा उत्सव श्रीमत राजेसाहेब याचे अध्यक्षतेखालीं साजरा करण्यात आला. या समारभाकरिता पजाबमधील सेन्ट निहालसिंग व त्याच्या पत्नी, कलकत्ता येथील डॉ कालीदास नाग व त्याच्या पत्नी, पुण्याचे डॉ बेलवलकर, पीएच डी, प्रो पोतदार, श्रीयुत दत्तोपत आपटे, श्री दिनकरपत काळे वगैरे पाहुणे मडळी आली होती त्याचीं व्याख्याने, कीर्तन, पोवाडे व गायन वगैरे उत्सवाचे सर्व कार्यक्रम व्यवस्थितपणे पार पडले

सन १९३२ सालीं नोव्हेबर ता ९-१० रोजीं श्रीशकराजींचा उत्सव अबवडे व भोर येथें साजरा झाला. या वर्षाचे उत्सवास पुण्याचे प्रो. पोतदार, श्री कुलकर्णी, प्रो एम् आर पराजपे, एम् ए., श्री रा लक्ष्मण रामचद्र पागारकर, बी ए, आणि श्रीमती ताराबाई मोडक ही पाहुणे मडळी आली

चित्रांक १९५



श्रीरामनवमी-उत्सवातील राममडपातील खाशा पगतीचे दृश्य.

[ स. पा. ८७५

होती त्यानीं समयास उचित अशीं भाषणे केलीं श्रीमत राजेसाहेब याचे अध्यक्षतेखालीं हा समारभ पार पडला

सन १९३३ साली ता ३० व ३१ ऑक्टोबर रोजी भोर व अबवडे येथें श्रीशकराजी नारायणाचा पुण्यतिथिमहोत्सव झाला या सालीं प्रो पोतदार, प्रो श्री नी चाफेकर, सिद्धेश्वर येथील वे शा स वासुदेवशास्त्री कोनकर, नागपूरचे कवि जयकृष्ण केशव उपाध्ये, इत्यादि विद्वान् मडळी आली होती त्याचीं ऐतिहासिक विषयावर विद्वत्ताप्रचुर भाषणे झालीं या वर्षाच्या समारभाचे वेळीं श्रीमत राजेसाहेब यानीं भाषण केले त्यात या सालापासून निरनिराळ्या विषयावर उत्कृष्ट ग्रथनिर्मिति होण्यास उत्तेजन देण्याकरिता त्या त्या वर्षांत ठराविक विषयावरील उत्तम ग्रथास रु ३०० दरसाल श्रीशकराजी नारायण पारितोषिक म्हणून देण्याचे ठरविल्याचे जाहीर केले याकरिता श्रीशकराजी नारायण पारितोषिक मडळ नेमण्यात आले हे पारितोषिकमडळ अमुक विषयावरील उत्कृष्ट ग्रथास पारितोषिक देण्यात येईल, असे उत्सवापूर्वी दोन महिने वर्तमानपत्रात जाहिरात देऊन त्या विषयावरील त्या वर्षांत प्रसिद्ध झालेलीं पुस्तके परीक्षणाकरिता मागविते मडळाकडे आलेलीं पुस्तके सभासदानीं वाचून पाहिल्यावर कोणत्या ग्रथास बक्षिस द्यावयाचे त्याबद्दल एकमताने आपला अभिप्राय पारितोषिकमडळ, श्रीमत राजेसाहेब याजकडे सादर करते त्यास श्रीमत राजेसाहेबाची समति मिळाल्यावर ग्रथाचे लेखकास कळविण्यात येऊन उत्सवास स्वत येण्याबद्दल निमत्रण देण्यात येते व उत्सवाचे मुख्य दिवशीं श्रीमत राजेसाहेबाचे हस्ते, ज्या ग्रथलेखकास पारितोषिक देण्याची मडळाने शिफारस केलेली असते, त्याना वरील रु ३०० चे बक्षिस विभागून देण्यात येते

अबवडे येथील श्रीशकराजी नारायण याची समाधि पडीक स्थितीत होती, ती १९३३ सालीं नवीन सगमरवरी पाढऱ्या दगडाची बाधून श्रीमत राजेसाहेबानीं तिचा जीर्णोद्धार केला नवीन सभामडपहि चागला विस्तीर्ण असा बाधला ह्या सर्वांस खर्च रुपये ३१००० झाला आहे या नव्या समाधींत श्रीशकराजी नारायण याच्या पादुकाप्रतिष्ठापनेचा समारभ ता ६ जून १९३४ रोजीं मोठया थाटाने झाला या समारभाकरिता श्रीमत राजेसाहेब सर्व खाशा

मडळीसह गेले होते श्रीमत राजे शामराज व श्री सौ जान्हवीबाई याहि समारभाकरिता आल्या होत्या

यानतर नोव्हेबर ता १८-१९ सन १९३४ रोजी सालाबादप्रमाणे अबवडे व भोर येथे पुण्यतिथिमहोत्सव झाला या समारभास प्रो पोतदार, श्री दत्तोपत आपटे, श्री रा आबा चादोरकर व श्री जोशी, वे शा स ढुडिराजशास्त्री बापट इत्यादि मडळी आली होती त्याची सुश्राव्य भाषणे झालीं मागील वर्षी प्रसिद्ध केल्याप्रमाणे प्रो दत्तोपत आपटे याच्या ‘ मुधोळ सस्थानच्या घोरपडे घराण्याचा इतिहास ’ या पुस्तकास रु १२५, श्री रा यादवराव काळे याच्या ‘ नागपूर प्राताचा इतिहास ’ या ग्रथास रु १०० व श्री आबा चादोरकर व श्री जोशी या लेखकद्वयानीं लिहिलेल्या ‘ शिवशाहीचा लेखनालकार ’ या पुस्तकास रु. ७५ याप्रमाणे श्रीशकराजी नारायण पारितोषिक तीन ग्रथास विभागून देण्यात आले श्री यादवराव काळे हे प्रकृति नादुरुस्त असल्यामुळे समारभास येऊ शकले नाहीत त्याचे बक्षिस त्याचेकडे पाठविण्यात आले

१९३५ च्या समारभास पुण्याचे प्रो पोतदार व श्री काशीकर हे आले होते श्रीमत राजेसाहेब दिल्लीस कामानिमित्त गेल्यामुळे समारभाचे मुख्य दिवशी ता ९ नोव्हेबर रोजी प्रो पोतदार व श्री काशीकर याची व्याख्याने झाल्यावर श्रीमत युवराज भाऊसाहेब याना भाषण करून प्रो अनत सदाशिव आळतेकर याच्या ‘ राष्ट्रकूट आणि त्याचा काल ’ या ग्रथास रु १५०, श्री काशीकर याच्या ‘ ऋग्वेदकालीन सस्कृतीचा इतिहास ’ या पुस्तकास रु ७५ व श्री रा लक्ष्मण रामचद्र पागारकर याच्या ‘मराठी वाङ्मयाचा इतिहास ’ या पुस्तकास रु ७५ याप्रमाणे पारितोषिके दिली

श्रीशकराजी नारायण याचा पुण्यतिथिमहोत्सव १९३६ साली सालाबादप्रमाणे ता २६-२७ नोव्हेबर रोजी झाला या वर्षी श्रीमत राजे शामराज रायरायन राजवत बहादुर हे उत्सवास आले होते श्रीमताचे हस्ते प्रो ना म पटवर्धन याच्या ‘आमच्या इदूचे शिक्षण’ या पुस्तकास रु १२५, डॉ पु ग सहस्रबुद्धे याच्या ‘ विज्ञानप्रणीत समाजरचना ’ या पुस्तकास रु १०० व श्री कानिटकर याच्या ‘ सखाराम बापूचे चरित्र ’ या

चित्राक १९६



श्रीरामनवमी-उत्सवातील रात्रीची नाच-कीर्तनाची कचेरी

[स पा. ८७५

चित्रांक १९७



जन्मकाळापूर्वी श्रीरामाची मूर्ति सोनाराच्या घरून हत्तीवरून वाड्याकडे मिरवणुकीने येत असताना
(सन १९३९)

[स पा. ८७६

पुस्तकास रु ७५ याप्रमाणे पारितोषिक विभागून देण्यात आले या समारभा-करिता पुणे येथील ' गीताधर्म मडळा 'चे विद्यावाचस्पति सदाशिवशास्त्री भिडे यास मुद्दाम बोलविण्यात आले होते त्याचे एक दिवस प्रवचन करण्यात आले त्याना रु ५० देऊन गौरव करण्यात आला

१९३७ साली श्रीशकराजी नारायण याचा वार्षिक उत्सव झाला त्यास श्रीमत सर बाळासाहेब पटवर्धन, राजासाहेब सस्थान मिरज, याच्या भेटीमुळे विशेष अपूर्वता आली होती श्रीमत राजेसाहेब याच्या विनतीवरून ता १५ रोजी श्रीमत सर बाळासाहेब याच्या हस्ते अबवडे येथील ' श्री जिजी-साहेब झुलता पूल ' याचा नामकरण व त्यावरील स्मारकाचा अनावरणसमारभ झाला भोर येथील सर्व समारभास ते अगत्यपूर्वक हजर होते ता १६ रोजी याच्या हस्ते पुढील ग्रथास श्रीशकराजी नारायण पारितोषिक देण्यात आले

श्रीयुत सिद्धेश्वरशास्त्री चित्राव याच्या 'भारतवर्षीय मध्ययुगीन चरित्रकोश' या ग्रथास रु १२५, श्रीयुत गो म जोशी, बी ए, याच्या ' हिदूचे अर्थशास्त्र ' या ग्रथास रु ७५, प्रो वि स गोगटे, एम् ए , याच्या 'सुखाचा शोध ' या ग्रथास रु ५० व वे शा स धुडिराजशास्त्री बापट याच्या ' नवा आचारधर्म ' या पुस्तकास रु ५० देण्यात आले

हा समारभ सपल्यावर श्रीमत सर बाळासाहेब त्याच दिवशी सायकाळी पुण्याकडे रवाना झाले श्री सर बाळासाहेब याच्या भेटीची हकीकत या खडाच्या प्रकरण १७ मध्ये व झुलता पूल उद्‌घाटनाची हकीकत प्रकरण ८ मध्ये सविस्तर देण्यात आलेली आहे श्रीमत राजेसाहेब यानीं अबवडे येथे श्रीशकराजी नारायण याच्या समाधीचे मागील बाजूस कै श्री सौ जिजीसाहेब याचा पुतळा किंमत रुपये ४५०० चा तयार करून नुकताच बसविला आहे

सन १९३८ मध्ये सालाबादप्रमाणे श्रीशकराजी नारायण याचा पुण्य-तिथिमहोत्सव ता ४ माहे नोव्हेबर रोजी अबवडे येथें आणि ४ व ५ तारखास भोर येथें साजरा करण्यात आला श्रीच्या पादुका भोर येथें आल्यावर व्याख्याने, प्रवचन, कीर्तन वगैरे कार्यक्रम झाले ता ५ रोजीं दुपारीं श्रीशकराजी नारायण-पारितोषिक देण्याचा समारभ श्रीमत राजेसाहेब याची प्रकृति चागली नसल्यामुळे श्रीमत भाऊसाहेब याच्या हस्ते झाला या वर्षी श्री रा केतकर

याच्या ' ज्योतिर्गणित ' या पुस्तकास रु १००, डॉ ग श्री खैर याच्या ' जपानची जीवनक्रांति ' या पुस्तकास रु ७५, श्री रा जावडेकर याच्या ' आधुनिक भारत ' या पुस्तकास रु ७५ आणि कु गार्गी भाटवडेकर यानीं लिहिलेल्या ' सर भालचद्र भाटवडेकर ' याच्या चरित्रास रु ५० याप्रमाणे बक्षिस विभागून देण्यात आले

## श्रीरामनवमी-उत्सव सुधारणा

श्रीरामचद्र हे सचिव घराण्याचे कुलदैवत असल्यामुळे श्रीरामनवमी-उत्सव फार पूर्वीपासून म्हणजे सुमारे २२५ वर्षांपासून चालत आलेला आहे श्रीराम हे सचिवाचे कुलदैवत कसे झाले याची अद्भुतरम्य हकीकत १ ल्या खडाच्या १ ल्या प्रकरणात सविस्तर आली असल्याने ती पुन्हा या ठिकाणीं देऊन जागा न अडविता, त्या उत्सवात श्री बाबासाहेब गादीवर आल्यापासून त्यानीं काय काय सुधारणा घडवून आणल्या आहेत एवढीच हकीकत विस्ताराने या ठिकाणीं देण्याचे योजिले आहे

श्रीरामजन्मोत्सव जरी फार पूर्वीपासून चालत आलेला आहे तरी त्यात व्यवस्थितपणा श्रीमत रावसाहेब याचे कारकीर्दीपर्यंत आलेला नव्हता उत्सव-सबधीं सर्व खर्च स्टेटचे उत्पन्नातूनच होत असे कै श्री रावसाहेबानीं पौन-मावळ तालुक्यातील चोवीस व राजगड तालुक्यातील चार अशीं अठ्ठावीस गावे श्रीरामाचे नावे इनाम सनदा देऊन सन १८७५ सालीं श्रीरामसस्था निराळी स्वतत्र स्थापन केली या गावचा इनामदार, हक्कदार, गावखर्च सर्व वजा जाता एकूण नक्त १८००० रुपये उत्पन्न येते, ते सर्व श्रीरामजन्मोत्सवाकडे व बारमाहीकडे खर्च करण्याचे ठरविले श्रीमत बाबासाहेब गादीवर आल्यावर वरील अठरा हजार रुपये अपुरे पडतात असे त्याना दिसून आल्यावर त्यानीं श्रीराम सस्थानची एकदर पाहणी करून सस्थानावर खर्चाचा अधिक बोजा पडू नये व उत्सवाच्या लौकिकास यत्किंचित् कमीपणा येऊ नये, म्हणून खाजगी देवस्थानकडून सन १९२५ पासून दरसाल रुपये २००० देऊन खर्चाची तोंडमिळवणी केली पुढें अशी अडचण सतत भासू नये म्हणून खाजगी दरसाल रुपये २००० देण्यापेक्षा श्रीराम सस्थानकडे एकदम खाजगीकडून रु १५००० रकमेच्या प्रॉमिसरी नोटा खरेदी करून

चित्रांक १९८



श्रीरामाची मूर्ति हत्तीवरून वाड्यानजीक पोहोचल्यावर ( सन १९३९ ).

[ स. पा ८७६

देऊन त्यायोगें उत्पन्नात कायमची वाढ केली आता श्रीराम सस्थानचे निव्वळ उत्पन्न रु २०,००० झाले आहे त्यातून श्रीरामाचे उत्सवाचा वार्षिक व बारमाही खर्च केला जातो

या मुख्य सुधारणेखेरीज श्रीमत बाबासाहेब गादीवर आल्यावर इष्ट अशा खालील सुधारणा हळूहळू आतापावेतों केल्या आहेत

पूर्वी ब्राह्मणेतर नोकरवर्गास नवमी-उत्सवात मुळींच जेवण मिळत नसे त्याना एक दिवस बुदीच्या लाडवाचे भोजन मिळावे अशी सन १९२३ साला-पासून व्यवस्था केली त्यात श्रीमताची समबुद्धि व दूरदर्शीपणा दिसून येतात

उत्सवात पागेत होणाऱ्या थोरल्या स्वयपाकाकडे थोडीबहुत अव्यवस्था असे ती दूर करून त्यावर स्वतत्र अधिकारी नेमून स्वयपाक उत्तम होईल अशी तजवीज केली. सामानाचे शेकडा प्रमाण जे पूर्वी ठरवून देण्यात आले होते ते कमी पडते असे दिसून आल्यामुळे त्यात योग्य प्रमाणात वाढ केली आता भोजनाची व्यवस्था चागली असते

श्रीनवमी-उत्सवाकरिता परगावचे विद्वान् वैदिक ब्राह्मण, गवई, गुणि-जन इत्यादि बरेच लोक येतात त्याना योग्यतेप्रमाणे सभावना देऊन त्याचा गौरव करण्यात येतो या पद्धतींत बराच ढिलेपणा पडत आल्यामुळे पात्रा-पात्राचा विचार न होता सभावना दिली जाई असे होऊ नये, ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणे ज्या त्या विद्वान् अगर गुणिजनास मोबदला मिळावा, या सद्धेतूने श्रीमत राजेसाहेब यानीं सर्वशास्त्रपारगत अशा विद्वानाची परीक्षासमिति नेमून त्या समितीकडे उत्सवास आलेल्या विद्वान् ब्राह्मणाची परीक्षा घेऊन परीक्षेंत मिळणाऱ्या गुणाप्रमाणे सभावना मिळावी अशी सुधारणा केली त्यामुळे खऱ्या गुणासच मान मिळेल अशी उत्कृष्ट व्यवस्था झाली असे म्हटल्यावाचून राहवत नाहीं.

श्रीरामनवमी उत्सवात श्रीरामजन्म-दिवस हा ब्राह्मणेतर वर्ग जत्रेसारखा मानून त्या दिवशीं भोर येथें कुस्तीचा फड भरवून कुस्त्या करवितात या कुस्त्याना सरकारातून पूर्वी कांहीं मदत नसे श्रीमत बाबासाहेब या कुस्त्यास

बक्षिसाकरिता दरसाल देणगी देतात व शक्य तो स्वत हि कुस्त्यास हजर राहून बक्षिसे देतात यामुळे त्या लोकाना चागले उत्तेजन मिळते

याशिवाय वैदिक, शास्त्री व प्रतिष्ठित गुणिजन, हरदास वगैरेच्या शिध्याचे बाबतीत व बारमाही खर्चाचे बाबतींत अशाच तऱ्हेच्या किरकोळ बऱ्याचशा सुधारणा करून रामसस्थानास बरेच व्यवस्थित स्वरूप देण्यात आले आहे हल्ली नवमीउत्सव व बारमाही कृत्ये उत्तम रीतीने, कोणतेहि प्रकारे वादल वगैरे न होता बिनबोभाट सुरळीत चालतात

सन १९३९ सालपर्यंत श्रीरामाच्या मूर्ती सोनाराकडून त्याच्या घरापासून राजवाड्यापर्यंत जन्मकाळाच्या दिवशी पालखीतून मिरवत आणीत त्या मूर्ती या सन १९३९ सालीं हत्तीवर अबारीत ठेवून मिरवणुकीने आणण्यात आल्या याप्रमाणेच पुढेहि पद्धत चालू ठेवण्याचा श्रीमताचा हेतु आहे

या सालच्या उत्सवापासून श्रीच्या दर्शनाकरिता येणाऱ्या खेडोपाडीच्या सर्व जातींच्या लोकाना श्रीरामाचा प्रसाद ( सुठवडा ) देण्याची व्यवस्था करण्यात आली आहे

उत्सवाचा कार्यक्रम साधारणपणे खालीं दिल्याप्रमाणे असतो

चैत्र शुद्ध पचमीच्या दिवशी श्रींच्या उत्सवाची मडपप्रतिष्ठापना होते शुद्ध ६ व ७ स श्रींच्या उत्सवाच्या निमत्रणाप्रीत्यर्थ अक्षतसमारभ होतो पूर्वी श्रीमताच्या स्वाऱ्या अक्षत देण्यास स्वत घरोघर जात हल्लीं कार्यव्यापृतत्वामुळे ते काम श्रीमताच्या आप्तस्वकीयाकडून होते

शुद्ध अष्टमीस सकाळीं श्रीमताच्या हातून पुण्याहवाचन होते व तेथून उत्सवातील धार्मिक व लौकिक कार्यक्रमास सुरुवात होते सकाळीं पूजा, पुराण व आरती, दुपारी ११ वाजता ब्राह्मणभोजन, रात्री पुराण व आरती झाल्यावर ९ वाजता कचेरी. कचेरीत प्रथम नाच व नतर कीर्तन व शेवटीं भाटाचे कवित्व असा कार्यक्रम होतो

शुद्ध नवमी हा उत्सवाचा मुख्य दिवस हत्ती, घोडे, स्वार, शिबदी इत्यादि सर्व लवाजम्यानिशी सुवर्णकाराकडून श्रीरामचद्राची सुवर्णाची मूर्ति मिरवणुकीने ११ वाजता आणण्यात येते या मिरवणुकीस राजघराण्यातील सर्व मडळी जातात

चित्रांक १९९



श्रीरामचंद्राच्या जन्मकाळाचे वेळच्या राममंडपातील कचेरीचे दृश्य

[ स पा. ८७७

मूर्ति वाड्यात आणल्यानतर तिची पूजाअर्चा होते ही मूर्ति दुसऱ्या दिवशी ब्राह्मणास दान देण्यात येते जन्माच्या वेळी करण्यात येणारे सर्व उपचार मूळ ज्या मूर्ति सचिवाना मिळाल्या त्याचेच करण्यात येतात जन्मकाळापूर्वी ब्राह्मणाकडून पूजाअर्चा, पवमान व रामनामाचा जप एक लक्ष करण्यात येतो श्रीराम-मडपात दरबार भरविण्यात येतो, त्या वेळीं कीर्तन सुरू असते बरोबर १२ वाजता जन्मकाळ होतो त्या वेळी ११ तोफाची सलामी, बदुकाची फैर, बॅड व ताशा-वाजत्री इत्यादीचे वादन होते जन्मकाळाचे वेळीं कीर्तन करणाऱ्या हरिदासास पोषाख देण्यात येतो जन्म झाल्यानतर कापडाची श्रीरामाची मूर्ति पाळण्यात घालून पाळणा हलविणे वगैरे सोपस्कार श्रीमताचे हस्तेच होतात नतर आरती होऊन प्रसाद वाटण्यात येतो व पानसुपारी झाल्यावर दरबार समाप्त होतो त्यानतर ब्राह्मणभोजन व रात्रीं कचेरी असा अष्टमीसारखाच कार्यक्रम चालू असतो व तोच क्रम पुढें शुद्ध १२ पर्यंत चालू असतो एकादशीचे दिवशी सकाळी १०—३० वाजता कीर्तन होते दुपारीं शास्त्री, वैदिक वगैरे ब्राह्मणमडळीची शिष्ट-सभावना होते द्वादशीस पुराणिकाची सभावना व सायकाळी सर्व ब्राह्मणमडळीस देकार देण्यात येतो रात्रौ उत्सवास आलेल्या नर्तकाची व हरिदासाची हजेरी होते रात्र उलटल्यानतर त्रयोदशीच्या पहाटे पाच वाजता ललिताची कचेरी भरते श्रीमताच्या स्वाऱ्या आल्यावर ललिताची कथा होते व नतर एका वस्त्रावर उठविलेल्या पादुकाचे पूजन होऊन आरती होते ललित्या हरिदासास शेला, पागोटे देण्यात येते प्रसाद वाटल्यानतर सरतेशेवटी शिष्ट, सभावित, शास्त्री, पडित, हरिदास, गवई, आप्तस्वकीय मडळी, कामगार, नोकरवर्ग इत्यादि सर्व मडळीना श्रीमताच्या हातून उत्सवाच्या प्रसादादाखल श्रीफल देण्यात येते स्त्रियानाहि प्रसाद देण्यात येतो त्रयोदशीच्या दिवशी दुपारी हरिदास, गवई, कलावत वगैरे लोकाना बिदाग्या मिळून त्याना निरोप देण्यात येतो याप्रमाणे श्रीरामनवमीच्या उत्सवाचा कार्यक्रम नियमितपणे व व्यवस्थित रीतीने सालोसाल पार पडतो

या उत्सवाबद्दल टाइम्स ऑफ इंडियाचे ता. १९-४-१९३६ चे अंकात खालीलप्रमाणे वर्णन केलेलें आहे

" To see a religious festival properly performed, it is necessary to visit the Indian State, as was demonstrated by the celebrations of the Ramnavami ceremonies at Bhor this week. Ram is the Tutelary Deity of the Pant Sachiv of Bhor and accordingly the festival is the most important held there The date rather differs from that of Poona and Bombay but in point of solemnity, splendour and ferver, the Bhor celebrations would be hard to beat "

---

चित्रांक २००



पष्ट्यब्दपूर्तिसमारभाचे वेळचा श्रीमत राजेसाहेबाचा स्टेट चेअरवरील फोटो (सन १९३८)

[स पा ८७९

## प्रकरण २५ वें

# श्रीमंत राजेसाहेबांचा षष्ट्यब्दिपूर्तिसमारंभ

### ( हीरकोत्सव अथवा Diamond Jubilee )

शतजीव शरदो वर्धमान ।

—ऋग्वेद

मानवाची आयुर्मर्यादा फार प्राचीन कालापासून १०० वर्षांची धरली गेली आहे ऋग्वेदकालीन ऋषीहि १०० वर्षे आयुष्य लाभो अशी प्रार्थना करीत. परतु, ही मर्यादा गाठण्याचे भाग्य लाभणारा मनुष्य विरळाच हल्लीं ज्याने साठी उलटली तो भाग्यवान समजला जातो

श्रीमत राजेसाहेबाची प्रकृति लहानपणापासून अशक्त ते गादीवर आले त्या वेळीं त्याचे वय ४४ वर्षांचे असून त्याची प्रकृति बरीच खालावलेली होती राज्यारोहणसमयीं त्यानीं मानपत्राना उत्तर देताना जे भाषण केले त्यात आपणास फार वर्षे राज्यकारभाराचा योग लाभणार नाही अशा प्रकारचा निरुत्साह उत्पन्न करणारा ध्वनि उमटला होता परतु

युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।
युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दु खहा ।।

या गीतेतील सदुपदेशाप्रमाणे ते वागत असल्यामुळे कौटुबिक, शारीरिक व मानसिक—कोणत्याहि प्रकारच्या आपत्तींना तोंड देण्याचें सामर्थ्य त्याना प्राप्त करून घेता आलें, व षष्ट्यब्दिपूर्तिसमारभ साजरा करण्याचें भाग्य त्याच्या प्रजाजनास लाभले.

सन १९३८ साल भोर सस्थानच्या इतिहासात सुवर्णाक्षरानीं लिहून ठेविण्यासारखें सस्मरणीय झाले. सस्थानचे अधिपति राजे श्रीमत बाबासाहेब याचे वयास इग्रजी कॅलेंडरप्रमाणे ता. २० सप्टेंबर १९३८ इ. रोजीं आणि हिंदु पचागाप्रमाणे भाद्रपद व।। ८ या दिवशीं साठ वर्षे पूर्ण होऊन त्यानीं एकसष्टावे वर्षांत पदार्पण केले या वर्षी भाद्रपद व।। ८ ता १९ सप्टेंबर रोजीं आल्याने इग्रजी तारीख व हिंदु तिथि शेजारीं शेजारी आल्या हा एक सुयोगच जुळून आला. मनुष्याची आयुर्मर्यादा अगदींच अल्प असल्याने दीर्घायुषी मनुष्य पुण्यवान्

म्हणून गणला जातो सर्वसाधारणपणे मनुष्य साठ वर्षे ही मर्यादा गाठण्यापूर्वीच आपली जीवितयात्रा सपवितो त्यामुळे साठ वर्षे अगर त्यापेक्षा जास्त आयुष्य सपादिलेला मनुष्य भाग्यवान् उमजला जाणे स्वाभाविक आहे साठावे वर्ष अनिष्ट समजलें जाऊन त्या वर्षी ग्रहाची शाति करण्याची प्रथा फार पुरातन कालापासून चालत आलेली आहे त्या पद्धतीस अनुसरून श्रीमताचे वयास साठ वर्षे पूर्ण होण्याचे समयीं शात करण्याचे सर्व वैदिक शास्त्रीपडिताचे मताने ठरविण्यात आले या सुमारास श्रीमताचे गृहमानहि थोडें प्रतिकूल असल्याचे ज्योतिष्यानीं वर्तविल्यामुळे व ज्योतिषावर श्रीमताचा विश्वास असल्यामुळे वरील षष्टयब्दिपूर्तिसमयी शाति करण्याच्या शास्त्रीपडिताच्या सूचनेस श्रीमतानी आपली अनुमति दिली इतकेच नव्हे तर तीस जरूर तो दानधर्म करण्यासहि त्यानी आपली मजुरी दिली

या षष्टयब्दिपूर्तीची वदता कर्णोपकर्णी प्रसृत होऊन सस्थानच्या सर्व प्रजाजनानीं श्रीमताना दीर्घायुष्य प्राप्त झाल्याबद्दल आपला आनद व श्रीमताचेबद्दल वसत असलेली राजनिष्ठा व आदर व्यक्त करण्याच्या हेतूने वरील तारखेस श्रीमताना मानपत्र समर्पण करून त्याचा सत्कार करण्याचे ठरविले त्याकरिता प्रजाजनापैकीं कार्यकर्ते, प्रमुख पुढारी यानी श्रीमताची समक्ष गाठ घेऊन भेटीत सर्व प्रजाजनाचा हेतु श्रीमतास कळवून त्याप्रमाणे सत्काराचा स्वीकार करण्यास समति मिळावी अशी विनति केली सर्व प्रजाजनाचा आपल्याविषयींचा आदर व प्रेम आणि सत्कार करण्याविषयीची त्याची उत्सुकता लक्षात घेऊन त्याना सत्कार करण्यास समति देणे भाग पडले

याच सुमारास दक्षिण महाराष्ट्रातील लगतच्या सस्थानातील प्रजाजनात जागृति होऊन त्यानी आपापल्या सस्थानाधिपतींकडे राज्यकारभारात लोकाना हक्क देऊन लोकशाहीच्या तत्त्वावर राज्यपद्धति सुरू करावी आणि जबाबदार राज्यपद्धति स्थापन करावी, अशा आशयाच्या मागण्या मागण्यास सुरुवात केली होती व ज्या सस्थानिकानी त्याच्या मागण्या धुडकावून लावल्या होत्या त्या त्या सस्थानातील प्रजेने सत्याग्रह, करबदी वगैरेसारख्या अनिष्ट व विघातक चळवळी करण्यास सुरुवात केली होती तसेच काहीं काही समजस सस्थानाधिपतींनीं प्रजेच्या मागण्या व आकाक्षा, तसेच ब्रिटिश हिदुस्थानातील नवीन राज्यपद्धति व कॉंग्रेससारख्या

चित्राक २०१



षष्ट्यब्दपूर्तिसमारंभाचे वेळीं मानपत्राच्या दरबारपूर्वी निघालेल्या श्रीमंत राजेसाहेबांच्या मिरवणुकीचे दृश्य (सन १९३८)

[स पा. ८८५

राजकीय संस्थेचे संस्थानाबाबतचे धोरण लक्षात घेऊन काही सुधारणा देण्याचे धोरण ठेवून त्या जाहीरहि केल्या होत्या भोर संस्थानातील प्रजा अजून स्वस्थ होती तथापि बाहेरच्या वातावरणाच्या संसर्गाने त्यांच्याहि आकांक्षा वाढणार व त्यांनी मागणी केल्यावर त्या पुऱ्या करणे हेहि क्रमप्राप्तच होईल, तेव्हा बदलत्या कालौघास अनुसरून, त्यांच्या मागण्या येण्यापूर्वीच, त्यांच्या आकांक्षा काय आहेत हे लक्षात घेऊन त्यांच्या विचाराने जर आपण आधीच त्यांना राज्यकारभारात काही हक्क दिले तर, त्याचा इष्ट असाच परिणाम घडून येऊन बाहेरच्या वातावरणाच्या अनिष्ट परिणामावर ‘ प्रतिबंधक उपाय ’ म्हणून तो चांगला उपयोगी पडेल असा दूरदर्शीपणाने विचार करून, श्रीमंत राजेसाहेबांनी वरील सत्कारसमारंभाच्या संधीचा फायदा घेऊन जाहीर घोषणा करून हक्कदान करण्याचे ठरविले भोर संस्थानात जरी बरेच पक्षोपपक्ष असले तरी संस्थान-प्रजापरिषद् पक्ष हाच जास्त प्रबळ असल्याने त्या पक्षाच्या प्रमुख पुढाऱ्यांना बोलावून ‘प्रजेस देण्याच्या हक्कासंबंधी वाटाघाट करण्यास तुम्हापैकी दोन पुढाऱ्यांना नेमून द्या, त्यांच्याशीं दरबारचे अधिकारी वाटाघाट करतील व दोघानाहि संमत होईल असे हक्कदान केले जाईल ’ असे त्यांना कळविण्यात आले भोर संस्थानात प्रजाजनात जागृति उत्पन्न करण्यासाठी भोर संस्थानात प्रजापरिषद ही संस्था स्थापन करण्याचे कामी संस्थानमधील चळवळीचे पुरस्कर्ते पुण्यातील प्रसिद्ध पुढारी कै श्री वामनराव पटवर्धन व श्री रा तात्यासाहेब केळकर हे प्रमुख होते सन १९२० साली त्यांनीच पुढाकार घेऊन संस्थानात ‘ अखिल भोर संस्थान प्रजापरिषद ’ ही संस्था स्थापिली होती व त्या संस्थेच्या कार्याकडे त्यांचे सदोदित लक्ष असे त्यामुळे प्रजासभेच्या पुढाऱ्यांनी प्रजाजनांना देण्यात येणाऱ्या हक्कदानाचे वाटा-घाटीचे कामी आपले प्रतिनिधी म्हणून त्यांना एकमताने निवडले व त्यांना पसंत असलेली हक्काची योजना बहुतेक सर्व प्रजेला पसंत पडेल असे श्रीमंतांना कळविले श्रीमंतानाहि श्री वामनराव व श्री केळकर यांच्या कार्याबद्दल प्रेम व आदर असल्यामुळे त्यांनीहि त्यांच्याशी वाटाघाट करण्यास संमति दिली व लवकरच दरबारचे अधिकारी व हे दोन लोकनायक यांच्या दरम्यान चर्चा होऊन उभयतांस पसंत अशी योजना तयार करण्यात येऊन ती

श्रीमताच्या मजुरीसाठीं त्याना सादर करण्यात आली श्रीमतानीं आपल्या तडजोडीच्या व उदार धोरणास अनुसरून भोर कायदेमडळाचे आतापर्यंतचे ठराव व सस्थानातील लोकपक्ष, देशमुख सघ वगैरे पक्षाच्या सुधारणासबधीच्या सूचना लक्षात घेऊन वरील योजनेस अनुमति देऊन त्याप्रमाणे सत्कारसमारभाच्या वेळीं जाहीर घोषणा करून हक्कदान करण्याचे निश्चित केले श्रीमताचा सत्कार करण्याचे व्यवस्थेसाठीं एक मध्यवर्ती सत्कारसमिति कै श्री वामनराव पटवर्धन याचे अध्यक्षतेखालीं नेमिली गेली ता १९ सप्टेबर रोजी षष्ट्यब्दिपूर्तीसबधीं सर्व धार्मिक विधि उरकून घ्यावा व ता २० रोजीं सर्व प्रजाजनाचीं मानपत्रे अर्पण करण्याचा जाहीर समारभ व्हावा असे ठरविण्यात आले कामाच्या व्यवस्थेसाठी निरनिराळया पोटकमिट्या नेमण्यात येऊन कामाची विभागणी करून देण्यात आली अशा रीतीने समारभाच्या सिद्धतेत सर्व मडळी गढून गेली याच वेळीं श्रीमत राजेसाहेब काहीं हक्कदान करणार या गोष्टीने लोकाच्या उत्साहात भरच पडली होती समारभापूर्वी ता ७-९-१९३८ रोजीं श्रीमत राजेसाहेबानीं पुणे येथे जगद्गुरु श्रीशकराचार्य मठ सकेश्वर याचे वास्तव्य असल्यामुळे त्याच्या निवासस्थानीं जाऊन त्याचे दर्शन घेतले त्यानी समारभ निर्विघ्नपणे पार पडो असा शुभाशीर्वाद दिला

पण ‘मनसा चिंतित एक दैवमन्यत्र चिंतयेत् ।’ याचा पूर्ण अनुभव आला ज्योतिषानीं वर्तविलेले अनिष्ट ग्रहाचे भ्रमण, समारम व्यवस्थितपणे कसा पार पडेल याविषयींची काळजी, फेब्रुवारी महिन्यातील शस्त्रक्रियेनतरच्या सुदीर्घ दुखण्यातून सुधारलेले मध्यम प्रकृतिमान या सर्वांचा एकसमयावच्छेदेकरून परिणाम होऊन ता. १७ फेब्रुवारी रोजी रात्रीपासून आपल्या तब्बेतीत काहीं बिघाड होणार असे श्रीमताना वाटले त्या रात्रीं त्याना झोंप आली नाहीं. ता. १८ रोजीं सकाळीं ते शयनगृहातून रोजच्या वेळीं उठून बाहेर येईनात, म्हणून त्याचे सेवकजन पाहू लागले तों ते अर्धवट बेशुद्धावस्थेंत असल्याचे दिसून आले लागलीच दरबार सर्जन डॉक्टर जोशी याच्या सल्ल्याने उपाययोजनेस सुरुवात झाली. पुण्याहून प्रसिद्ध डॉ भडकमकर यानाहि भोर येथे आणण्यात आले या अवधींत सर्व गावभर श्रीमताची प्रकृति नादुरुस्त असल्याची बातमी प्रसृत झाली होती त्या बातमीने सर्वांच्या तोंडचे

पाणी पळालें. दुसरे दिवशीं सकाळपासून समारभाचे कार्यक्रमास सुरुवात व्हावयाची होती. समारभाकरिता बोलाविलेल्या पाहुणेमडळीपैकीं काहीं मडळीहि आली होती, काहीं अर्ध्या वाटेवर होती, व समारभाची सर्व सिद्धता अगदीं परिपूर्ण झालेली. अशा स्थितींत ज्याच्यासाठीं समारभ करावयाचा तो मुख्य नायकच आजारी झाल्याचे ऐकल्यावर सर्व लोक हवालदिल झाल्यास नवल काय ? डॉ भडकमकर आले त्यानीं श्रीमताची तब्बेत तपासली व रक्तदाबाचा विकार ( High bloodpressure ) एकदम वाढल्यामुळे तब्बेत बिघडली, असे निदान करून श्रीमतास निदान २ महिने पूर्ण विश्रातीची आवश्यकता आहे, समारभ तहकूब करावा व त्याचे प्रकृतीस जपावे, असे सागितले ताबडतोब ठिक-ठिकाणीं तारा करून वर्तमानपत्रात छापून व जाहीर पत्रके काढून समारभ तहकूब करण्यात आला असल्याचे प्रसिद्ध करण्यात आले लोकाच्या उत्साहा-वर विरजण पडले श्रीमताच्या प्रकृतीस लवकर आराम पडावा म्हणून सर्वजण परमेश्वराची प्रार्थना करू लागले डॉक्टराच्या उपायास व लोकाच्या प्रार्थनेस परमेश्वर पावून सायकाळपर्यंत श्रीमत शुद्धीवर आले आणि हळूहळू त्याची तब्बेत सुधारेल अशी आशा वाटू लागली हे लोकाना कळल्यावर त्याना थोडे समाधान वाटू लागले समारभाची सर्व सिद्धता वाया गेली याबद्दल कोणासहि वाईट वाटले नाहीं श्रीमताची तब्बेत लवकर सुधारावी एवढीच एकमेव सर्वांची अत करणातील इच्छा होती दुसरे दिवशीं श्रीमत राजेसाहेब पूर्ण शुद्धीवर आल्यावर त्याना जेव्हा समारभ तहकूब झाल्याचे कळले तेव्हा त्याना फार वाईट वाटले व आपल्या तब्बेतीच्या बिघाडामुळे लोकाची आज फार निराशा झाली याचे आपणास दु ख होत आहे असे त्यानीं अनेकवार बोलून दाखविले श्रीमताची तब्बेत एकाएकीं नादुरुस्त झाल्यामुळे समारभ तहकूब करण्यात आल्याची बातमी वाचल्यावर त्याच्या अनेक सस्थानिक वगैरे इष्टमित्राकडून व हितचिंतकाकडून तारावर तारा येऊन थडकल्या त्यात प्रत्येकाने 'श्रीमताची तब्बेत लवकर सुधारून ते पूर्ण बरे होवोत' अशी इच्छा प्रदर्शित केली होती

ता १६ पासून समारभास सुरुवात होणार असल्यामुळे व श्रीमत राजे-साहेबाच्या तब्बेतीत एकाएकीं बिघाड झाल्याची बातमी कळणे अशक्य असल्यामुळे, श्रीमत राजेसाहेब याची श्री राजे शामराज हैद्राबाद, श्रीमत सौ जान्हवीबाई,

श्री पळशीकर इदूर, श्री पुराणिक इदूर, श्री बुध्याळकर, वगैरे सर्व आप्तेष्ट मडळी ता १८ रोजीच या समारभाकरिता येऊन दाखल झाली होती तसेच श्रीमताच्या तब्बेतीतील बिघाडामुळे समारभ तहकूब करण्यात आल्याचीं जाहीर पत्रके जरी खेडोपाडी वाटण्याकरिता पाठविली होती, तरी पत्रके तेथे पोचण्यापूर्वीच समारभाकरिता येण्यास निघालेले सस्थानचे सुमारे १०००। १५०० शेतकरी प्रजाजन भोर येथे येऊन पोचले होते त्या सर्वांची त्या दिवशी राहण्याची-जेवण्याची व्यवस्था करण्यात आली ते सर्व लोक खिन्न मनाने दुसरे दिवशीं आपापल्या गावी परत गेले

सप्टेबरचा शेवटचा आठवडा, ऑक्टोबर सर्व आणि नोव्हेबर अर्धा असे सुमारे पावणेदोन महिनेपर्यंत योग्य औषधोपचारानतर श्रीमताची तब्बेत बरीच सुधारली असे पाहून, श्रीमताच्या तब्बेतीस शीण होत नसल्यास तहकूब झालेला सत्कारसमारभ पार पाडण्याची पुन्हा सधी द्यावी, अशी सर्व प्रजेने मोठ्या प्रेमाने श्रीमताना विनति केली श्रीमतानीहि जरी त्याची प्रकृति पूर्ण बरी झाली नव्हती तरी, प्रजेची आतुरता व उत्साह लक्षात घेऊन आपल्या तब्बेतीचे मान अजमावून आणि डॉक्टराच्या सल्ल्याने ता १६ डिसेबर १९३८ ही तारीख समारभाकरिता मुक्रर केली व तसे सर्वांना कळविले यामध्ये दोन गोष्टी साध्य होणार होत्या पहिली म्हणजे, ता २० सप्टेबर रोजी श्रीमताच्या आजारीपणामुळे समारभ तहकूब झाल्याने सर्वांना जो निरुत्साह व खिन्नपणा आला होता तो दूर होणार होता, आणि दुसरी गोष्ट म्हणजे, त्या समारभाच्या निमित्ताने श्रीमताना आपल्या प्रजाजनाना जे हक्कदान करावयाचे होते ते करण्यास सधि मिळणार होती

समारभाची तारीख जाहीर झाल्यावर पुन्हा पूर्ववत् सर्व तयारी करण्यास जारीने सुरुवात झाली सत्कारसमितीने श्रीमताच्या व भोर सस्थानच्या अनेक हितचिंतकाना व प्रतिष्ठित सद्गृहस्थाना समारभास येण्याबद्दलची निमत्रणे पाठविलीं जसजसा समारभाचा दिवस जवळ येऊ लागला तसतशी लोकाची धावपळ वाढत चालली व सर्व प्रकारची व्यवस्था चोख राहावी म्हणून शक्य ती तजवीज करण्यात सर्व कार्यकारी मडळी गढून गेली भोर येथील अधिकारी वर्ग सत्कारसमितीशी पूर्णपणे सहकार्य करून त्याना जरूर ती मदत करीत

चित्रांक २०२



षष्ठयब्दपूर्तीचे वेळी दरबार-मंडपात शिरण्यापूर्वी श्रीमंत राजेसाहेब राजा रघुनाथराव हायस्कूलशेजारी उभे असताना.

[स. पा ८८५

होता चोहोंकडे उत्साहाचे वातावरण पूर्णपणे भरून राहिले असल्याचे दृष्टोत्पत्तीस येत होते भोर येथील सरकारी सर्व इमारती, राजा रघुनाथराव हायस्कूल, कोर्ट-कचेऱ्या, देवालये वगैरे सर्व पाहुण्याना राहण्याकरिता साफसूफ करून तयार ठेवण्यात आल्या होत्या प्रत्येक ठिकाणी स्वतत्र व्यवस्थापक व त्याचे हाताखालीं पुरेसे हस्तक ठेवण्यात आले होते तात्पर्य काय की, कोठेहि उणेपणा येऊ नये, सर्व व्यवस्था चोख राहावी याकरिता शक्य ती दक्षता घेण्यात येत होती सर्व भोर शहर रगीबेरगी ध्वजापताकानी उत्तम रीतीने शृगारण्यात आले होते राजवाडा, रघुनाथराव कमान आणि सरकारी ऑफिसावर विजेची रोषणाई करण्यात आली होती ता १५ डिसेबरला दुपारपर्यत सर्व ठिकाणची समारभास जरूर ती सिद्धता पूर्ण झाली सायकाळपासून निमत्रित पाहुणेमडळी येण्यास सुरुवात झाली

## समारंभाचा कार्यक्रम

ता १६ रोजी सकाळी ६ वाजता श्रीरामचद्रप्रभूस ११ तोफाची सलामी देण्यात येऊन षष्ट्यब्दिपूर्तिसमारभाचे कार्यक्रमास सुरुवात झाली सकाळी सर्व ग्रामदेवतास समारभ निर्विघ्नपणे पार पडावा म्हणून अभिषेक करण्यात आला तसेच साठ वर्षें पूर्ण झाली त्यासबधी धार्मिक विधि यथासाग करण्यात आला याच वेळी श्रीमत राजेसाहेबाच्या आश्रितवर्गापैकी सर्व शास्त्रीपडितानी श्रीमताना वेदोक्त आशीर्वाद देऊन त्याचे अभीष्ट चिंतन केले ११ वाजता समारभाकरिता आलेल्या सर्व निमत्रित पाहुणेमडळींना व भोरचे प्रतिष्ठित नागरिकाना राजवाड्यात मेजवानी देण्यात आली

दुपारच्या दरबारसाठी भोर येथील राजा रघुनाथराव हायस्कूलच्या पाठीमागील क्रीडागणावर मडपाचे काम पुण्याचे प्रसिद्ध दाते कॉट्रॅक्टर यानी अभिनव असेच केले होते १००×५० फूट असा विस्तीर्ण मडप घालण्यात आला होता व त्यात ध्वनिक्षेपकाचीहि सोय करण्यात आली होती दरबारचे मडपात दोन वाजल्यापासून मडळी येण्यास सुरुवात झाली होती. सर्व मानकरी, अधिकारी, बाहेरची पाहुणेमडळी २–४५ पर्यंत मडपात येऊन दाखल झाली

समारभाची वेळ ३–३० वाजताची मुक्रर करण्यात आली होती त्या वेळेपूर्वी मडपात येण्यासाठी श्रीमताची स्वारी, श्री युवराज, राजकुमार

बापूसाहेब व रावसाहेब याचेसह हत्तीवर अबारींत बसून ३ वाजता राजवाड्या-पासून निघाली मिरवणुकीत प्रथम बिनीला घोडेस्वाराचे पथक, नतर बॅडचे शिस्तीचे पथक, पाठीमागे पायदळ, रिसाला, व नतर हत्ती व पाठीमागून सुमारे १५००–२००० मडळीचा जमाव अशा थाटाने ही मिरवणूक दरबारचे मडपानजीक बरोबर ३-३० वाजता येऊन पोहोंचली. हत्तीवरून श्री राजेसाहेब खालीं उतरल्याबरोबर त्याचे स्वागतममितीच्या सर्व सभासदानी स्वागत करून त्याना मडपात नेले याच वेळी ९ तोफाची सलामी देण्यात आली राजेसाहेब दरबार-मडपात शिरताच मडपात जमलेल्या सुमारे चार-पाच हजार मडळीनी त्याना उत्थापन दिले मडपाबाहेर आसपासच्या खेडयापाडयातून आलेल्या सुमारे तीन-चार हजार मडळीचा जमाव जमला होता राजेसाहेबाच्या बरोबर युवराज श्री भाऊसाहेब व राजकुमार बापूसाहेब आणि रावसाहेब हेहि दरबारी पोषाखात समारभास उपस्थित होते श्री सौ माईसाहेब व इतर राजस्त्रियाहि दरबाराकरिता आल्या होत्या त्याची व्यासपीठावर बसण्याची स्वतत्र व्यवस्था केली होती श्रीमत राजेसाहेब मडपातील व्यासपीठावर माडलेल्या रौप्यासनावर अधिष्ठित झाल्यावर मुलामुलींचे ईशस्तवनपर व स्वागताचे पद्यगायन झाले

त्यानतर श्रीमज्जगद्गुरु श्रीशकराचार्य मठ सकेश्वर-करवीर (गुरुस्वामी) यानी पाठविलेल्या आशीर्वादपर श्लोकाचे वाचन पुणे येथील वेदशास्त्रोत्तेजक सभेतर्फे समारभास उपस्थित झालेले प्रतिनिधी वे शा स. कवडेशास्त्री यानी केले व श्रीफल समर्पण करून श्रीमताना शुभाशीर्वाद दिला

वे शा. स कवडेशास्त्री यानीं पुढील श्लोक वाचून दाखविले

श्रीमत्परमहसेत्याद्यनेकबिरुदाकितश्रीसकेश्वर-करवीरपीठाधिष्ठित श्रीमज्ज-गद्गुरु श्रीशकराचार्य स्वामिमहाराजाना, भोरराज्याधीश्वर श्री रघुनाथराव पतसचिवाना पष्ठ्यब्दिपूर्तिमहोत्सवसमये शुभाशीर्वचनम्

यस्मिन् शासति धर्मतो वसुमती राजन्वतीत्व गता ।
सूते साधु सुभिक्षतादिसकलश्रेयासि ह्यष्टान्वहम् ॥
विद्याशकरचंद्रमौलिभगवच्छ्रीशारदानुग्रहात् ।
जीयाच्छ्रीरघुनाथभूपतिरसौ भोरावनीन्द्रं चिरम् ॥ १ ॥
सामन्तै सचिवै सुहृन्नृपतिभिः प्रेम्णा च तुष्टान्तरै ।
पौरैर्जानपदै प्रवर्तितमहा षष्ट्यब्दिपूर्त्युत्सवे ॥

भ्राजद्भोरमहान्नृपासनगतं श्रीचंद्रमौलीश्वरो ।
भूपाले परिपातु पतसचिवोत्तंसं ह्यपायात्सदा ॥ २ ॥
दीर्घायुष्यमरोगतां च सुयश. साम्राज्यवृद्धिं, प्रजा- ।
प्रेम, प्राज्यसुख, च संततिमथो वंशप्रतिष्ठावहाम् ॥
लब्ध्वा जीवतु भोरमंडलमहीशान सभा शाश्वती ।
श्रीमच्छंकरदेशिकेन्द्रभगवत्पादांबुजानुग्रहात् ॥ ३ ॥

नतर स्वागतसमितीचे चिटणीस रा लक्ष्मणदास माधवदास देवी, बी ए , एल्एल् बी , वकील, यानी समारभाकरिता आलेले शुभ सदेश वाचून दाखविले त्यात त्या वेळचे ॲक्टिंग व्हाइसरॉय लॉर्ड ब्रॅबोर्न, मुबईचे गव्हर्नर सर रॉजर लम्ले व लेडी लम्ले, बडोद्याचे महाराज, बिकानेरचे महाराज, कोल्हापूरचे महाराज, जमखिंडी, कुरुदवाड (सीनिअर व ज्यूनिअर), औंव, जत, इचलकरजी, फलटण या सस्थानाचे अधिपती, देवास सीनिअरचे महाराज, तजावरचे सीनिअर प्रिन्स, मुधोळच्या रीजट राणीसाहेब, सातारच्या श्री मा ताराराजे राणीसाहेब, अक्कलकोट, देवास (ज्यू ), डुगरपूर, सितामहू या सस्थानाचे अधिपती, हिंदुस्थान सरकारचे गृहमत्री मि आर एम् मॅक्स्वेल, हिंदुस्थान सरकारच्या सस्थानी खात्याचे सेक्रेटरी सर बर्ट्रॅण्ड ग्लान्सी, मुबई सरकारचे चीफ सेक्रेटरी सर गिल्बर्ट वाइल्स, पुणे लॉ कॉलेजचे प्रि ज र घारपुरे, फर्ग्युसन कॉलेजचे प्रि महाजनी, न्यायमूर्ति बॅ एम् आर जयकर, श्री जी एस् राजाध्यक्ष, प्रो द वा पोतदार, श्री जी व्ही बेवूर, पोस्टखात्याचे डायरेक्टर-जनरल, बडोदा, फलटण, हैद्राबाद, अक्कलकोट, जमखिंडी, सागली या सस्थानाचे दिवाण, सर गोविंदराव माडगावकर वगैरेचे अभिनदनपर शुभ सदेश आलेले होते, व डॉ र पु पराजपे, रा य रा दाते, सरदार मुतालीक, सर मोरोपत जोशी, ले -क विल्बरफोर्स-बेल, पु ग नानल, ताबेशास्त्री, हरीप्रसादशास्त्री, क गॉर्डन नील, मि एफ् एच् ब्राउन, रा. आपटे, सेक्रेटरी ताराचद हॉस्पिटल याचीं पत्रे आलीं त्यातील महत्त्वाचे सदेश-पत्रे परिशिष्ट १९ मध्ये दिलीं आहेत

सदेशवाचनानतर सत्कारसमितीचे अध्यक्ष कै श्री अनत विनायक ऊर्फ वामनराव पटवर्धन, सपादक सस्थानी स्वराज्य, याचे स्वागतपर भाषण, त्याची

प्रकृति चागली नसल्यामुळे त्याच्या वतीने, रा रा सदाशिव कृष्ण शिंदकर यानी वाचून दाखविले ते पुढीलप्रमाणे--

## श्री वामनराव पटवर्धन यांचे भाषण

" श्रीमताचा एकसष्टावा वाढदिवस साजरा करण्याचे श्रीमतानी ठरविल्यावेळीं, या समारभात त्याचे प्रजाजन व त्याचे स्नेही, परिचित याना भाग घेण्याची सधि मिळावी अशी मनीषा अनेकाकडून कळविण्यात आल्यावर, सदर समारभास जाहीर स्वरूप देऊन तो ता २०-९-१९३८ इ रोजी साजरा करण्याचे ठरविण्यात आले होते या समारमाची व्यवस्था दरबारशी सहकार्याने करण्याचे ठरून त्याकरिता स्थापन झालेल्या सत्कारमडळाची पुनर्घटना केल्यावेळी मला भोरच्या मडळींच्या प्रेमामुळे सत्कारमडळाच्या अध्यक्षाची जागा देऊन मला या समारभात भाग घेण्याची सधि देण्यात आली होती परतु श्रीमताची प्रकृति त्या वेळी एकाएकीं अकस्मात् बिघडल्यामुळे सर्व समारभ तहकूब ठेवावा लागला व त्यामुळे सर्वांची अत्यत निराशा झाली परतु श्रीरामचद्रप्रभूच्या कृपेने श्रीमताच्या प्रकृतीस आराम पडून आज तो तहकूब केलेला समारभ करण्याचा योग आला आहे ही आनदाची गोष्ट आहे, व आज मागल्या तारखेइतके विस्तृत स्वरूप समारभास जरी देण्यात आलेले नाही तरी, आज आलेल्या मडळींमधील तीच पूर्वींची उत्साहाची वृत्ति उल्हसित झालेली आहे व हा समारभ साजरा करण्यास मडळी आमच्या आमत्रणाबरहुकूम व दरबारच्या आमत्रणाबरहुकूम जी हजर झाली आहेत त्याचे मी सत्कारमडळातर्फे स्वागत करतो

या सत्कारात श्रीमताच्या वैयक्तिक व राजकीय अशा दोन पेशात त्याचेकडे आम्ही पाहत आहोत आजच्या या प्रसगी या समारभाच्या कार्यक्रमात अनेक मानपत्रे श्रीमताच्या सेवेसी सादर करण्यात येणार आहेत व अनेक सस्थाकडून व व्यक्तीकडून श्रीमताना हार अर्पण करण्यात येणार आहेत श्रीमताचे वैयक्तिक गुण सर्वांच्या परिचयाचे आहेत व त्यामुळे त्याच्या स्नेहाचे व परिचिताचे मडळ फार विस्तृत आहे श्रीमत हे सस्थानचे सत्ताधारी अधिपति असल्याने व त्याची मनोवृत्ति प्रागतिक स्वरूपाची असल्याने त्यानी सस्थानची अधिकारसूत्रे हाती घेतल्यापासून सस्थानच्या प्रजेच्या अडचणी दूर करण्याचे व

चित्रांक २०३



षष्ठ्यब्दपूर्तिसमारंभाचे वेळी भरविण्यात आलेला राजा रघुनाथराव हायस्कूलशेजारचे मंडपातील मानपत्राचा दरबार

[ सं पा ८८८

राज्यकारभारास प्रागतिक स्वरूप देण्याचे ठरविले आहे आजचा हा ६१ वा वाढदिवससमारभ अपूर्व असल्याने तशाच काहीं गोष्टी देशातील परिस्थितीस अनुरूप अशा ते स्वयस्फूर्तीने जाहीर करतीलच, परतु अशा समारभप्रसगी मागणी करणे हे प्रजेचे कर्तव्य असल्याने, तशा मागण्या कर्तव्य म्हणून निरनिराळ्या मानपत्रात साहजिकपणे केलेल्या आहेत तेव्हा आजच्या समारभातील हा महत्त्वाचा कार्यक्रम ऐकण्यास आपण उत्सुक असाल हे जाणून आपला जास्त वेळ न घेता मी, आपण आमत्रणास मान देऊन आलात, याबद्दल आपले साभार स्वागत करतो व आपली रजा घेतो "

सत्कारसमितीच्या अध्यक्षाचे भाषणानतर (१) भोर सस्थान कायदेमडळ, (२) भोर सस्थान देशमुख सघ, (३) भोर म्युनिसिपॅलिटी, (४) भोर सस्थान लोकपक्ष, (५) सुधागड तालुका प्रजाजन आणि (६) भोर सस्थान प्रजासभा या सहा सस्थाची मानपत्रे वाचून दाखवून श्रीमत राजेसाहेब याना रौप्य करडकात घालून अर्पण करण्यात आली

वरील सहा मानपत्राचे वाचन झाल्यानतर देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणसस्था सातारा, पूना सिटी बॉय स्काउट्स् ॲसोसिएशन, ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण शिक्षणोत्तेजक सस्था पुणे,आरोग्य मडळ पुणे,सस्कृत विद्यालय सातारा,श्री सौ गगूताईसाहेब पतसचिव वाचनालय भोर, श्रीरामक्रीडाभुवन भोर, गोदुग्ध प्रसारक मडळ, भोर, धनगर समाज होळकर बोर्डिंग भोर, विचित्रागड तालुका लोकलबोर्ड व नोटिफाइड एरिया कमिटी शिरवळ, राजगड तालुका लोकलबोर्ड व व्हिलेज कमिटी नसरापूर, प्रचडगड तालुका लोकलबोर्ड व व्हिलेज कमिटी वेले, पवनमाळ तालुका लोकलबोर्ड, सुधागड तालुका लोकलबोर्ड, पाली नोटिफाइड एरिया कमिटी, शेतकरी हितवर्धक सभा पाली, इत्यादि १५ सस्थानी आपापली मानपत्रे श्रीमताना अर्पण केली वरील २१ हि मानपत्रात श्रीमत राजेसाहेबानीं आजपर्यंत केलेल्या सस्थानच्या सुधारणाविषयक गोष्टीचा उल्लेख केलेला आहे ती सर्व मानपत्रे विस्तृतपणे येथें न देता त्या प्रत्येकातील महत्त्वाच्या भागाचा उतारा तेवढाच वाचकाच्या माहितीकरिता उद्धृत केला आहे

## षष्ट्यब्दिपूर्तिसमारंभाचे वेळीं देण्यांत आलेल्या मानपत्रांतील उतारे

ता १६–१२–१९३८

### १. भोर संस्थान कायदेमंडळ

" श्रीमत राजेसाहेब, ता २०–९--१९३८रोजी आपला षष्ट्यब्दिपूर्ति-समारभ होणार होता परतु आपल्या आकस्मिक आजारीपणामुळे त्या वेळीं तो समारभ तहकूब झाला त्या आजारातून श्रीरामचद्रप्रभुकृपेने आपण आता पूर्ण बरे झाला आहात, याबद्दल आम्हा सर्वांस अत्यानद होत आहे

खालसा मुलखात सन १८६१ सालीं प्रथम कायदेकौन्सिलाचा कायदा पसार होऊन इग्रज सरकार बिनसरकारी सभासद नेमीत असत, नतर १८९२ सालीं निवडणुकीचे तत्त्व अमलात आले, तरी अधिकारी वर्गाचे मताधिक्य होतेच पुढें अधिकारी वर्ग व बिनसरकारी सरकारनियुक्त सभासद याचे मिळून मताधिक्य होत असे तेथें कायदेमडळाच्या घटनेत क्रमाक्रमाने पाच वेळा फरक होऊन पाऊणशे वर्षांनतर आता प्रातिक स्वायत्तता देण्यात आली आहे दक्षिण महाराष्ट्रातील सस्थानात अद्याप बऱ्याच सस्थानात कायदेमडळेहि स्थापन झालेलीं नाहींत

श्रीमत सरकार, आपण मात्र गादीवर अधिष्ठित झाल्यापासून सहा वर्षांच्या अल्पावधींत म्हणजे सन १९२८ सालीं कायदेमडळाची प्रथम स्थापना केली त्या वेळेस सरकारी व बिनसरकारी सभासद समसमान नेमिलेत १९३२ व १९३६ सालीं म्हणजे दुसऱ्या व तिसऱ्या कायदेमडळात भोर म्युनिसि-पॅलिटींतून व आपण नेमिलेल्या तालुका लोकलबोर्डांतून एक एक सभासद निवडून घेण्याचा हक्क दिला, बिनसरकारी सभासदाचे प्रमाण वाढवून अधिकारी सभासदाचे प्रमाण कमी केले व उपाध्यक्ष निवडून देण्याचा हक्क दिला ही फार आनदाची गोष्ट आहे

श्रीमत महाराज सरकार, आपण या कौन्सिलचे उपयोगाकरिता उदार-पणाने आपल्या खाजगींतून २०,००० रुपयाची रक्कम कायम निधि म्हणून ठेविली आहे तिचे व्याजाचा उपयोग शेती, उद्योगधदे, जगल इत्यादींचे सवर्धनाकडे कौन्सिलचे विचारें करण्याचा आपण अधिकार दिला आहे याबद्दल कौन्सिल आपले अत करणपूर्वक आभार मानीत आहे "

## २. भोर संस्थान देशमुख-संघ

" श्रीमंत राजेसाहेब, आमच्या संघाचें ध्येय कोणत्याहि परिस्थितींत सरकारशीं राजनिष्ठ राहणें व आमचा वर्ग सुशिक्षित व सुसंघटित करणें हें आहे. या संघावर आपली प्रेमपूर्ण कृपादृष्टि असावी अशी संघाची नम्र विनंति आहे.

श्रीमंताच्या अगच्या उत्तम गुणामुळें सर्व लोक श्रीमंतावर प्रेम करितात. १६ वर्षांपूर्वी श्रीमंत सरकार गादीवर आल्यापासून श्रीमंतांनीं संस्थानची प्रगति पुष्कळ प्रकारें घडवून आणलेली आहे, हें प्रत्येक प्रजाजनास कबूल करावें लागेल. कार्यकारी मंडळ, कायदे कौन्सिल, म्युनिसिपॅलिटी, लोकलबोर्ड, दवाखाने वगैरे पुष्कळ गोष्टी श्रीमंतांनी घडवून आणलेल्या आहेत, याबद्दल आम्ही श्रीमंताचे आभारी आहोत. वरील गोष्टींवरूनच सार्वभौम सरकारकडून सन १९२७ सालीं श्रीमंतास वंशपरंपरेच्या ९ तोफांच्या सलामीचा मान मिळाला व पुढे ता. ३–६–१९३५ रोजीं 'राजा' हा किताब वंशपरंपरेनें देण्यांत आला, याबद्दल आम्ही देशमुख लोक आपले मनापासून अभिनंदन करीत आहोत."

## ३. भोर म्युनिसिपल कमिटी

"श्रीमंत राजेसाहेब, आपण सन १९२२ इ. सालीं राज्यावर येण्यापूर्वी भोरास म्युनिसिपॅलिटी नव्हती असें नाहीं, तथापि तिचें अस्तित्व स्वतंत्रतेच्या दृष्टीनें नाममात्र असेंच होतें. आपण राज्यसूत्रें हातीं घेतल्यावर लगेच ज्या अनेक प्रगतिपर गोष्टी घडवून आणण्याचा क्रमानें उपक्रम केला, त्यांत भोर म्युनिसिपॅलिटी चैतन्ययुक्त करणें ही बरीच महत्त्वाची गोष्ट केलीत असें आम्ही समजतो. संस्थानांत मुंबईचा डिस्ट्रिक्ट म्युनिसिपल ॲक्ट लागू करून म्युनिसिपॅलिटीची नवीन घटना आपण सन १९२२ इसवी मध्येंच केली. तींत सुरुवातीस सर्व सोळा सभासद सरकारनियुक्त असले तरी त्या संस्थेचा कारभार उत्तम चालत असल्याचें ७ वर्षें पाहून सन १९२९ इ. सालीं म्युनिसिपॅलिटीच्या १६ सभासदांपैकीं आठ सभासद निवडून देण्याचा हक्क भोर शहरवासीयांस देऊन आपण संस्थेच्या तावत्कालपावेतों झालेल्या कामाचें योग्य असें गुणग्रहण तर केलेंतच, पण त्याशिवाय आपल्या मूलतःच असलेल्या प्रगतिपर स्वभावाची खात्री पटवून दिलीत. ही गोष्ट संस्थेस उत्तेजनदायक अशीच झाली. त्यानंतरहि या नव्या मिळालेल्या मताच्या हक्काचा येथील

नागरिक व म्युनिसिपॅलिटी उत्कृष्ट रीत्या उपयोग करीत असल्याचे लक्षात घेऊन, सन १९३२ इसवी साली भोर कायदेमंडळाची पुनर्घटना आपण केली त्या वेळी, म्युनिसिपॅलिटीतर्फे लोकनियुक्त सभासदापैकी निवडलेला एक सभासद सदर कायदेमंडळात पाठविण्याचा विशेष हक्क आपण म्युनिसिपॅलिटीस दिलात, ही प्रगतिपर अशीच गोष्ट झाली

राजेसाहेब, लोकनियुक्त व सरकारनियुक्त सभासद संख्येने समान असले तरी म्युनिसिपॅलिटीत बिनसरकारी सभासद सरकारी सभासदापेक्षा जास्त असण्याकडे आपले लक्ष असे याची आम्हास पूर्ण जाणीव आहे

म्युनिसिपॅलिटीची नवी घटना केल्या वेळीच या स्थानिक स्वराज्य संस्थेस आपले विविध कर्तव्य योग्य रीतीने पार पाडता यावे म्हणून सुरुवातीची काही वर्षें दरसाल ५००० रुपये ग्रँट ऊर्फ आर्थिक मदत देऊन व अजूनहि वार्षिक ३२५० रुपये ग्रॅंट चालू ठेवून संस्थेची आर्थिक सुस्थिति राहणेचे बाबतींत आपली मोठी मदत झाली व होत आहे, हे आम्ही कृतज्ञतापूर्वक नमूद करीत आहोत इतकेच नव्हे, तर या शहरवासीयाच्या औषधयोजनेची व प्राथमिक शिक्षणाच्या तरतुदीची जबाबदारी म्युनिसिपॅलिटीवर न टाकण्यातहि आपले महदुपकारच झाले आहेत, हे आम्ही प्राजलपणे कबूल करीत आहोत तसेच साथीसारख्या आकस्मिक रीत्या उद्भवणाऱ्या मोठ्या खर्चाच्या वेळी आपण सढळ हाताने म्युनिसिपॅलिटीस आर्थिक साहाय्य केले आहे, याची विस्मृति होणे शक्य नाही

श्रीमंत सरकार, म्युनिसिपॅलिटीच्या संस्थापनेत व सद्य पावेतो तिच्या प्रगतिपर कामगिरींत आपल्या मदतीचा व सहानुभूतीचा किती मोठा भाग आहे, ते येथवर थोडक्यात निर्दिष्ट केले आहे आता, या शहराच्या सौंदर्य-संवर्धनाच्या व सुखसोयीसमृद्धतेच्या कामी आपले हातून आजपर्यंत काय काय झाले आहे त्याचा अल्पश उल्लेख करण्याची आम्ही परवानगी घेत आहोत या बाबतींत प्रथमत नमूद करण्यासारखी गोष्ट ही कीं, राज्यसूत्रें हाती घेऊन आपल्या कर्तृत्वास योग्य अवसर मिळण्याचे अगोदरपासूनच, म्हणजे आपण युवराज असल्या वेळेपासून, या प्रश्नाकडे आपले लक्ष होते व येथील क्रीडा-भुवन आणि वाचनालय या दोन संस्थाच्या संस्थापनेत प्रारंभापासून मन घालून

चित्राक २०४



नवीन ऑफिसाच्या इमारतीशेजारी भोरची शिबंदी

[स पा ११३

या शहराच्या जनतेच्या शारीरिक व मानसिक उन्नतीच्या सोयी करून आपण ते प्रत्यक्ष कृतींत उतरवले, या गोष्टींचे आज आम्हाला सतोषदायक स्मरण होत आहे तसेच शिरवळ येथें दवाखाना स्थापन होण्याचे कामीं आपण जी कळकळ व चिकाटी त्या वेळी दाखविली ती प्रशसनीय नाहीं असे कोण म्हणेल ? गादीवर आल्यानतर तेच धोरण चालू ठेवून आपण प्रथम वाचनालया-करिता उत्तम इमारत बाधली त्यानतर आपण निरा नदीवर पूल बाधण्याचे मोठ्या खर्चाचे कार्य करून भोर ते पुणे हा मार्ग रहदारीस बारमाही सुखाचा व सोयीचा असा केला व नदीपलीकडे हायस्कूलकरिता स्वतत्र अशी भव्य व सुदर इमारत बाधून शिक्षणखात्याची ती उणीव दूर केली या नव्या इमारती व पूल याच्या योगाने व राजवाड्यापुढील सध्या चालू असलेल्या भव्य कमानीच्या बाधकामाने या शहरवासीयाच्या सुखसोयीत भर पडली असून शहरच्या सौदर्यांत वाढच होणार आहे, इतकेच नव्हे, तर गावची वस्ती विरळ व आरोग्यास पोषक व्हावी म्हणून वतनी खात्याकडील ‘ कळवतिणीची बाग ’ या नावाची आपल्या मालकीची जागा म्युनिसिपॅलिटीकडे वसाहतीकरिता दिल्याने त्या बाजूस नवीन वस्ती वाढली आहे त्याचप्रमाणे भोर दवाखान्याच्या इमारतींत जरूर त्या दुरुस्त्या करून दवाखान्याचे हॉस्पिटलमध्ये आपण नुकतेच रूपातर केल्याने त्या दृष्टीने भासणारी उणीव काही अशी यापुढे कमी भासणार आहे हॉस्पिटलकरिता आपण कायम निधि रु २०,००० रकमेचा ठेविला आहे त्यात आपले खाजगीच्या रकमेतून रुपये १०,००० आपण केवळ परोपकारबुद्धीने घातले आहेत याबद्दल येथील जनता केव्हाहि आपली ऋणीच राहणार आहे हॉस्पिटल-प्रमाणेच हायस्कूलच्या इमारतीप्रीत्यर्थ झालेल्या खर्चातहि आपण खासगीची रुपये २०,००० रक्कम घालून व शिवाय आपल्या घराण्याच्या दानधर्माच्या निधीतून २०,००० रुपये स्कॉलरशिप्स देण्याकरिता वेगळे काढून ठेवून जे शिक्षणप्रेम व्यक्त केले ते कोणासहि कौतुकावहच वाटणार आहे राजवाड्या-पुढील चौकाच्या दोन्ही बाजूस असलेल्या प्रशस्त सोप्याची अवश्य ती दुरुस्ती करून तेथें ग्रथालय व म्यूझिअमची म्हणजे बहुमोल ग्रथाचा व जुन्या वस्तूचा सग्रह करण्याची आपण सोय केली, ही योजनाहि सर्वथैव उपयुक्त अशीच आहे ”

## ४ भोर संस्थान लोकपक्ष

"श्रीमत राजेसाहेब, आपले घराणे फार इतिहासप्रसिद्ध आहे आपल्या घराण्याकडे सचिवपद गेलीं साडेतीनशे वर्षे चालत आले आहे या दीर्घ काळात आपल्या घराण्याने उत्तम लौकिक सपादन केला आहे स्वधर्मनिष्ठा, प्रजापालन-तत्परता, सात्त्विक वृत्ति व शाततामप्रियता हे आपल्या घराण्यातील ठळक सद्गुण आपल्या अगीं पूर्णपणे वसत आहेत त्यामुळे आपण आम्हा सर्वांना प्रिय झाले आहात

ब्रिटिश हिंदुस्थानातील राजकीय प्रगति पाहून आपल्या प्रजाजनाच्याहि आकाक्षा वाढत चालल्या आहेत, हे जाणून आपण धूर्ततेने व दूरदृष्टीने वागत आला आहात हे नमूद करण्यास आम्हास आनद वाटत आहे.

श्रीमत राजेसाहेब, आता आपल्या वयाला ६० वर्षे पुरीं होऊन आपल्याला ६१ वे वर्ष लागले आहे. हा आपल्या प्रजाजनाना अतिशय आनदाचा मगल प्रसग वाटावा यात नवल नाहीं हिंदी लोकाच्या सर्वसामान्य वयोमानाकडे पाहता इतके आयुर्मान वाट्यास येण्याचे भाग्य फार थोड्या लोकाना लाभते. परमेश्वरकृपेने आयुर्मानाप्रमाणे पुत्रपौत्राचे सुखहि आपणास लाभले आहे युरोपात प्रवास केल्यामुळे तिकडील परिस्थितीचे ज्ञान होऊन आपल्या विचाराना व कल्पनाना स्वाभाविकच व्यापकपणा आला आहे अशा रीतीने सद्य काली आदर्श राजा होण्यास ज्या साधनाची व भाग्याची जोड असावयास पाहिजे ती आपल्या ठिकाणीं आहे हे नमूद करण्यास आम्हास सतोष वाटत आहे "

## ५. सुधागड तालुका प्रजाजन

" आपले सार्वभौम बादशहा इग्लडचे राजे याचे उदाहरण नजरेसमोर ठेवून लोकशाहीच्या तत्त्वाची पूर्ण वाढ करण्याचे धोरण असल्याचे श्रीमतानी वेळोवेळीं प्रतीत केले आहे, त्यास अनुसरून श्रीमताच्या एकसष्ठावे वाढदिवसाचे मगल समयीं, राजेसाहेब, आपण रयतेच्या मागण्या योग्य प्रमाणात पुऱ्या कराल, असा आम्हास भरवसा आहे "

## ६ अखिल भोर संस्थान प्रजासभा

"श्रीमत सरकारच्या हातीं सस्थानचीं अधिकारसूत्रें आल्यापासून सस्थानचा राज्यकारभार प्रागतिक स्वरूपाचा व प्रजाहितसवर्धक असा करावा

या हेतूने कायदे-मडळ, लोकलबोर्ड, म्युनिसिपॅलिट्या वगैरे स्थानिक स्वराज्यसस्था प्रस्थापित करून, तसेच राजा रघुनाथराव हायस्कूल व लक्ष्मीबाई ब्रिज वगैरे-सारखीं नाना प्रकारचीं लोकोपयोगी कामे करून जी सक्त मेहनत श्रीमतानी घेतली तिची आम्हा प्रजाजनास पूर्ण जाणीव आहे सस्थानच्या राज्यकारभाराचे जनानुरजनाचे धोरण काहीं काल मध्यतरी जरी श्रीमताना बदलावे लागले होते, तथापि परिस्थितींत बदल पडताच श्रीमत सरकारनी आपले राज्यकारभाराचे प्रागतिक धोरण पूर्वपद्धतीवर आणण्याचा उपक्रम केला आहे, ही अत्यत समाधानाची गोष्ट आहे या मध्यतरीच्या कालातहि आपल्या राज्यकारभाराचे ध्येय सस्थानात जबाबदार राज्यपद्धति करण्याचे आहे असें जाहीर करूनहि आपल्या मनाचा मोठेपणा व्यक्त करीत आहे श्रीमत सरकारनी सस्थानच्या राज्यकारभाराचीं सूत्रे हातीं घेतल्यापासून सस्थानातील प्रजाजनाना त्याचे नैसर्गिक हक्क वापरण्याची जी पूर्ण मुभा दिली होती तींत मध्यतरींच्या बदललेल्या काळातहि खड पडलेला नव्हता, यावरून श्रीमताच्या राज्यकारभाराचे धोरण आधुनिक कालीं कसे शोभेसे आहे त्याची आम्हास पूर्ण जाणीव आहे ''

## ७ सातारा जिल्हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणसंस्था

''पाश्चात्य देशातील आपला विस्तृत प्रवास आणि तेथील परिस्थितीचे आपण केलेले सूक्ष्म अवलोकन याचा सस्थान सुधारणेच्या कामी आपणास फार उपयोग झाला आहे श्रीमत शकराजी नारायण याच्या समाधीचा जीर्णोद्धार आणि तदनुषगाने करण्यात आलेला शारदीय ज्ञानसत्राचा उपक्रम, तसेच ग्रथप्रकाशनाकरिता स्थापन करण्यात आलेले पारितोषिक ह्यानीं आपली विद्याभिरुचि व्यक्त होत असून तिने आपण सर्व सरस्वतीभक्तास आपलेसे करून घेतलें आहे आपले कार्यक्षेत्र आपण फक्त आपल्या सस्थानापुरतेच मर्यादित केलेले नाही आपल्या मार्गदर्शित्वाचा व सक्रिय सहानुभूतीचा लाभ आपल्या सस्थानच्या बाहेरीलहि अनेक सस्थाना झालेला आहे

आमची सातारा जिल्हा देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणसस्था तर श्रीमतानीं दिलेल्या १००० रुपयाच्या उदार देणगीनेच कार्यक्षम झाली आहे एवढेंच नव्हे, तर सस्थेतर्फे विद्यार्थिवसतिगृहाची सुरुवात श्रीमताचे प्रोत्साहनाने

करण्यात आलेली आहे आणि या वसतिगृहाचे द्वारे समाजाचे सर्व प्रकारे उपयुक्त कार्य होईल अशी उमेद आहे ”

## ८ पुणे शहर बालवीर संस्था

“ सस्थेच्या जन्मापासून आज दीड तपाचे वर श्रीमत राजेसाहेबानीं या सस्थेकडे आपलेपणाच्या भावनेने पाहून अपत्य-निर्विशेष प्रेमाने तिचे सगोपन केले व वेळोवेळी आस्थेने सर्व प्रकारचे साहाय्य करून, तिला नावारूपास आणण्याम मदत केली या सर्व गोष्टींचा आजच्या शुभ प्रसगी जाहीर रीतीने व कृतज्ञतापूर्वक निर्देश करण्यास आम्हास अतिशय आनद व अभिमान वाटतो

श्रीमत राजेसाहेब, महाराष्ट्राच्या बालवीर चळवळीच्या इतिहासात आपले नाव आपल्या पुरस्कारामुळे, साहाय्यामुळे व सक्रिय सहानुभूतीमुळे निरतर राहील असा आम्हास भरवसा वाटतो आपण वेळोवेळी आमचे सस्थेस आश्रय देऊन आमचे नेतृत्व पत्करल्यामुळे, आम्हा अनुयायाना कार्य करण्यास स्फूर्ति मिळाली व आपल्याच आशीर्वादाने व सदिच्छेने आमच्या सस्थेस आजचे हे अभिनदनीय स्वरूप प्राप्त झालेले आहे व त्याचे सर्व श्रेय, श्रीमत राजेसाहेब, आपल्यालाच आहे

आपण मदिर बाधून दिल्याने, आमच्या चळवळीस नवीन चैतन्य आले मागील बारा वर्षांप्रमाणे भावी इतिहासातहि आपले ‘ रघुनाथराव (बाबासाहेब) पतसचिव मदिर ’ सर्व बालवीराना आदर्शभूत व आदरणीय राहील अशी आम्हास खात्री वाटते व त्याकरिता आम्ही सर्वजण आपल्या प्रयत्नाची पराकाष्ठा करू आपलेहि प्रेम असेच निरतर सस्थेवर राहू द्यावे

श्रीमत राजेसाहेब, आपला गोड व मनमिळाऊ स्वभाव, साधेपणा, सौजन्य, औदार्य, सार्वजनिक कामाची हौस, शिक्षणाची आवड व विशेषेकरून बालवीर चळवळीवरील आपली श्रद्धा, यामुळे आपण आम्हा सर्व लहानथोराना आदरणीय झाला आहात आमच्या सस्थेच्या दृष्टीने तर आपल्या गुणसमुच्चयामुळे आम्हास अडचणीच्या प्रसगातून अनेकवार निभावून जाता आले, ही गोष्ट आम्ही कधींहि विसरणे शक्य नाही

आपल्याप्रमाणेच श्रीमत युवराज भाऊसाहेब याचेहि या चळवळीवर प्रेम असून, विलायतेत ते सफरीस गेले असताना, वेळात वेळ काढून तेथील

चित्रांक २०५



षष्ट्यब्दपूर्तिसमारभाचे वेळी सेरिमोनिअल परेडकरिता परेड-ग्राउंडवरील मंडपात जमलेली श्रीमंत राजेसाहेब व इतर मंडळी [स. पा. ९१३

जगन्मान्य अशा गिलवेल पार्कच्या स्काउट शिक्षणाच्या कॅपमध्ये त्यानी स्काउटचा शिक्षणक्रम पुरा केला, हीहि गोष्ट त्याच्या या चळवळीवरील श्रद्धेचेच निदर्शक आहे ”

## ९ देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणशिक्षणोत्तेजक संस्था, पुणे

“ श्रीमत पतसचिव घराणे, आद्य सस्थापक शकराजी नारायण, नतर सस्थानचे गादीवर आलेले त्याचे थोर वशज व साप्रत गादीवर अधिष्ठित असलेले आपण या सर्वाबद्दल या सस्थेस फार अभिमान वाटत आहे महाराष्ट्रात स्वराज्य स्थापन करण्याचे कामी श्रीशिवछत्रपतींस आपल्या समाजातील अनेक थोर व पुण्यपुरुषानी व घराण्यानीं तनमनधन अर्पून मदत केली, या गोष्टींची साक्ष इतिहास देत आहे श्रीशिवछत्रपतीच्या अष्टप्रधानापैकी सात प्रधान आपल्या समाजातीलच होते, ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे आपल्या घराण्याने श्रीशिवछत्रपतींच्या स्वराज्य-सस्थापनेच्या कार्यांत श्रेष्ठ भाग घेऊन भरीव कामगिरी केली नतर छत्रपति श्रीराजाराममहाराज याचे वेळेस आपल्या घराण्याने स्वराज्याची जी सेवा केली, ती अतुलनीय होती महाराष्ट्राचे इतिहासात त्या कामगिरीला क्वचितच तोड आहे

आमच्या सस्थेवरची आत्मीयता श्रीमतानी उदार देणगी देऊन व्यक्त केलेली आहे. त्याचप्रमाणे या सस्थेच्या सातारा व सोलापूर येथील सहकारी समाज-सस्था यानाहि भेट देऊन देणग्या दिल्या. सन १९३५ साली सातारा येथें भरलेल्या दे ऋ ब्रा समाज परिषदेचे अध्यक्षस्थान स्वीकारून आपण सस्थेस मार्गदर्शक व आधारभूत होत आहात, या व दुसऱ्या अनेक गोष्टींनीं आपल्या समाजावरील आपले प्रेम गाजावाजा न करिता पटवून दिले, याबद्दल आम्ही आपले कृतज्ञ आहोंत कृतज्ञता व्यक्त करण्यास शब्द अपुरे पडतील ”

## १० आरोग्यमंडळ, पुणे

“ श्रीमताचा व आरोग्यमडळाचा बरेच वर्षाचा जिव्हाळ्याचा सबध असून श्रीमत या सस्थेचे एक आश्रयदाते आहेत व त्याचप्रमाणे या मडळाचे प्रमुख सल्लागार आहेत श्रीमताकडून वेळोवेळी हितकर मार्गदर्शकत्वहि मिळाले आहे, व त्यामुळे मडळाचा लौकिक वाढण्यास फार उपयोग झाला आहे, ही गोष्ट आजचे प्रसगी नमूद करण्यास मडळास क्षम्य असा अभिमान वाटत आहे

आमचे मंडळात आजपर्यंत श्रीमंताचे प्रजाजन आणि या संस्थानचे कायदे-मंडळातील प्रतिनिधी हे आमच्या संस्थेचे जुने सभासद आहेत, व ते द्रव्यद्वारा व इतर रीतीनीं मंडळाचे महत्त्वाचे कार्यक्रमास प्रत्यक्ष भाग घेऊन मदत करीत आले आहेत हीहि आपल्या भोर संस्थानास अभिमान वाटण्या-सारखी भूषणास्पद असलेली गोष्ट नमूद करून ठेवण्यासारखी आहे ''

## ११ संस्कृत विद्यालय ( अध्यापक ), सातारा

''यत्तत्रभवन्तो भवत प्रातरनुस्मरणीयचरिता पितृपर्यायागत धर्मति प्रधान नृपसिंहासनमधिष्ठायात्मन ऐषमस्त्यपष्ठिसंवत्सरात्मक काल यावद्यथान्याय वेदशास्त्राद्युत्तेजनेन स्वधर्मं समनुष्ठाय वाङ्मयादिप्रकाशनसाहाय्येन च स्वसंस्कृति समुपचित्य विशिष्टवस्तुकरत्यागादिना स्वप्रजाश्च सुसरक्ष्य ' सर्वस्यास्य यथान्याय-भूपति सम्प्रवर्तक ' इति कामदकीय वचन सार्थयतो विद्योतते ।''

## १२ श्री सौ गंगूताईसाहेब पंतसचिव वाचनालय व श्रीराम-क्रीडाभुवन, भोर

'' राजेसाहेब, आपण युवराज असताना शरीरबल व मानसिक उन्नति याचा अन्योन्याश्रय ध्यानात आणून, येथील नागरिकांसाठीं क्रीडाभुवन व वाचनालय या दोन्ही संस्थाची प्राणप्रतिष्ठा मोठ्या तत्परतेने केलीत व त्यानतर आपण गादीनशीन झाल्यावरहि अपत्यप्रेमाने वाचनालयासाठीं इमारत बांधून दिली अशा रीतीने शारदादेवीस निवासस्थान करून देण्याचे अनुपम श्रेय आपण संपादिलेत असे म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं सध्या या दोन्ही संस्थाचे आपण अध्यक्ष असून आपल्याच उदार आश्रयावर त्याचा योगक्षेम चालला आहे त्या संस्थाचा व्यवहार आपण दिलेल्या नव्या घटनेनुरूप चालला असला, तथापि त्याच्या कल्याणाची व स्थैर्याची काळजी आपण नित्य वाहत आहात या गोष्टीने आम्हास आनद वाटत आहे ''

## १३ गोदुग्ध-प्रसारक मंडळ, भोर

''आपला देश कृषि-प्रधान असल्यामुळे गोधनाची महति प्राचीन विचार-वत आर्यांनीं ध्यानात आणून धनबलसपन्न करणाऱ्या गोमातेचे अशत उतराई होण्यासाठीं तिला देवतातुल्य मानण्याची प्रथा पाडली, आणि ती आपल्या देशात अद्यापि सुरू आहे. आमच्याहि संस्थेने अमृततुल्य गोरसाची श्रेष्ठता

चित्रांक २०६



षष्ट्यब्दपूर्तिसमारभाचे वेळीं राजवाड्यापुढील श्रीमारुतीच देवालय आणि ' राजा रघुनाथराव कमान ' यावर केलेली विजेची रोषणाई.

[ स. पा. ८९६

जनतेच्या लक्षात आणण्यासाठीं यथाशक्ति प्रयत्न चालू ठेविले असून आमच्या प्रयत्नास, सरकार, आपण आर्थिक आणि मार्गदर्शकत्वाचे साहाय्य आजपर्यंत केले आहे. तसेच आपले राज्यात सवर्धनाचे कार्य सुकर व्हावे यासाठी कायदे जारी केले आहेत ''

## १४ धनगर समाज होळकर बोर्डिंग, भोर

''श्रीमत सरकार, आपण भोर सस्थानचे गादीवर आल्यास १६ वर्षे पुरी होऊन गेली या कारकीर्दींत आपण लोकोपयोगी प्रगतिपर बरीच कार्यें केलीत प्रजाजनाच्या शिक्षणाच्या बाबतीत आपले धोरण अत्यत प्रगतिपर असे आहे आपण राज्यावर आल्यापासून सस्थानचे शिक्षणखात्यावर पूर्वींच्यापेक्षा दुप्पट जास्त रक्कम खर्च होऊ लागली व आपण शिक्षणखात्यात बऱ्याचशा सुधारणा घडवून आणल्या आहेत, ह्या गोष्टीमुळे श्रीमताचे आधिपत्याखाली सस्थानची उत्तरोत्तर प्रगतिच होईल अशी आम्ही खात्री बाळगतों ''

## १५. विचित्रगड तालुका लोकल बोर्ड व शिरवळ नोटिफाइड एरिया कमिटी

''श्रीमत राजेसाहेब,आपण गादीवर आल्यापासून विषमतादर्शक कर नाहींसे केलेत सस्थानात कौन्सिले, लोकल बोर्डें, कमिट्या, दवाखाने, हायकोर्ट, सटका, पूल वगैरे लोकोपयोगी कामे करून शिवाय या तालुक्यात अबवडे येथें आपले पूर्वजाचे वृदावनाचे स्थान रमणीय केले तेथे व पलीकडे दहा पधरा गावाकडे जाण्यास पावसाळ्यात फार अडचण पडत असे, ती अडचण आपण आपल्या परमपूज्य मातोश्री कै श्री सौ हर हायनेस जिजीसाहेब याचे नावे प्रेक्षणीय झुलता पूल बाधून दूर केली, त्याचप्रमाणे शिरवळ येथें निरानदीस घाट नव्हता, त्याचे योजनेकरिता मदत केली, व शिरवळजवळील २७०० वर्षा-पूर्वींच्या प्राचीन पाडव-लेण्याचे उत्खनन करण्याकरिता देणगी दिली, त्यामुळे पुरातन लेण्याची प्रसिद्धि झाली अशा प्रकारे आपण सस्थानची सर्व प्रकारची सुधारणा घडवून आणली ''

## १६. राजगड तालुका लोकल बोर्ड व व्हिलेज कमिटी, नसरापूर

''नसरापूर येथे दवाखाना स्थापन करून रयतेस औषधपाणी मिळण्याची सोय केली तसेच, सर्व तालुक्यात मोफत शाळा-शिक्षणाची सोय करून

शिक्षणास उत्तेजन दिले आहे त्याचप्रमाणे श्रीमत सरकार राजेसाहेब यानी लोकल बोर्डाची प्रथम स्थापना केली, त्या वेळी बोर्डास जे कर्ज होते, ते माफ करून त्यास अनृणी केले, व बोर्डास कायम निधी म्हणून रु २१,३२५ ची उदार देणगी दिली आहे, शिवाय लोकल बोर्डांत बिनसरकारी सभासदाचे मताधिक्य ठेवून बिनसरकारी उपाध्यक्ष निवडण्याचा अधिकार दिला व लोकल बोर्डातर्फे १ सभासद कायदेमडळात पाठविण्याचा अधिकार दिला

आमचे तालुक्यातील कसबे आबवणे येथें ओढयावर दीप ( कॉजवे ) बाधून नसरापूर-वेले रस्त्यावरील पावसाळ्यात होणारी रहदारीची अडचण दूर केली आहे, त्यामुळे श्रीमत राजेसाहेबाचे आम्ही अत्यत आभारी आहोंत ''

## १७. प्रचंडगड तालुका लोकल बोर्ड व व्हिलेज कमिटी, वेले

" विशेषत आमचा तालुका डोंगराळ असल्यामुळे रहदारीची फार गैरसोय होती, ती अबवणे ओढ्यास दीप (कॉजवे) व कादी नदीस पूल बाधून आपण दूर केली तसेच, वेले येथे दवाखाना देऊन मोफत औषधपाण्याची सोय करून सर्वत्र शातता व सुव्यवस्थेचे वातावरण उत्पन्न केलेत, त्याबद्दल आम्ही आपले फार आभारी आहोंत ''

## १८. पौनमावळ तालुका लोकल बोर्ड

" आपली कारकीर्द सुरू झाल्यानतर ज्या अनेक सुधारणा करण्यात आल्या, त्यापैकीं पौनमावळ तालुक्यात वळकी नदीवर चाले गावानजीक लोखडी पूल ( साकू ) बाधून लोकाची गैरसोय दूर केली व तालुक्याचे ठिकाण कोळवण येथें देशी दवाखान्याची स्थापना करून या तालुक्यातील रयतेची औषधपाण्याची सोय केली तसेच, पुणे-पौड रस्त्यास मिळणारी मुठे खोऱ्यातील गावाच्या रहदारीस सोयीस्कर अशी सडक तयार होण्याच्या कामीं योग्य ती मदत केली, या गोष्टींचा प्रामुख्याने उल्लेख करण्यास आम्हास अतिशय आनद होत आहे ''

## १९. सुधागड तालुका लोकल बोर्ड

"या तालुक्यात सन १९३२ सालीं लोकल बोर्डाची स्थापना श्रीमताचे कारकीर्दात झाली असून त्याचे खर्चाकरिता लोकल फडाचे सर्व उत्पन्न देण्यात येत आहे पालीस दवाखान्याची स्थापना करून औषधपाण्याची सोय केली.

आमचा सुधागड तालुका सस्थानातील इतर तालुक्यापासून अलग असून फार दूर असल्याने रस्त्यासबधी फार गैरसोय होत होती, हे लक्षात घेऊन, श्रीमत राजे सरकारनीं पूर्वी २५००० रुपये कुलाबा डिस्ट्रिक्ट लोकल बोर्डास बिनव्याजी उसनवार देऊन पाली-नागोठणा सडक पक्की करून घेऊन तो मार्ग दळण-वळणास सुलभ केला, या गोष्टीचे आज आम्हास कृतज्ञतापूर्वक स्मरण होत आहे

या बोर्डाच्या सभासदात बिनसरकारी सभासदाचे मताधिक्य असून बिनसरकारी सभासदापैकीं एक सभासद भोर कायदे-मडळात पाठविण्याचा हक्क दिल्याने तेथील कामकाजातहि बोर्डाच्या सभासदास भाग घेण्याची सधि मिळाली आहे त्यामुळे आम्ही लोकल बोर्टाचे सर्व सभासद कृतज्ञ अत करणाने हे मानपत्र श्रीमत राजेसाहेब याचे चरणीं अर्पण करतो ''

## २० पाली नोटिफाइड एरिया कमिटी

'' श्रीमतानीं आधुनिक राज्यपद्धतीस अनुसरून स्थानिक स्वराज्याचे हक्क रयतेस देण्याकरिता पालीस प्रथमत सन १०२७ साली सॅनिटरी बोर्ड स्थापन केले पुढें प्रजेची लायकी अधिकाधिक दिसून आल्यावरून माहे जून सन १९३८ पासून पाली येथें वरील सस्थेऐवजी नोटिफाइड एरिया कमिटीची स्थापना केली व तींत बिनसरकारी सभासद नेमिले आहेत इतकेच नव्हे, तर कमिटीचे खर्चास मदत म्हणून पूर्वीची ग्रॅट चालू ठेविली हे वैशिष्ट्य आहे ''

## २१ सुधागड तालुका शेतकरी हितसंवर्धक संघ

'' आपल्या गेल्या १५ वर्षांच्या कारकीर्दीत आपण प्रजेच्या हिताबद्दल अत्यत जागरूक राहून 'सतोष हे राजाचे सामर्थ्य असते', 'प्रजा सुखी असेल तर राजाहि सुखी असतो', ही तत्त्वे आपण आत्मसात् करून त्यास अनुसरून वागण्याचा प्रयत्न करीत आहा हे आपणास भूषणावह आहे.

आपल्या प्रजाहिततत्परतेबद्दल एकाच गोष्टीचा उल्लेख करणे आमचे कर्तव्य आहे आपण भोर सस्थानच्या गादीवर आल्याबरोबर विषमतादर्शक घरवण, लग्नटक्का यासारखे कर दूर केले, यावरून आपल्या अत करणात दलित वर्गाबद्दल किती प्रेम वसत आहे हे स्पष्ट होत आहे ''

मानपत्रवाचनानतर भोर सस्थानातील बावडे येथील रहिवासी रा तुकाराम बापुजीराव पवार यानीं लोकोपयोगी कार्यार्थ रु १००० ची थैली श्रीमत राजेसाहेबाना अर्पण केली नतर सस्थानाबाहेरच्या सुमारे २० सस्था आणि सस्थानातील १६ सस्था याच्यातर्फे व ० वैयक्तिक पुष्पहार श्रीमत राजेसाहेबाना अर्पण करण्यात आले

यानतर श्रीमत राजेसाहेब यानी राजकीय हक्कदान करणारे आपले भाषण वाचून दाखविले ते समग्र भाषण खाली दिले आहे

## श्रीमंत राजेसाहेब यांचे भाषण

" सभ्य स्त्री-पुरुषहो,

श्रीरामचद्रप्रभूच्या कृपेने व श्रीशकराजी नारायणादि पूर्वजाच्या शुभाशीर्वादाने आमच्या वयास साठ वर्षे पूर्ण होऊन एकसष्टावे वर्षांत पदार्पण करण्याचा सुखमय समय प्राप्त झाला, ही आपणाप्रमाणेच व्यक्तिश आम्हालाहि अत्यानदाची गोष्ट वाटत आहे हा सुमगल दिवस लाभल्याबद्दल जगन्नियत्या दयाघन प्रभूची अत करणपूर्वक व अनन्यभावे प्रथम प्रार्थना करून त्याचे चरणी आमची भक्ति व उपकृत भावना आम्ही निवेदन करीत आहों आमच्या आयुष्यातील या आनदाच्या दिवशी आमचे प्रिय प्रजाजन व आप्तेष्ट, तसेच सस्थानातील आणि सस्थानाबाहेरील हितचितक, मित्र व अनेक लोकोपयोगी व सार्वजनिक सस्थाचे प्रतिनिधी असे आपण सर्व या ठिकाणी येऊन मानपत्राचे द्वारे आमचे जे हार्दिक अभिनदन केलेत व खुद्द आमच्याविषयी व आमच्या कुटुबातील मडळीविषयी जी शुभेच्छा प्रदर्शित केली त्याबद्दल आपले आभार मानणे आमचे कर्तव्य आहे आपणा सर्वांच्या मानपत्राचा मोठ्या प्रेमाने व आदराने स्वीकार करण्यास आम्हास फार सतोष वाटत आहे आमच्या प्रकृतीच्या मानाने व वेळेच्या अभावीं म्हणून येथील व बाहेरीलहि काही मानपत्राचे वाचन करता आले नसले, तरी ती मानपत्रे कमी योग्यतेची आहेत असे आम्ही समजत नाही, व आपणहि तसे मानू नये आमच्यावरील निष्ठेच्या, स्नेहाच्या व आनदाच्या भावनेने एकत्र जमलेला हा लोकसमुदाय पाहून आमच्या मनात जी आनदाची भावना उत्पन्न झाली आहे, तिचे शब्दानी

वर्णन करणे आम्हास तरी शक्य नाहीं आम्हीं आपणा सर्वांचे मन पूर्वक स्वागत करीत आहोंत

सभ्य जनहो, या संस्थानचीं राजसूत्रे आमच्या हातीं आलीं त्यास सोळा वर्षे नुकतींच होऊन सतरावे वर्षाचा चवथा महिना कालपासून सुरू झाला आहे एवढ्या अवधीत आमच्या हातून राज्यकारभारात रयतेच्या सुखसोयीच्या व रयतेस त्यात अंशभागी करण्याच्या दृष्टीने काय काय गोष्टी घडून आल्या व कोणकोणत्या सुधारणा झाल्या त्यातील ठळक बाबींचा आढावा त्रोटक रीत्या, आता वाचण्यात आलेल्या निरनिराळ्या मानपत्रात मिळून घेण्यात आला असल्यामुळे, त्याचा आम्ही पुनरुच्चार करीत नाहीं, व तसे करण्याची आवश्यकताहि नाहीं दरसाल राज्यारोहणदिनसमारंभाच्या वेळी तत्पूर्वीच्या वर्षात झालेल्या महत्त्वाच्या गोष्टींचा आढावा घेण्याची प्रथा आम्हीं चालू केल्याने, सर्वांस ह्या गोष्टी ज्ञात आहेतच शिवाय सन १९२१-२२ इ चा राज्यकारभाराचा वार्षिक अहवाल व अलीकडील म्हणजे सन १९३७-३८ इ चा अहवाल, असे दोन्ही अहवाल तुलनात्मक दृष्टीने पाहिल्यास, राज्यकारभाराचे धोरण प्रगतिपथावर निश्चितपणे असल्याचे कोणाचेहि सहजीं लक्षात येणार आहे.

सज्जनहो, आपल्या देशात आयुर्मानाची सरासरी २५ वर्षांची पडत असल्याने साठ वर्षे जगणे ही त्या दृष्टीने आनंदाची गोष्ट असली तरी, आयुष्याची खरी किंमत केवळ कमी जास्त दिवस जगण्यावर नसून त्या कालातील व्यक्तींच्या कामगिरीच्या संख्येवर व विशेषत त्या कार्यांच्या स्वरूपावर अवलंबून आहे, व या जाणीवेमुळेच राज्यावर आल्यापासून जनहिताची कामे आमच्या हातून यथाशक्ति व्हावीत अशी उमेद बाळगून क्रमाक्रमाने सुधारणा अमलात आणण्याचे आम्हीं चालू ठेविले होते मध्यंतरीं त्या चक्राच्या गतीस काही काल नाइलाजास्तव थोडा विसावा द्यावा लागला तरीहि ती दिशा मात्र आम्हीं बदलू दिली नाही, याची जाणीव आपणास असल्याचे ऐकून आम्हास आज समाधान वाटत आहे आमच्या हातून जगदीशाने आजपर्यंत करविलेल्या सुधारणेच्या गोष्टीसंबधीं कित्येक मानपत्रात प्रशंसेचे उद्गार नमूद केले आहेत ते आपले आमच्यावरील प्रेमाचे, स्नेहाचे व आपल्या सोज्ज्वळ

कृतज्ञतेचें लक्षण आहे असें आम्ही समजतों आम्ही मात्र या ठिकाणीं आमचे खरे हृद्गत स्पष्टपणे सागण्याची परवानगी घेतों, कीं, रयतेच्या हितास्तव आजपर्यंत जे काय आम्हास करता आले तेवढ्याने आम्ही कृतकृत्य झालों असे बिलकूल समजत नाहीं इतकेच नव्हे, तर ध्येयसिद्धीच्या दृष्टीने अजून करावयाच्या अशा पुष्कळ गोष्टी आहेत, याची आम्हास पूर्ण जाणीव आहे परतु हेहि तितकेच खरे आहे कीं, यथाक्रम ध्येय साध्य होणे ही गोष्ट मुख्यत्वे शाततेच्या वातावरणावर व रयतेच्या सहकार्यावर अवलबून राहणार आहे आजपर्यंत आम्ही ज्या ज्या सुधारणेच्या गोष्टी केल्या, त्या स्वयस्फूर्तीने व स्वसतोषाने योग्य समय पाहून केल्या आहेत, व त्याचप्रमाणे यापुढेंहि करण्याचा आमचा मनोदय आहे हल्लींच्या कौन्सिलच्या व स्थानिक स्वराज्य सस्थाच्या घटनेत काहीं सुधारणा कराव्या व रयतेस काही सवलती द्याव्या असे आमच्या बरेच दिवस मनात होते तसे करण्यास या सुमगल प्रसगाचा आम्ही फायदा घेत आहोंत करिता कायदेमडळाचे आजपर्यंतचे ठराव व प्रजेच्या आकाक्षा ध्यानात घेऊन व भोर सस्थान राज्यकारभाराबाबतच्या कायद्याच्या कलम १३ मधील अधिकार चालवून आणि सदर कायद्याचीं कलमे १४-१५ यात निर्दिष्ट केलेले स्वयभू अधिकार राखून ठेवून राज्यकारभारविषयक सुधारणा व सवलती याच्यासबधीं खालील घोषणा करण्यास आज आम्हास फार आनद वाटत आहे

## घोषणा

सद्‌गृहस्थहो, आपणास माहीत आहेच कीं,

( १ ) आमच्या सस्थानात भाषणस्वातत्र्यादि प्रजेच्या मूलभूत हक्कावर नियत्रण नाही, गादीवर आल्यानतर लवकरच हे नियत्रण आम्ही काढून टाकले असून ते हक्क तसेच यापुढेहि निर्बाध राहावेत अशी आमची इच्छा आहे करिता त्यास अनुकूल अशी परिस्थिति ठेवली जाईल अशी आम्हास उमेद आहे

( २ ) जबाबदार राज्यपद्धति हे आमच्या राज्यकारभाराचे अतिम ध्येय असल्याचे यापूर्वींच सन १९३२ इ साली, तसा कायदा करून, आम्ही जाहीर केलेच आहे त्याचाच आम्ही आज पुनरुच्चार करीत आहोंत

( ३ ) जबाबदार राज्यपद्धतीच्या ध्येयसिद्धीस पोषक म्हणून व रयतेस राज्यकारभाराचे शिक्षण मिळावे म्हणून, आम्ही सन १९२८ इ सालीं कायदे कौन्सिलची सस्थापना करून त्यामार्गें राज्यकारभाराशीं परिचित होण्याची रयतेला सधि देण्याचा उपक्रम केला, व पुढे लोकल बोर्डें स्थापून, त्या स्थानिक स्वराज्यसस्थात व कायदेमडळात बिनसरकारी सभासद बहुसख्य केले आता यापुढे त्याचीच एक पुढची पायरी म्हणून व प्रातिनिधिक सस्थाचा क्रमश विकास व्हावा या हेतूने इलेक्शन ऊर्फ निवडणुकीचे तत्त्व कायदे-मडळ व सर्वच स्थानिक स्वराज्य सस्थाना लागू करण्यात येत आहे व त्याची रचना खाली दिल्याप्रमाणे असण्याचे ठरविण्यात येत आहे

(अ) यापुढें कायदे-मडळाची मुदत पाच वर्षांची राहील व कायदे-मडळातील अध्यक्षासुद्धा २१ सभासदापैकीं १२ लोकनियुक्त सभासद, प्रत्यक्ष मतदानपद्धतीने निवडलेले (Elected) असतील या मुदतींत कायदे-मडळाचा अध्यक्ष बिनसरकारी नेमलेला असेल व उपाध्यक्ष लोकनियुक्त राहील कौन्सिल-पुढें, खाजगी खर्च ऊर्फ Privy purse ची रकम खेरीज करून, बाकी सर्व बजेट चर्चेकरिता ठेविले जाईल व त्यावर सभासदाना कपातीच्या सूचना आणता येतील, मात्र, या सूचना दरबारवर बधनकारक असणार नाहींत

(ब) भोर म्युनिसिपॅलिटींत $\frac{2}{3}$ सभासद लोकनियुक्त राहतील, तसेंच, अध्यक्ष व उपाध्यक्ष हे निवडलेले असतील

(क) शिरवळ व पाली येथील नोटिफाइड एरिया कमिटींतहि लोक-नियुक्त सभासद दोनतृतीयाश राहतील त्याचा अध्यक्ष मात्र दरबारने नेमिलेला सरकारी अधिकारी राहील

(ड) तालुका लोकल बोर्डांत यापुढें ५ सभासद लोकनियुक्त व ४ सरकार-नियुक्त असे राहतील. बोर्डाचा अध्यक्ष सरकारने नेमिलेला अधिकारी राहील व उपाध्यक्ष निवडलेला राहील

कायदे मडळाचे सभासद निवडण्याचा अधिकार कोणास असावा, मतदार-सघ कसे असावेत, कायदे मडळाचे नियम वगैरे कसे असावेत इत्यादींबद्दल शिफारशींचा रिपोर्ट करण्याकरिता बिनसरकारी सद्गृहस्थाच्या अध्यक्षत्वाखाली एक मिश्र कमिटी यापुढें लवकरच आम्ही नेमणार आहोंत

(४) आमच्या प्रजेपैकीं बहुजनसमाज शेतकरी लोकाचा असल्याने, त्याचे व इतर जनतेचे जीवन सुखावह व्हावे व विशेषत शेतीस उत्तेजन मिळावे म्हणून आम्ही असे ठरविले आहे कीं,

(अ) संस्थानातील शेतीस प्रत्यक्ष उपयोगी पडणारे बैल व ( कोंकणात शेतकामास रेड्याचा उपयोग होतो, म्हणून ) सुधागड तालुक्यात बैलाशिवाय टोणगे याना यापुढें वनचराई माफ केली आहे

(ब) शेतीस रानटी जनावरापासून उपद्रव होणे कमी व्हावे, म्हणून शेतकरी लोकाना बदुकीचे परवाने देण्याच्या बाबतीत दरबारचे धोरण सढळ व उदार (Liberal) राहील

( क ) आमच्या संस्थानात जमीन-साऱ्याची बाब, खरे पाहता, तक्रारीचा विषय नाहीं, तथापि, काहीं बाबतीत ती तशी आहे असे आमच्या नजरेस आणल्यास, त्या ठिकाणच्या नजीकच्या ब्रिटिश हद्दींतील व इतर संस्थानातील याबाबतचे धोरण व प्रमाण लक्षात घेऊन, दरबार या प्रश्नाचा विचार करील

( ड ) पुढील फसली सालापासून बदरी मालाचा लिलाव करण्याचे बद करण्यात येईल.

( ५ ) जगलबाबीसबधाने लोकाच्या काहीं गैरसोयी असल्यास, त्या दूर करण्याकरिता व तक्रारीसबधी, सध्याचे परिस्थितींत, त्या योग्य-अयोग्य ठरवून, दरबारकडे शिफारशींचा रिपोर्ट करण्यास्तव बिनसरकारी सद्गृहस्थाच्या अध्यक्षतेखालीं एक मिश्र कमिटी यापुढे शक्य तितक्या सत्वर नेमण्याचे आम्हीं योजिले आहे

( ६ ) ' वनगर महाल ' बाबीसबधाने त्या लोकावर दुबार कर बसतो असे म्हणणे आहे त्याबद्दल विचार करून शिफारस करण्यास हा प्रश्न नवीन नेमिल्या जाणाऱ्या जगल-कमिटीकडे देण्याचे आम्ही ठरविले आहे

( ७ ) हरिजन ऊर्फ अस्पृश्य समाजाबद्दल दरबारने पूर्वीं जाहीरनामा केलाच आहे, व त्याची अमलबजावणी अगदींच झाली नाही असे नाही तथापि, जाहीरनाम्याप्रमाणे सर्वत्र व पूर्ण अमल व्हावा अशीच दरबारची इच्छा आहे, व त्याबद्दल दरबार योग्य व शक्य ते सर्व करीत आहे व यापुढें करीलच मात्र, दरबारचे हेतू शाततेने व सुकरतेने सिद्धीस जाण्यास, ही बाब अशत धार्मिक

व सामाजिक समजुतीशीं निगडित असल्याने, रयतेच्या सहकार्याची विशेष जरूरी आहे अर्थात्, त्या दृष्टीने लोकमत अनुकूल करणे, हे मुख्यत लोक-पुढाऱ्याचे काम आहे ज्या प्रमाणात असे सहकार्य व सहानुभूति मिळत जाईल, त्या प्रमाणात या बाबतींत प्रगति होत जाणारी असून, जाहिरनाम्यात नमूद केलेल्या बाबींच्या पुढेंहि पाऊल टाकण्यास उमेद येऊन, सार्वजनिक बाबतीत आपल्या समाजात इष्ट व अवश्य तेवढी समता प्रस्थापित करण्याचे ध्येय क्रमाने गाठता येणार आहे, ही गोष्ट आज आम्ही जाहीर रीत्या पुन सर्वांच्या निदर्शनास आणीत आहोत

आमच्या सस्थानात हरिजन-सेवेचे जे प्रयत्न चालू आहेत, त्यास वेळोवेळीं आम्हीं यथाशक्ति आर्थिक मदत केली आहे, हे आपणास माहीत आहे त्याच दृष्टीने हरिजन-समाजाच्या शैक्षणिक उन्नतीस काहींतरी विशेष मदत व्हावी, म्हणून या आनदाच्या प्रसगी आम्ही असे जाहीर करतो कीं, डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या नियत्रणाखाली असलेल्या आर्टस् कॉलेजमध्ये शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना उपयोगाकरिता ज्या चार फ्रीशिप्स् सस्थानतर्फे ठेवण्यात आल्या आहेत, त्यापैकी एक फ्रीशिप सस्थानातील हरिजन विद्यार्थ्यां-करिता नियमाप्रमाणे आम्हीं राखून ठेवीत आहोत, तसेच, आर्टस् कोर्स-व्यतिरिक्त इतर प्रकारचे उच्च शिक्षण घेऊ इच्छिणाऱ्या सस्थानातील विद्यार्थ्यां-करिता ज्या चार स्कॉलरशिप्स् ऊर्फ शिष्यवृत्त्या आम्ही ठेविल्या आहेत, त्यापैकीं रु १५ ची एक शिष्यवृत्ति सस्थानातील हरिजन विद्यार्थ्यांच्या उपयोगास्तव आम्ही राखून ठेवीत आहोत अस्पृश्यापैकीं कोणी विद्यार्थी नसल्यास, सदर फ्रीशिप व स्कॉलरशिप इतराना देण्यात येईल

( ८ ) सज्जनहो, फेडरेशन ऊर्फ संयुक्त-राज्यघटनेचा प्रश्न सध्या सर्वांपुढें प्रामुख्याने आहे. राजकीय दृष्ट्या सस्थाने व ब्रिटिश हिंदुस्थान या दोघानाहि महत्त्वाची अशी ही बाब आहे सस्थानचा फेडरेशनशीं महत्त्वाचा सबध सयुक्त राज्यघटनेतील विधिमडळात प्रतिनिधि पाठविण्याबाबत येणार आहे करिता, त्या सबधात आम्हीं असे जाहीर करतो की, भावी फेडरेशनमध्ये सामील होण्याचे दरबारने निश्चित केल्यास त्यातील विधिमडळात ( Federal

Legislature ) संस्थानतर्फेच्या प्रतिनिधीची नेमणूक करताना आपल्या कायदे-मंडळाचा त्याबाबतचा अभिप्राय विचारात घेण्यात येईल

( ९ ) राजकीय स्वरूपाचे खटले हल्लीं कोणावरहि चालू नाहींत, व अशा प्रकारचे कैदीहि कोणी तुरुंगात नाहींत तथापि या आनंदाचे प्रसंगीं आम्ही असे जाहीर करतों की, अशा प्रकारचे खटले कोणावर झाले असून त्यात दंडाच्या शिक्षा सुनावल्या असल्यास व त्या दंडापैकीं काहीं रक्कम कोणाकडे येण्याची राहिली असल्यास, ती वसूल होणेची राहिलेली रक्कम त्यास माफ करण्यात येत आहे चौकशी करून त्याप्रमाणे हुकूम देण्याची अलाहिदा तजवीज आम्ही करीत आहोत

( १० ) ( अ ) मोसे खोऱ्यात दळणवळणाचे सोयीस्तव त्या भागातील रयतेच्या सुखसंचारार्थ म्हणून योग्य ठिकाणीं एक साकू बांधण्याचे ठरविले आहे ते या शुभ समयीं आम्ही जाहीर करतों

( ब ) त्याचप्रमाणे राजगड व प्रचंडगड या दोन तालुक्यातील दळणवळण सुकर व्हावे म्हणून नसरापूरजवळील शिवगंगा नदीवर लवकरच पूल बांधणेचा विचार करण्यात येईल

सभासदहो, वरीलप्रमाणे गोष्टी सध्या अमलात आणण्याचे आम्हीं ठरविले आहे अर्थात्, या सर्वांच्या मुळाशीं रयतेस राज्यकारभारात क्रमाक्रमाने जास्त जास्त अंशभागी करावे व तिला नव्या कल्पनाप्रमाणे राज्यकारभार चालविण्याचे शिक्षण मिळावे हा हेतु असल्याने, त्याच्या सिद्ध्यर्थ आज आम्ही असेहि जाहीर करतों कीं —

( ११ ) यानंतरच्या काळात हल्लींप्रमाणेच संस्थानात शांततेचे व सुव्यवस्थेचे वातावरण कायम राहिल्यास व भावी कायदेमंडळातील सभासदानीं आपले धोरण दरबारशीं सहकार्याचे व सलोख्याचे ठेवून, दिलेल्या या हक्काचा व सवलतींचा योग्य उपयोग करून जास्त हक्क उत्तम रीतीने वहिवाटण्याविषयींची व संस्थानची तद्द्वारें प्रगति करण्याची कळकळ व तयारी पटवून आपली खरी पात्रता आमच्या निदर्शनास आणली, तर नव्या कायदेमंडळाच्या पहिल्या पाच वर्षांच्या अवधीनंतर खालील तीन गोष्टी अमलात आणण्याचे आम्हीं ठरविले आहे त्या तीन सुधारणा म्हणजे —

( अ ) कायदे-मडळाचा अध्यक्ष लोकनियुक्त सभासदातून निवडण्याचा कायदे-मडळास अधिकार देणे

( ब ) लोकनियुक्त सभासदापैकीं एकास मिनिस्टर ऊर्फ मत्री म्हणून कार्यकारी मडळात घेऊन त्याच्याकडे शिक्षण, आरोग्य, वगैरे राष्ट्र-सुधारक खातीं ( Nation-building ) सोपवणे, व

( क ) Privy purse ची रक्कम सोडून बाकीचे बजेट सर्टिफिकेशनचा अधिकार आमचेकडे राखून ठेवून कौन्सिलच्या मतास टाकणे, ह्या होत

अर्थात्, या तीन गोष्टींचा अमल पाच वर्षांनतर होणारा असल्याने, त्याच्या तपशीलात आज शिरण्याचे प्रयोजन नाहीं सदरहू मबधीचे नियम करणे वगैरेचा विचार, त्या वेळच्या परिस्थितीप्रमाणे, पुढें होणार आहे

सभासदहो, या शुभ प्रसगीं ' ग्रामोद्धार ' या महत्त्वाच्या व प्रचलित विषयास विशेष चालना मिळण्याच्या दृष्टीने, कायदेमडळात यासबधीं वेळोवेळी आलेल्या ठरावास अनुलक्षून, आमचेकडून काहींतरी घोषणा होईल अशी आपली अपेक्षा नसेलच असे नाही, व तशी ती असल्यास ती अयोग्य आहे असेहि आम्ही म्हणत नाहीं इतकेच नव्हे, तर या विषयासबधीं आम्हास किती कळकळ व आस्था वाटत आहे हे वेळोवेळीं आम्हीं आपल्या भाषणात बोलून दाखविलेले असून, त्या कामीं ज्यानीं ज्यानीं प्रत्यक्ष कृति केली आहे त्याना आर्थिक मदत करून आम्ही उत्तेजन दिले आहे, हे आम्ही आपणास सागितले पाहिजे असे नाही तथापि आम्ही आपल्या लक्षात आणू इच्छितों कीं, ग्रामोद्धाराच्या कक्षेत अनेक विषय येत आहेत, व त्या सर्वांचा परामर्श घेणे मोठ्या खर्चाचे, जिकीरीचे व दिनावधीचे काम आहे उदाहरणार्थ, सस्थानातील मोठ्या वस्तीच्या ठिकाणीं म्हणजे खेडेगावीं ग्रामपचायती सक्तीने स्थापन करणे, तालुकानिहाय शेतकीसुधारणासघ व ग्रामोद्धारकेंद्रे सुरू करणें, प्राथमिक शिक्षण सक्तीचे करणे, शेतकऱ्याना हलक्या व्याजाने कर्जाऊ रक्कम मिळण्याची योजना करणे वगैरे अनेक स्वरूपाच्या व्यापक प्रश्नाचा यात समावेश होऊ शकत असल्याने, या वेळीं तत्सबधीं निश्चित घोषणा करणे किती अडचणीचे आहे हे आम्ही विशेष रीत्या सागितले पाहिजे असे नाहीं तरी पण, या बाबतीत आज एवढें आम्ही जाहीर करितों कीं, ग्रामो-

द्वाराच्या कक्षेत असणाऱ्या वरील विषयाबाबत येथील परिस्थितीच्या मानाने काय करता येईल त्याची शिफारस करण्यास, कायदेमंडळाने संमत केलेल्या ठरावास अनुसरून, नेमिलेल्या ग्रामोद्धार व बँक कमिट्याचे जे रिपोर्ट दरबार-कडे आले आहेत, त्यातील शिफारशींचा विचार शक्य तितक्या सहानुभूतीने व लवकर आमच्याकडून करण्यात येईल.

सद्गृहस्थहो, या सुसमयीं नुकत्याच आम्हीं केलेल्या दिवाणाचे नेमणुकी-संबंधी उल्लेख करणे उचित असल्याने त्याकडे आम्ही वळतो आपणास माहीत आहेच कीं, श्रीयुत दादासाहेब कुमठेकर, रिटायर्ड डिस्ट्रिक्ट व सेशन्स जज्ज, हे आमचे परम स्नेही आहेत त्यांचे कर्तव्यक्षेत्र पूर्वीं ब्रिटिश हद्दीत असले तरीहि, वेळोवेळी राज्यकारभाराचे कामी विशेष प्रसंगीं आम्ही त्यांचा सल्ला घेत होतो, व आम्हास सांगण्यास आनंद वाटतो की, ते आपला सल्ला निस्पृहरीत्या व मनमोकळेपणाने देत असत, व आम्हास त्यांच्या सल्लामसलतीचा फार उपयोग झालेला आहे. त्यांचा स्वभाव निगर्वी, सरळ व शांत वृत्तीचा असून समाजात मिळून मिसळून व मिळते घेऊन वागण्याची त्यांची पद्धति असल्याने, आजपर्यंत त्यांच्या सल्ल्याचा आम्हास जसा उत्कृष्ट उपयोग झाला तसा तो आमच्या रयतेस व्हावा व होईल ह्या हेतूने व उमेदीने आम्ही दिवाण-पदावर त्यांची नेमणूक केली आहे आमची ही योजना संस्थानातील व बाहेरीलहि समंजस बहुजनसमाजास पसंत पडल्याचे समजून आम्हास संतोष झाला आहे त्यांची दिवाण या नात्याची कामगिरी संस्थानास व रयतेस उत्कर्षकारी व हितप्रद होईल अशी आमची खात्री आहे

प्रजाजनहो, आमचे संस्थान हे जसे आमचे आहे तसेंच ते आपलेंहि आहे. त्याचप्रमाणे आम्हीहि आपलेच आहोत व आपणासहि आम्ही हितसंबंधाच्या बाबतीत आमच्यापासून वेगळे समजत नाही संस्थानच्या उत्कर्षात व आपल्या कल्याणात आम्ही व आपण असे उभयतां सारखेच हितसंबंधाने निगडित आहोत आम्हीं ज्या घोषणा आतां केल्या आहेत त्यापैकी काहींच्या-योगें राज्यकारभाराचे कामीं सल्ला देण्याची व अंशभागी होण्याची जबाबदारी आपणावर हल्लींपेक्षा जास्त पडणारी आहे, हे आपणास सहजी दिसून येणार आहे तरी हक्कप्राप्तीबरोबरच संस्थानच्या प्रगतीचा मार्ग सुकर कसा होईल

चित्रांक २०७

भोर सस्थानचे साकेतिक चिन्ह




**Bhor State Heraldıc Emblem**

ह्याकडे हमेश लक्ष पुरवून आपल्याकडून समयप्राप्त व सुविचारसमत सूचना वगैरे केल्या जातील अशी आम्ही उमेद बाळगल्यास व अपेक्षा केल्यास ती सफल होईल असा आमचा दृढ भरवसा आहे

सज्जनहो, शिरवळजवळील बावडे गावचे रहिवासी रा तुकाराम बापूजीराव पवार यानी बावडे गावच्या सर्वजनोपयोगी कार्याप्रीत्यर्थ विनियोग करण्याकरिता १००० रुपये आज रोजी आताच आमच्या स्वाधीन केले आहेत यापूर्वीहि अनेकदा त्यानीं बावडे गावी सार्वजनिक कार्यांस प्रत्येक वेळीं सर्वात जास्त अशी आर्थिक मदत केलेली आहे असे आम्हास कळले आहे त्याची ही लोकोपयोगी कार्यांस मदत करण्याची हौस व तत्परता नि सशय कौतुकास्पद, अभिनदनीय व इतरानीं अनुकरणीय अशीच आहे अशा रीतीने खेडेगावच्या सधन लोकानीं सार्वजनिक कार्यास हातभार लावण्याचे मनात आणल्यास ग्रामोद्धाराच्या कार्याचे पाऊल झपाट्याने पुढें पडून सर्वांचेच हित होणार आहे तरी रा तुकाराम बापूजीराव याच्या लोकहित-बुद्धी(Public spirit)चे चीज व्हावे या हेतूने या सार्वजनिक सुप्रसगीं त्यास ' ग्रामभूषण ' ही पदवी दिल्याचे आम्ही मोठ्या आनदाने जाहीर करतों

श्रीयुत शकर नाना करपे, पुणे शहर म्युनिसिपॅलिटीचे माजी नगराध्यक्ष (President), यानी रुग्ण-शुश्रूषेच्या कामीं उपयोग करण्यास येथील किंग जॉर्ज दि फिफ्थ सिल्व्हर ज्युबिली हॉस्पिटलच्या फडाकडे जमा व्हावेत म्हणून रुपये १००० आमच्या स्वाधीन केले आहेत श्रीयुत शकर नाना याचा आमच्या सस्थानशी कॉन्ट्रॅक्टर या नात्याने बऱ्याच वर्षांचा सबध आहे आपल्या प्राप्तीपैकीं काहीं रकमेचा येथील रुग्ण जनतेस उपयोग व्हावा या उदार व दयार्द्र बुद्धीने त्यानी दिलेल्या या देणगीचे कौतुक करावे तितके थोडेच होणार आहे ज्या भावनेने त्यानी ही देणगी दिली आहे त्याच भावनेने आम्ही तिचा स्वीकार आनदाने करीत आहोंत त्याच्या या उदार बुद्धीचे गुणग्रहण करणे हे आमचे कर्तव्य आहे व त्या दृष्टीने आमच्या गुणग्रहणाचे कायमचे चिन्ह म्हणून या शुभ प्रसगीं त्याना आम्ही 'व्यवसायविभूषण' ही पदवी अर्पण करीत आहोंत

सभ्य स्त्री-पुरुषहो, या आनदाच्या प्रसगीं आमच्या एकदर नोकरवर्गापैकी वरिष्ठ दर्जाच्या नोकराव्यतिरिक्त इतर सर्व नोकराना मिळून ५००० रुपये

बोनस उर्फ देणगी देण्याचे आम्हीं ठरविले आहे वरिष्ठ दर्जाच्या नोकराना या शुभ प्रसगानिमित्त पदके (Medals) देण्याचे आम्हीं ठरविले आहे

सज्जनहो, आमच्या या भाषणाचा शेवट करण्यापूर्वी एका गोष्टीचा उल्लेख करणे आम्हास अत्यवश्य वाटत आहे. आजचा समारभ सुमारें तीन महिन्यापूर्वी म्हणजे ता १९-२० सप्टेबर रोजीं व्हावयाचा होता, व त्या दृष्टीने आपली व दरबारचीहि सर्व सिद्धता झाली होती तथापि दुर्दैवाने अगदीं आयत्या वेळीं म्हणजे ता १७ सप्टेबर रोजीं रात्रीं एकाएकीं रक्तदाबा(High blood-pressure)च्या विकाराने आमची प्रकृति बिघडल्याने त्या वेळचा समारभ तहकूब करावा लागला आमच्या त्या आकस्मिक आजारी-पणामुळे आपणा सर्वांचा विरस झाला, कित्येक पाहुणेमडळीना परत जावे लागले, दरबारचा व इतर सार्वजनिक सस्थाचाहि काहीं खर्च निरर्थक झाला वगैरे गोष्टींबद्दल आम्हास फार वाईट वाटत आहे परतु ती नाइलाजाची गोष्ट असल्याचे लक्षात घेऊन ‘ प्रारब्धमुत्तमजना न परित्यजन्ति ’ या कविवचना-प्रमाणे आमची तब्येत पूर्ववत् झाल्याबरोबर आपण हा समारभ घडवून आणण्याची पुन्हा उमेद धरून आजचा आनदाचा दिवस साजरा केला व सर्वजण या ठिकाणी आपापले व्यवसाय दूर सारून जमलात याबद्दल आम्हास फार आनद वाटत आहे अशा रीतीने आमच्याविषयीं आपल्या मनात वसत असलेल्या खऱ्या सद्भावनेने आपण सर्वांनी पुनरपि घेतलेल्या या परिश्रमाबद्दल आम्ही आपले सकौतुक पुनश्च अत करणपूर्वक आभार मानीत आहोत.

शेवटीं ज्या श्रीरामचद्रप्रभूच्या कृपेने हा सुदिन प्राप्त झाला त्याच्या चरणीं अनन्य भावाने लीन होऊन प्रजेच्या उन्नतीसबधींच्या आमच्या सदिच्छा व प्रयत्न सुपरिणामी होवोत अशी प्रार्थना करून आम्ही आपले भाषण पुरें करतों ”

श्रीमत राजेसाहेब याचे भाषण झाल्यावर समारभाकरिता मुद्दाम उपस्थित राहिलेले सन्मान्य पाहुणे व भोर सस्थानच्या हिताविषयी आस्थापूर्वक कळकळ बाळगणारे श्री रा नरसिंह चिंतामण ऊर्फ तात्यासाहेब केळकर याचे उद्बोधक व विचारपरिप्लुत असे अभिनदनपर भाषण झाले

श्री. केळकर याचे भाषणानतर भोर येथील स्थानिक सत्कारसमितीचे अध्यक्ष श्री रा ग मा पानसे, बी ए, एल्‌एल्‌ बी, वकील, यानी सत्कार-समितीतर्फे व रा वि र ठकार, बी ए, एल्‌एल्‌ बी., वकील, यानी भोर कायदेमडळाचे तर्फे आभारप्रदर्शक भाषणे केलीं

नतर हारतुरे, अत्तर-गुलाब, पानसुपारी वाटण्यात येऊन समारभ समाप्त झाला रात्री दारुकाम झाले

ता १७ डिसेबर रोजी सकाळी ९ वाजता श्रीमताच्या षष्ट्यब्दिपूर्ति-समारभानिमित्त भोरचे पोलिस, स्वार, शिबदीची परेड करण्यात आली त्या वेळी बरीच पाहुणेमडळी उपस्थित होती श्रीमत राजेसाहेब, श्रीमत युवराज व राजकुमार याचेसमवेत परेड ग्राउडवर हजर राहून त्यानी परेडच्या वेळी देण्यात आलेल्या सलामीचा स्वीकार केला त्या वेळी श्रीमताना ९ तोफाची सलामीहि देण्यात आली

सकाळी ११ वाजता भोजनापूर्वी श्रीमत राजेसाहेब श्रीभोरेश्वर, श्रीमुरलीधर व श्रीमारुती याचे दर्शनास गेले होते दुपारीं १२ वाजता गोर-गरिबास अन्न व वस्त्रदान देण्यात आले

## अहेराचा दरबार

भोजन झाल्यावर श्रीमताच्या षष्ट्यब्दिपूर्तीच्या निमित्ताने श्रीमताचे आप्तेष्ट, नातेवाईक, नोकरवर्ग इत्यादींनी श्रीमतास यथाशक्ति अहेर समर्पण करून आपापला आदर व प्रेम व्यक्त करावयाचे होते, त्याकरिता दुपारी राजवाड्यातील श्रीराममडपात दरबार भरविण्यात आला होता श्रीमत राजेसाहेब, श्रीमत युवराज व श्रीमत राजकुमार याचेसह दरबारचे मडपात येऊन आसनस्थ झाल्यावर पूर्वपरपरेनुरूप भोर येथील सुवर्णकार यानी श्रीमतावर सुवर्णाची फुले उधळलीं स्वागतपर पद्यगायन झाल्यावर श्रीमताचे आश्रित, वैदिक, शास्त्री, पडित याची आशीर्वचने झाली श्रीदत्तमदिर भोर, श्रीकृष्णाबाई सस्थान ब्राह्मणशाही घाट वाई, स्वाध्यायमदिर पाचवड, श्रीनिराबाई उत्सवमडळ शिरवळ, या सस्थाच्या प्रतिनिधींनीं श्रीमतास श्रीचा प्रसाद म्हणून श्रीफल व पुष्पहार समर्पण केले त्याचा श्रीमतानी आदरपूर्वक स्वीकार केला

नतर निरनिराळ्या कवींनीं या समारभाकरिता मुद्दाम तयार केलेल्या अभिनदनपर कविता वाचून दाखवून त्या श्रीमतास सादर केल्या त्यातील वे शा स हरी वासुदेव दीक्षित, वे शा स बाळशास्त्री धोंडभट पारखी राजोपाध्ये, म म अभ्यकरशास्त्री, म म सीतारामशास्त्री शेंडे व सातारचे वे शा स माणेश्वरशास्त्री गोकर्णकर याचीं आशीर्वचनें आणि वे शा स. नारायणशास्त्री भावे याचा वैदिक आशीर्वाद ही परिशिष्ट २० मध्ये दिलीं आहेत. श्रीमत राजेसाहेब याची नात श्रीमत राजकुमारी विमलाराजे यानीं स्वत तयार केलेले 'बाल-अक' नावाचे (मासिक) छोटेसे पुस्तक श्रीमतास अर्पण केले श्री राजकुमारी विमलाराजे या अवघ्या १२ वर्षांच्या आहेत त्यानी केलेल्या या प्रयत्नाबद्दल श्रीमताना अत्यत कौतुक वाटले भोर येथील राजा रघुनाथराव हाय-स्कूलमधील तरुण शिक्षक रा रा चिंतामण दत्तात्रय अबेकर यानीं निरनिराळ्या मासिकातून काहीं गोष्टी लिहून त्या वेळोवेळीं प्रसिद्ध केल्या होत्या त्या सर्व गोष्टी पुन एकत्र छापून तो कथासग्रह 'हिमवती' असे नाव देऊन या दरबारात श्रीमत राजेसाहेब याना समर्पण केला तसेच भोरचे रहिवासी व सध्या 'ज्ञान-प्रकाश'चे सहसपादक मडळात काम करीत असलेले रा रा रामचद्र गोविंद कानडे, वाङ्मयविशारद, यानीं 'प्राचीन व अर्वाचीन ग्रथालयाचा इतिहास' या नावाचे एक माहितीपूर्ण पुस्तक तयार करून ते श्रीमतास या समारभाच्या निमित्ताने अर्पण केले. पालीचे रा. ल. के. भावे वकील यानीं आपले 'वैवाहिक जीवन' नावाचे पुस्तक श्रीमतास भेट दिले. यानतर श्रीमताचे आप्तेष्ट व नाते-वाईक, तसेच त्याचे स्नेही व सस्थानमधील भोरचे व पाच तालुक्याचे नोकरवर्ग यानीं श्रीमताना अहेर व काहींनीं फोटो समर्पण केले सर्वांच्या अहेराचा स्वीकार केल्यावर श्रीमतानीं समयोचित भाषण करून सर्वांनीं अहेर केल्याबद्दल आनद प्रदर्शित केला. श्रीमताचे भाषण परिशिष्ट २१ मध्ये दिले आहे. श्रीमतानीं ग्रथलेखकाना गुणगौरव म्हणून रा. चिं द. अबेकर याना रु ३०० आणि रा रा गो कानडे याना रु ४०० पारितोषिक म्हणून दिले नतर पानसुपारी, अत्तर गुलाब वाटण्यात येऊन दरबार समाप्त झाला.

## षष्ट्यब्दिपूर्तीचें महत्त्व

या मगल प्रसगीं सुधागड तालुक्यातील रहिवासी व महाराष्ट्रातील प्रसिद्ध लेखक श्रीयुत महादेव हरि मोडक यानीं रचलेले शुभचिंतनपर जे

कविता-अष्टक श्रीमंत राजेसाहेबाना अर्पण करण्यात आले त्यातील पुढील श्लोकावरून षष्टयब्दिपूर्तिसमारभाचे महत्त्व किती आहे हे लक्षात येईल

आसीदुग्ररथाभिध क्षितिपति शत्रावुदग्रायुध ।
शास्ता दुर्जनरक्षसा सुखयिता य सज्जनाना तथा ।।
षष्टयब्दे समुपस्थिते हि वयसस्त्वार्त क्षतायुर्यथा ।
शार्ति शौनकभाषिता सुविधिना कृत्वा शतायुर्बभौ ।।

अर्थ —पूर्वकाळी शत्रूवर सदैव शस्त्र उगारून सिद्ध असणारा आणि दुर्जन राक्षसाना वठणीस आणून सज्जनाना शातिसुख देणारा असा ' उग्ररथ ' नावाचा क्षत्रिय राजा होता पण त्याचे वयाला साठावे वर्ष लागताच ( सुवैद्य व ज्योतिर्विद याच्या भाकिताप्रमाणे ) त्याच्या प्राणावर बेतली, त्या वेळीं त्याचे गुरु शौनक महर्षि यानीं आजकालचे शातिप्रथात ' उदग्रथशाति ' या सज्ञेने सागितलेल्या पद्धतीचे विधान केल्याने पूर्णायु होऊन तो पूर्ववत् झळकू लागला

श्रीमान् पण्डितवशजो रघुपति षष्टयब्दसधौ तथा ।
बाढ तीव्रशिरोरुजा स्मृतिहरा नि सज्ञतामाप्तवान् ।।
दिष्टया श्रीकृपया चिकित्सकचणै सज्ञा पुनर्लब्धवान् ।
लोकानदकरो यथा दिनकरो व्युत्सार्य नैश तम ।।

अर्थ —त्याचप्रमाणे ' रघुनाथ ' सज्ञक श्रीमान् पडितकुलोत्पन्न राजे-साहेबास वयास साठी भरण्याचे सधीला आकस्मिक अत्यत तीव्र व स्मृतिलोप करणारी मूर्च्छा येऊन बेशुद्धि आली. परतु सुदैवाची गोष्ट कीं, श्रीकृपेने चतुर चिकित्सकाच्या यत्नाने, रात्रीचे निबिड अधाराचा उच्छेद करून लोकानदकर श्रीदिनकर उदयाचलीं आरूढ व्हावा त्याप्रमाणे आजाराचा उच्छेद करून प्रजाजनाला आनददायक असे आपले दर्शन देण्यासाठीं श्रीमत सिंहासनारूढ होऊन आपले सभास्थानीं बसले आहेत.

श्रीयुत मोडक यानीं केलेली ही मगलाष्टपदी समयोचित व मार्मिक अशीच आहे उग्ररथ राजाप्रमाणेच साठ वर्षें पुरीं होताच श्रीमत राजेसाहेबाच्या प्राणावर बेतली होती हा कालच मोठा भयप्रद असता श्रीमत राजेसाहेब या अशा कालातून निभावून जाऊन त्यानीं आयुष्याच्या नवीन कालखडात प्रवेश

केला याबद्दल त्याच्या प्रजाजनाना आनद होऊन त्याचा उत्साहपूर्वक गौरव करण्यात आला त्याच्या राज्यारोहणसमयी जो दरबार भरला होता त्यापेक्षा या वेळच्या दरबाराचे वैभव कितीतरी पटीने जास्त होते आजपर्यंत इतका मोठा दरबार कधींहि भरला नव्हता व प्रजेचा उत्साहहि इतक्या उत्कटत्वाने दिसून आला नव्हता

सायकाळीं ५–३ ०वाजता राजा रघुनाथराव हायस्कूलचे मागील पटागणात पुणे येथील महाराष्ट्रीय मडळाच्या चालकानीं तेथील व्यायामप्रेमी विद्यार्थ्याकडून कसरतीचे प्रयोग करून दाखविले तसेच ममारभानिमित्त कुस्त्याहि करण्यात आल्या रात्रौ ९ वाजता पुणे येथील सोशल क्लबने केलेल्या 'तोतयाचे बड' या प्रयोगास श्रीमत राजेसाहेब, श्रीमत युवराज, श्रीमत राजकुमार बापूसाहेब व रावसाहेब, श्री राजकुमारी पद्मावतीराजे, श्री सौ माईमाहेब व सर्व बाळे उपस्थित होती श्री तात्यासाहेब केळकर मुद्दाम या प्रयोगाकरिता आले होते

ता १८ रोजीं दुपारीं भोर येथील मर्व नोकरवर्गांना मेजवानी देण्यात आली रात्रौ भोर येथील रा. वाकणकर याच्या नेतृत्वाखालीं तयार करण्यात आलेल्या ऑर्केस्ट्राचे वादन झाले

येणेप्रमाणे डिसेंबर १९३८ च्या १६, १७, १८ या तीन तारखास श्रीमताच्या षष्ठ्यब्दिपूर्ति-समारभाचा कार्यक्रम व्यवस्थित रीतीने पार पडला

## घोषणेबद्दल सार्वत्रिक अभिनंदन

ता १६ रोजीं दुपारच्या दरबारात श्रीमत राजेसाहेब यानीं जाहीर घोषणा करून हक्कदान केले त्याबद्दल त्याच दिवशी रात्रौ भोर येथील श्रीदत्तमदिरात भोरचे वकील रा वासुदेव सदाशिव पाटणकर याचे अध्यक्षतेखालीं सभा भरून हक्कदान केल्याबद्दल श्रीमताचे अभिनदन करणारा व दिलेल्या हक्काबद्दल सर्वांस समाधान झाल्याचा निदर्शक असे ठराव पास करण्यात आले या सभेला के श्री वामनराव पटवर्धन व श्री तात्यासाहेब केळकर आणि इतर बरेच सन्मान्य गृहस्थ हजर असून लोकसमुदाय सुमारे १०००–१२०० होता या सभेत पास झालेला अभिनदनपर ठराव श्रीमताच्या अवलोकनाकरिता सभेचे अध्यक्ष श्री पाटणकर यानी पाठविला तो असा –

"श्रीमत राजेसाहेब यानीं आपले षष्ट्यब्दिपूर्तिसमारभाचे सुप्रसगी प्रजेस हक्कदान करून सस्थानचे राज्यकारभारात अधिक अशभागी केले याबद्दल ही सभा श्रीमताचे हार्दिक अभिनदन करीत आहे श्रीमताचे या हक्कदानाबद्दल सस्थानातील सर्व प्रजाजन अत्यत ऋणी आहेत"

वरीलप्रमाणेच ता १७।१२।१९३८ रोजी उत्रवली येथील गावकऱ्याची जाहीर सभा रा राघू तुकाराम शेटे याचे अध्यक्षतेखालीं होऊन हक्कदानाबद्दल पसती दर्शवून श्रीमताचे अभिनदनपर असे ठराव पास करण्यात आले

तसेच शिरवळ नागरिकानीं रा शकरराव नानासाहेब निगडे देशमुख याचे अध्यक्षतेखाली सभा भरवून अभिनदनपर ठराव पास करून तो श्रीमताकडे पाठविला तो असा —

" श्रीमत राजेसाहेब यानी आपले षष्ट्यब्दिपूर्तिसमारभाचे वेळीं ता १६ डिसेबर सन १९३८ रोजी जाहीर घोषणा करून सस्थानी प्रजेस राज्य-शासनाचे कामी अधिक अशभागी केले त्याबद्दल व विशेषत शिरवळ गावचे 'नोटिफाइड एरिया' सस्थेस निवडणुकीचे तत्त्व लागू करून शिरवळचे ग्रामस्थाना अधिक उपकृत करून ठेविले याबद्दल ही सभा श्रीमत राजेसाहेबाचे आभार व कृतज्ञतापूर्वक अभिनदन करीत आहे "

पाली येथें समाजसेवा सघाचे इमारतीसमोर सुधागड तालुका शेतकरी हितवर्धक सघाचे ७ वे अधिवेशन श्री केशवराव बागडे, वकील पुणे, याचे अध्यक्षतेखाली ता २९–१२–१९३८ रोजी झाले त्या सभेत पुढील ठराव करण्यात पास आला

" श्रीमत सरकार राजेसाहेब, भोर, यानी आपल्या षष्ट्यब्दिपूर्ति ता १६–१२–१९३८ च्या समारभप्रसगीं आमचे शेतकऱ्यावरील व बदरी मालावरील कायमचा कर दूर केला व अशत तरी चरगण फी माफ केली याबद्दल ही सभा श्रीमत सरकार राजेसाहेब याचे अभिनदन करीत आहे "

भोर येथील बार असोसिएशनने खालील ठराव पास केला —

" श्रीमत राजेसाहेब यानीं षष्ट्यब्दिपूर्तिसमारभाचे दरबारात जाहीर घोषणा करून प्रजेस हक्कदान केले त्याबद्दल भोर बार असोसिएशन श्रीमताचे अभिनदन करीत आहे "

श्रीमत राजेसाहेबानीं केलेल्या घोषणेबद्दल वर्तमानपत्रातून समाधानदर्शक लेख आले त्यातील सस्थानी स्वराज्य, *Times of India*, आणि *United India and Indian States* या पत्रातील उतारे व समारभाचें वैभव दर्शविणारा भारत पत्रातील उतारा इ. परिशिष्ट २२ मध्ये दिले आहेत

श्रीमताच्या वरील घोषणेचे काय महत्त्व होते ते श्रीमतानीं लवकरच पांच तालुक्याची जमाबदी केली त्या वेळीं प्रत्येक तालुक्यात श्रीमताना मानपत्रें अर्पण करून त्याच्या भाषणानतर जे आभार-प्रदर्शन झाले त्यावरून समजून येणार आहे त्यामध्ये मुख्य रा. ग. मा पानसे व रा ग. भा साने याचीं भाषणे त्या त्या समारभाच्या हकीकतींत पुढील प्रकरणात देण्यात आलीं आहेत, व बाकीचीं रा. ह स देशपाडे, रा. स. कृ. शिंदकर, रा दा वि. गोखले व दा. बा पोतनीस याच्या भाषणातील महत्त्वाचे उतारे परिशिष्ट २२ मध्ये दिले आहेत.

## प्रकरण २६ वें

# पांच तालुक्यांची जमाबंदी व मानपत्र-अर्पणसमारंभ

श्रीमत राजे बाबासाहेब पडित पतसचिव याच्या षष्ट्यब्दिपूर्तिसमारभाची हकीकत वर देण्यात आलीच आहे समारभासबधीं कामकाज आटोपून सर्व स्थिरस्थावर झाल्यावर श्रीमत राजेसाहेब यानीं सस्थानच्या पाचहि तालुक्याचे मुख्य ठिकाणास भेट देऊन तालुक्याची जमाबदी करावी असे ठरविले जमा-बदीच्या फिरतीवर जाण्यात श्रीमताचे दोन हेतू होते पहिला म्हणजे, गेल्या बरेच दिवसात जमाबदी करण्यास तालुक्यात फिरण्याची दुसऱ्या कित्येक महत्त्वाच्या कामामुळे व प्रकृतीच्या अस्वस्थतेमुळे त्याना सवड न मिळाल्यामुळे तेथें कशा प्रकारची व्यवस्था चालू आहे ती समजून येत नव्हती, ती स्वत पाहणे व दुसरा आणि महत्त्वाचा हेतु म्हणजे, त्या त्या तालुक्यातील प्रजाजनाना समक्ष भेटून त्याच्या काहीं अडीअडचणी असतील त्या ऐकून घेऊन त्या दूर करण्याचा प्रयत्न करणे त्याना काहीं सूचना करावयाच्या असल्यास त्या समजावून घेऊन त्यातील ग्राह्य असतील त्यासबधीं विचार करणे व एकदर सस्थानची परिस्थिति कशा प्रकारची आहे ती स्वत नजरेखालीं घालणे. हे दोन्ही उद्देश पुढें ठेवून श्रीमतानीं जमाबदीची फिरती केली.

दौऱ्याचा कार्यक्रम मुक्रर झाल्यावर तालुक्याचे ठाणे अमलदार याना भेटीच्या तारखा आगाऊ कळविण्यात आल्या श्रीमत राजेसाहेब जमाबदीकरिता तालुक्यातून हिंडणार आहेत ही बातमी चोहोंकडे प्रसृत झाली श्रीमत राजे-साहेबानीं ता १६ डिसेबर रोजीं राजकीय हक्कदानाची जी जाहीर घोषणा केली त्या घोषणेने सर्व प्रजाजनाना समाधान झाले होते तेव्हा सर्व तालुक्यातील प्रजाजनाना भेटीच्या वेळीं श्रीमताचे यथोचित स्वागत करून त्याना मानपत्रे अर्पण करून त्याचे अभिनदन करणे हे आपले कर्तव्य आहे ह्याची जाणीव होऊन, दौऱ्याचा कार्यक्रम प्रसिद्ध झाल्याबरोबर रयतवर्गापैकीं प्रत्येक तालुक्यातील प्रमुख पुढारी श्रीमताचे भेटीस समक्ष आले आणि तालुक्यातील भेटीच्या वेळीं तालुक्याच्या रयतवर्गाच्या अभिनदनपर मानपत्राचा स्वीकार

करावा अशी त्याना विनती केली भोर येथे नुकत्याच झालेल्या षष्ट्यब्दिपूर्ति-समारभात सर्व रयतवर्गाने अत करणपूर्वक भाग घेऊन व यथाशक्ति आर्थिक साहाय्य देऊन समारभ यशस्वीपणे पार पाडला होता तेव्हा आता त्याच रयत-वर्गांनीं पुन्हा दुबार खर्च करून सत्कारसमारभ करावे, मानपत्रे अर्पण करावी, या गोष्टी श्रीमताचे मनास रुचेनात आपली रयत गरीब आहे, समारभाकरिता पुन्हा वर्गणी करण्यात येईल, गरीब रयतेवर विनाकारण बोजा पडेल, याची श्रीमताना जाणीव असल्याने अशा प्रकारचे समारभ करण्याचे भानगडींत न पडण्याबद्दल पुढारीवर्गास सुचविण्यात आले तथापि, सर्व पुढाऱ्यानीं एक-मताने सागितले की, आपण आमचे मायबाप आहात, फार दिवसानी आपण आमचे तालुक्यात येत आहा व तेहि ता १६-१२-१९३८ रोजी आम्हास राजकीय हक्कदान देऊन आम्हास उपकृत केल्यानतर येत आहा शिवाय सस्थाना-तील सर्व प्रजाजनास त्या वेळी आपल्या दर्शनाचा लाभ घेता आला नाही आपण केलेल्या हक्कदानाने आम्ही सतुष्ट झालों आहों आपण तालुक्यास भेट द्याल त्या वेळी आपणास मानपत्र अर्पण करून आम्हीं आपली कृतज्ञता व आपल्या-विषयींचे प्रेम व राजनिष्ठा व्यक्त करणे आमचे आद्य कर्तव्य आहे व ते जर आम्हीं कले नाहीं तर आमचे पदरी कृतघ्नतेचा दोष येणार आहे तरी, आमच्या विनतीस मान देऊन आमचे मानपत्र स्वीकारावे अशा प्रकारचे सर्व पुढारी-वर्गाचे आग्रहाचे व अगत्याचे निमत्रण नाकारणे श्रीमताना शक्य नव्हते श्रीमत राजेसाहेबाचा स्वभाव अत्यत भिडस्त असून लोकाचे मन दुखविणे त्याच्या जिवावर येते म्हणून त्यानी सर्वांना मानपत्रे स्वीकारण्यास आपली समति दिली व जमाबदीच्या मुक्कामातील समारभाच्या तारखाहि त्याच्या समतीने मुक्रर करण्यात आल्या

## राजगड जमाबंदी

ता ९ जानेवारी १९३९ इसवी रोजीं श्रीमत राजेसाहेब जमाबदीच्या दौऱ्यावर निघाले श्रीमताचे बरोबर सस्थानचे नवीन नेमलेले दिवाण रा रा के एम कुमठेकर, मुलकी व चिटणिशी खात्याचे मुख्य अधिकारी व तपासणीचे कामीं जरूर लागणारा नोकरवर्ग, याप्रमाणे लवाजमा प्रत्येक ठिकाणी असे ता ९ रोजीं सकाळी श्रीमत राजेसाहेब राजगड तालुक्यातील नसरापूर मुक्कामी

आले वाटेंत सस्थानच्या हद्दींतील सडकेलगतच्या गावच्या लोकार्नी त्या त्या ठिकाणी पुष्पहार समर्पण करून आपला आदर व निष्ठा व्यक्त केली नसरापूर येथें रयतवर्गानें श्रीमतास मेजवानी दिली दुपारी जमाबदीचे काम करण्यात आले व रयतवर्गाच्या तक्रारी समजून घेण्यात आल्या तिसरे प्रहरी ४-३० वाजता राजगड तालुक्यातील प्रजाजनातर्फे मानपत्र अर्पण करण्याचा समारभ झाला मानपत्रात सर्व रयतवर्गास नवीन घोषणेने समाधान झाल्याचे व्यक्त करण्यात आले होते त्याबद्दल श्रीमतानी आपल्या उत्तराचे भाषणात आनद व्यक्त केला व सत्कार केल्याबद्दल सर्वांचे आभार मानले या समारभाचे वेळी भोरचे वकील व प्रजापुढारी श्री ग म. पानसे, बी. ए , एलएल बी , यानी उद्बोधक भाषण केले ते म्हणाले, "ता १६ रोजां नवीन युगाला आरभ झाला आहे पहिले युगात सरकार व अधिकारी राज्य चालवीत होते आता लोकप्रतिनिधी व सरकार काम करणार आहेत सन १९२८ साली कायदे-मडळ स्थापन झाले, त्यात आता १२ प्रजेचे प्रतिनिधी बसणार आहेत व सरकारला राज्यकारभाराबाबत सल्ला देणार आहेत हा मोठा अधिकार आहे इतर सस्थानात सुधारणा जाहीर होत आहेत त्यात काहीं आपल्यापेक्षा कमी, काही आपल्यापेक्षा जास्त आहेत परतु आपल्यास मिळालेल्या सुधारणा श्रीमतानी आपण होऊन स्वसतोषाने दिलेल्या आहेत इतर बहुतेक ठिकाणी रयतेस हक्क मिळविण्यासाठी लढा लढावा लागला आहे सत्याग्रह करावा लागला आहे लाठीमार सोसावा लागला आहे ते काही न करता आपणास हक्क मिळाले म्हणून त्याना जास्त महत्त्व आहे प्रजा माझी व मी प्रजेचा, हे श्रीमतानी अनेकवार बोलून दाखविले आहे म्हणून त्याचा सत्कार करणे हे आपले कर्तव्य आहे असे समारभ खेडोपाडी झाले पाहिजेत दसऱ्या-पाडव्याप्रमाणे १६ डिसेबर हा दिवस सणाचा म्हणून सर्वांनी साजरा केला पाहिजे" त्यानीं श्रीमताचा गौरव करून सर्व प्रजाजनानी मिळालेल्या हक्काचा योग्य उपयोग करण्याबद्दल बजावले दुसरे दिवशीं श्रीमत राजेसाहेब यानी नसरापूरच्या प्रतिष्ठित लोकाना व पुढाऱ्याना मेजवानी दिली दुपारी ऑफिसच्या सरकारी इमारतींची पाहणी केली शाळा व दवाखाना याना भेटी दिल्या शाळेत मुलाना मिठाई व बक्षिसे वाटली

## प्रचंडगड जमाबंदी

ता ११ रोजीं सकाळीं प्रचडगड तालुक्याचे मुख्य ठिकाण वेले येथें श्रीमत राजेसाहेब गेले वाटेने घालण्यात आलेल्या पुष्पहाराचा त्यानीं प्रेमपूर्वक स्वीकार केला दुपारीं प्रचडगड तालुका रयतेची श्रीमताना मेजवानी झाली ४ वाजता रयतेतर्फेचे मानपत्र अर्पग करण्यात आले मानपत्रास श्रीमत राजेसाहेबानीं समयोचित उत्तर देऊन समाधान व्यक्त केले नसरापूरप्रमाणे येथेंहि श्री पानसे व रा म हे देव यानीं गौरवाचे भाषण करून रयतवर्गांना उपदेश केला ता १२ रोजीं प्रचडगड तालुक्याचे प्रतिष्ठित मडळींना श्रीमतानी मेजवानी दिली दुपारीं जमाबदीचे कामकाज, ऑफिस-तपासणी वगैरे उरकण्यात आली रयतवर्गांच्या तक्रारी समजून घेण्यात आल्या नतर शाळा व दवाखाना याची तपासणी केली शाळेत मुलाना बक्षिसें व मिठाई वाटली ता १३ रोजीं सर्व कामकाज आटोपून श्रीमताची स्वारी भोर येथें परत आली

## सुधागड जमाबंदी

भोर येथें मकरसक्रात साजरी करून श्रीमत राजेसाहेब याची स्वारी ८-१० दिवस, नेक नामदार व्हाइसरॉय याची स्वारी मुंबईस येणार असल्यामुळे तेथें गेली मुबईहून ता २७ रोजीं दुपारीं २ वाजता स्टीम लॉचने निघून धरमतर येथें ५ वाजता येऊन नागोठण्यावरून सायकाळीं मुक्कामास श्रीमत राजेसाहेब सर्व मडळींसह सुधागड तालुक्याचे मुख्य ठिकाण पाली येथे गेले धरमतर येथें कुलाबा जिल्ह्याचे कलेक्टर मि इ. गवान-टेलर हे श्रीमताच्या भेटीस आले होते नागोठणे येथे लोकलबोर्डाने श्रीमताना पानसुपारी केली बोर्डाचे प्रेसिडेन्ट रा सि वि टिळक हे श्रीमताना नेण्यास मुबईस आले होते, व स्टीम लॉचमध्ये बरोबर होते पाली येथे ता २७ जानेवारी ते १ फेब्रुवारीपर्यंत श्रीमताचा मुक्काम झाला ता २८ रोजीं खजिना-तपासणी, जमाबदी, शाळा-तपासणी व गावातील २ पानसुपाऱ्या झाल्या येथेंहि रयतवर्गांच्या तक्रारी व अडचणी काय आहेत त्या समजावून घेण्यात आल्या दुपारीं तालुक्यातील प्रतिष्ठित लोकाना श्रीमतानीं मेजवानी दिली ता २९ रोजीं तालुक्याचे रयतेने श्रीमताना मेजवानी दिली दुपारीं ४ वाजता तालुका-सभेचे मानपत्र अर्पण करण्यात आले श्रीमतानीं

मानपत्रास समयोचित उत्तर दिले. मानपत्रसमारभाचे वेळीं आभार मानताना श्री. रा दादासाहेब साने म्हणाले, " श्रीमत राजेसाहेब यानीं राज्यसूत्रे हातीं घेतल्यापासून पुष्कळ गोष्टी केल्या आहेत. अधिकारसूत्रे हातीं घेतल्यास आज १६ वर्षे झालीं या सोळा वर्षांत त्यानीं काय केले असा प्रश्न कोणी करील तर त्याने षष्ट्यब्दिपूर्तिसमारभाचे वेळीं जो मानपत्राचा वर्षाव झाला त्याचे तेरीज व आढावा काढावा, म्हणजे श्रीमत राजेसाहेब यानीं काय केले हे त्यास दिसून येईल मिळालेल्या हक्कामुळे तालुका-सभेचे पोट भरले असे नाहीं, आगखी जास्त मागण्या ती करणारच श्रीमत राजेसाहेब यानी जें दिले आहे त्याबद्दल त्याचे आभार मानणे जरूर आहे म्हणून मी त्याचे आभार मानतो "
ता ३० रोजीं पाली येथील एक प्रमुख कार्यकर्ते रा रा बापूसाहेब लिमये यानीं श्रीमतास मेजवानी केली दुपारीं ऑफिसे व दवाखाना याची पाहणी करण्यात आली सुधागड तालुक्यात पेहडली या गावीं पुणे येथील लाकडाचे व्यापारी व सस्थानचे जगल-कॉट्रॅक्टर व्यवसायविभूषण रा शकर नाना करपे यानीं श्रीमताना ॲटहोम पार्टी दिली या पार्टीस श्री रा रा तात्यासाहेब केळकर आले होते. श्रीमत राजेसाहेब यानीं श्री करपे यानीं केलेल्या सत्काराबद्दल थोडक्यात समाधान व्यक्त केल्यावर श्री रा रा तात्यासाहेब केळकर म्हणाले, " श्रीमताची स्वारी हल्लीं दौऱ्यावर असल्यामुळे प्रत्येक ठिकाणी असेच समारभ होत आहेत असे मी ऐकतो प्रत्येक ठिकाणीं श्रीमत राजेसाहेबाचा सत्कार होत असेल यात शका नाही आपला हिंदु धर्म आहे हिंदु धर्मांत राजधर्म व प्रजाधर्म याचीं बीजें इतकीं खोल गेली आहेत कीं, तीं कधींहि नष्ट होणार नाहींत दोघेंहि ते धर्म चागल्या प्रतीचे जाणतात सस्थाने राहावींत, प्रतीक राहावे, सस्था राहाव्यात असे म्हणणारापैकीं मी एक आहे श्रीमताच्या स्वागताचे औत्सुक्य, त्यात नुकत्याच झालेल्या घोषणेमुळे लोकाना वाटणारा आनद स्वागतात दृग्गोचर होत आहे सुधारणा देणे म्हणजे राजधर्म व प्रजाधर्म याचा मेळ घालणे. काल पालीस समारभ झाला, त्या वेळीं देण्यात आलेल्या मानपत्रात मी म्हणत आहे त्याप्रमाणे उल्लेख झालेला आहे असे समजते लोकाच्या अपेक्षेप्रमाणे सुधारणा त्वरित अमलात याव्यात, म्हणजे त्यात काहीं सुधारणा करणे जरूर आहे कीं काय ते यजमानसाहेबास

पाहण्यास सापडेल हत्तीचे पदात जशीं सर्व पदे आहेत तशीं राजपदात सर्व पदे आहेत त्यात सर्वांचा समावेश होतो ”

ता ३१ रोजीं दुपारीं श्रीमतानी पाली येथील समाजसेवासघ व लायब्ररी या सस्थाना भेट दिली व तेथें कै प्रो हरि गोविंद लिमये व रा रा केशव दाजी पुराणिक याच्या छायाचित्राचे अनावरण केले या समारभास प्रो धोंडो केशव ऊर्फ अण्णासाहेब कर्वे, प्रो हरिभाऊ लिमये याचे स्नेही असल्याने, मुद्दाम आले होते त्यानीं त्याचे गुणवर्णनपर भाषण केले ते म्हणाले, “ आज येथें येण्याचीं अनेक कारणे आहेत श्रीमत राजेसाहेब याचा आमचे सस्थावर लोभ आहे तेव्हा त्याच्या भेटीचा लाभ होईल हे एक कारण आहे प्रो हरिभाऊ लिमये याना आमचे सस्थाबद्दल अतिशय कळकळ वाटत असे ” याच दिवशीं शेतकरीहितवर्धक सघ व हरिजनसेवकसघ या सस्थाना श्रीमतानीं भेटी दिल्या व त्या सस्थेच्या पालीच्या हरिजन वस्तीत जाऊन पानसुपारीचा स्वीकार केला पाली हरिजनसेवकसघ व पाली समाज-सेवासघ या सस्थाना दिलेल्या भेटीच्या वेळी भाषणे करून प्रत्येकी रु २०० श्रीमतानीं देणगी म्हणून दिल्याचे जाहीर केले हरिजन सेवक सघाच्या या पान-सुपारीकरिता रोह्याचे मामलेदार श्री रा घाटकाबळे (हरिजन) आले होते, त्यानी भाषण केले ते म्हणाले, “हरिजनाचा उद्धार कसा होईल ते बोलून दाखविण्याचे व त्याबद्दल जास्त वाटाघाट करण्याचे कारण नाहीं म. गाधीनी हे कार्य हातीं घेतले आहे त्यानी ‘हरिजन’ नावाचे वर्तमानपत्र काढून हरिजनाच्या उद्धाराचे कार्य सुरू केले आहे त्यामुळे त्याचा उद्धार होईल असे आता वाटू लागले आहे हरिजनवस्तींत श्रीमत राजेसाहेब याची स्वारी येणे शक्य नव्हते त्यानी आज येथे येऊन भेट दिली आहे भोरास हरिजनाचेहि मानपत्राचा त्यानी स्वीकार केला आहे याबद्दल श्रीमताचे आम्ही फार आभारी आहोंत श्रीमतानीं आताच रु २०० ची मदत जाहीर केली आहे, याबद्दल आम्ही त्याचे आभारी आहोंत येथे श्रीयुत बापूसाहेब लिमये कळकळीने हरिजनाचे कार्य करीत आहेत अत करणपूर्वक ते हे काम करीत आहेत ” षष्ट्यब्दिपूर्तीच्या वेळी पाली येथील समाजसेवासघाचे सेक्रेटरी रा ल के भावे, वकील, यानी आपले ‘ वैवाहिक जीवन ’ नावाचे पुस्तक श्रीमताना अर्पण केले होते, त्याबद्दल त्याना श्रीमतानी

रु ५० परितोषिक म्हणून दिले ता १ फेब्रुवारी रोजी दुपारी भोजनोत्तर ३ वाजता पालीहून निघून वाटेतील गावातील पानसुपाऱ्याचा स्वीकार करीत करीत श्रीमत राजेसाहेब कर्जत येथे येऊन रेल्वेने सायकाळी ८–३० वाजता पुण्यास परत आले

## विचित्रगड जमाबंदी

यानतर ७-८ दिवस श्रीमतानीं पुणे येथेंच मुक्काम केला ता ९ रोजी ते भोरास आले ता १० रोजीं दुपारी विचित्रगड तालुक्याचे मुख्य ठिकाण शिरवळ येथें श्रीमत राजेसाहेब जमाबदीकरिता गेले ता १० रोजी ४ वाजता शिरवळ येथें पोहोचल्यावर ४-३० वाजता त्याना रयतेतर्फे मानपत्र अर्पण करण्यात आले या समारभाच्या वेळी विचित्रगड तालुक्यातील सुमारे १२० गावाचे पुष्पहार श्रीमताना समर्पण करण्यात आले येथें रा हरि सखाराम देशपाडे, रा सदाशिव कृष्ण शिंदकर व रा काशीनाथ ठकुजी जाधव यानी गौरवपर भाषणे केलीं रा हरी सखाराम देशपाडे व रा शिंदकर याचे भाषणातील महत्त्वाचा भाग परिशिष्ट २२ मध्ये दिला आहे तसेच श्रीमताचे हस्ते एका आम्रवृक्षाचे आरोपण करण्यात आले शिरवळ येथील हेडमास्तर रा. रा ल बावडेकर यानीं या समारभात पद्यात्मक श्रीशकराजी नारायण याचे अल्प चरित्र अर्पण केले व रा ग बा माडके यानी षष्ट्यब्दिसमारभात कविता अर्पण केल्या होत्या, त्याबद्दल त्याना अनुक्रमे रु ३५ व जरीकाठी उपरणे अशीं पारितोषिके देण्यात आली ता ११ रोजीं सकाळी तालुक्याच्या खजिन्याची तपासणी झाली दुपारी जमाबदी झाल्यावर, प्रजेच्या तक्रारी ऐकून घेतल्यावर दवाखाना व शाळेस भेट दिली शाळेत मुलाना बक्षिसे व मिठाई वाटली रा रा स कृ शिंदकर यानी श्रीमतास चहापार्टी दिली ता १२ रोजी श्रीमतानी प्रतिष्ठित नागरिकाना मेजवानीस बोलाविले होते दुपारी अमलदाराच्या पानसुपाऱ्या, सरकारी इमारतीची पाहणी व सर्व ग्रामदेवाचे दर्शन झाल्यावर सायकाळी मुक्कामास श्रीमत राजेसाहेब भोरास आले

## पौनमावळ जमाबंदी

भोर येथें २ दिवस मुक्काम करून ता १४ फेब्रुवारी रोजी श्रीमत राजेसाहेब पुण्यास गेले ता १६ रोजी सकाळीं पुण्याहून निघून श्रीमत

राजेसाहेब पौनमावळ तालुक्यातील पिरगूट या गावीं गेले या ठिकाणीं तालुक्याचे मुन्सफ कोर्ट आहे येथें श्रीमताचे आगमन झाल्यावर सुमारें १० पुष्पहार श्रीमतास अर्पण करण्यात आले दुपारीं श्रीमगलमूर्तीचे देवालयात सर्व गावकऱ्यानीं श्रीमतास मेजवानी दिली भोजनोत्तर सायकाळीं ५-३० वाजता पिरगूट रहिवाश्यातर्फे श्रीमताना मानपत्र अर्पण करण्यात आले. या समारभापूर्वी 'सस्थानी स्वराज्य' पत्राचे सपादक श्री रा. वामनराव पटवर्धन यानीं ता १४ रोजीं इहलोकची यात्रा सपविली होती मानपत्रास उत्तर दिल्यावेळीं आपल्या भाषणात श्रीमतानीं वामनरावाच्या सस्थानविषयक कामगिरीचा गौरवपर उल्लेख करून त्याच्या निधनाने आपणास फार दु ख झाल्याचे सागितले या समारभास केसरीच्या सपादक मडळापैकीं रा दा वि गोखले व रा वा कृ भावे हे उपस्थित होते त्यानीं श्रीमताच्या घोषणेस पसतीदर्शक भाषणे केलीं रा दा वि गोखले याचे भाषण परिशिष्ट २२ मध्ये दिले आहे

ता १७ रोजीं पिरगूट येथील खजिना-तपासणी झाली दुपारीं श्रीमतानीं प्रतिष्ठित नागरिकाना मेजवानी दिली दुपारीं शाळेतील मुलाना बक्षिसें वाट-ल्यावर श्रीमतानीं मुठेखिंडीपर्यंत नवीन तयार झालेली सडक पाहिली वाटेत उरवडे गावीं सरदार पोतनीस याच्या पानसुपारीचा स्वीकार केला. मुठेखिंडींत मुठेखोऱ्यातील १४ गावातील इनामदारवर्गातर्फे श्रीमतास मानपत्र अर्पण करण्यात आले ता. १८ रोजीं सकाळीं श्रीमत राजेसाहेब पिरगूटहून कोळवण येथें गेले वाटेने सुमारें १७–१८ गावाच्या लोकानीं केलेल्या पानसुपाऱ्याचा स्वीकार केला कोळवण येथें पोहोंचल्यावर पौनमावळ रयतेतर्फेच्या मेजवानीचा श्रीमतानीं स्वीकार केला. दुपारीं जमाबदीचे काम केले प्रजेच्चीं गाऱ्हाणीं ऐकून घेऊन सहानुभूतिपूर्वक विचार करण्यात येईल असें त्याना सागितले नतर सुमारे ४-३० वाजता पौनमावळ तालुक्यातील रयतेचे मानपत्र अर्पण करण्यात आले मानपत्रास उत्तर देताना याहि ठिकाणीं श्रीमतानीं कै. रा. रा. वामनराव पटवर्धन याचे निधनाबद्दल दु ख प्रदर्शित केले.

या समारभाच्या वेळीं श्री. रा ग मा पानसे, वकील, रा. रा. दामोदर बाळकृष्ण पोतनीस व रा गोपीनाथ बाळकृष्ण पोतनीस याचीं श्रीमताच्या

गौरवपर भाषणे झालीं रा दामूअण्णा पोतनीस याचे भाषणातील महत्त्वाचा भाग परिशिष्ट २२ मध्ये दिला आहे रात्रीं सर्व पाहुणेमडळी व नागरिक याना श्रीमतानीं मेजवानी दिली सकाळीं तालुक्यातील खजिन्याची तपासणी झाली दुपारीं श्रीमतानीं शाळेस भेट दिली सायकाळीं कोळवण येथील रघुनाथराव स्वयसेवक सघास भेट देऊन सघाने केलेले खेळ पाहिले ता २० रोजीं सरकारी इमारतीची पाहणी केली दुपारीं अमलदारानीं केलेल्या पानसुपाऱ्याचा स्वीकार करून श्रीमत राजेसाहेब कोळवणाहून पुण्यास येण्यास निघाले. वाटेत पौड येथें रा रा विश्वनाथ अनत करमरकर, भोर कायदेमडळाचे सभासद, यानीं श्रीमताना चहापार्टी केली पिरगूटनजीक कासार-अबुली गावचे इनामदार रा राइरकर याच्या पानसुपारीचा स्वीकार करून श्रीमताची स्वारी पुण्यास सायकाळीं ७ वाजता परत आली

## कुरण

पौनमावळ तालुक्याची जमाबदी करून परत आल्यावर कोल्हापूर व दक्षिणेतील सस्थानाचे रेसिडेटसाहेब भोर येथें येणार असल्यामुळे त्याकरिता श्रीमत राजेसाहेब भोर येथें ७-८ दिवस राहिले नतर श्रीमतानीं ता ३ मार्च रोजीं अबेगाव व मोसेखोरें या भागातील कुरण या गावीं जाऊन तेथील ५९ गावातर्फेच्या लोकानीं दिलेल्या मेजवानीचा व मानपत्राचा स्वीकार केला कुरण येथें जाण्यास सोयीचा रस्ता नाहीं. गाव डोंगराळ प्रदेशात आडवळणी असल्यामुळे नावेतून जावे लागते त्याप्रमाणे श्रीमत राजेसाहेब हे खडकवासला येथें नावेत बसून १४ मैल पाण्यातून प्रवास करून कुरण येथे गेले दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे गेल्या सुमारें ७५ वर्षांत या भागात भोरच्या राजपुरुषापैकीं हा वेळपर्यंत कोणीच गेले नव्हते तेव्हा श्रीमत राजेसाहेबाच्या आगमनाने तेथील गरीब शेतकरी रयतेस अत्यत आनद झाला व त्यानीं श्रीमताचे स्वागतहि मोठ्या प्रेमाने केले या मानपत्राचे महत्त्व विशेष होते पूर्वीं याच मोसेखोऱ्यातील लोकानीं बडाळी माजविली होती व त्यामुळे श्रीमत राजेसाहेबाना फार त्रास झाला या खोऱ्यातील लोकाच्या अत्याचारी चळवळीमुळेच श्रीमत राजेसाहेबाच्या प्रगतिपर धोरणास काही काळ प्रतिबध झाला. वरील खोऱ्यातील लोकाना जेव्हा आपली दिशाभूल

झाल्यामुळे आपल्या हातून चुका झाल्या हें कळून आले तेव्हा त्याना पश्चात्ताप झाला श्रीमत राजेसाहेबानी नवीन सुधारणाची घोषणा केली तेव्हा या भागातील लोकाना आपल्या हातून पूर्वी घडलेल्या प्रमादाबद्दल वाईट वाटून त्यानी श्रीमत राजेसाहेबाना आपल्या डोंगराळ भागात येऊन दर्शनाचा लाभ देण्याबद्दल विनति केली या भागातील लोकाच्या मनोवृत्तीत पालट झालेला पाहून श्रीमत राजेसाहेबाना समाधान वाटले, म्हणून या अडचणीच्या ठिकाणी जाऊन श्रीमत राजेसाहेबानी त्याच्या आदरातिथ्याचा व मानपत्राचा स्वीकार केला या मानपत्रसमारभाच्या वेळीं प्रास्ताविक भाषण रा दादासाहेब बाळासाहेब पासलकर यानीं केले रा माधव बाळकृष्ण देशपाडे यानीं मानपत्र वाचून अर्पण केले आणि श्रीमताचे भाषण झाल्यावर रा म हे देव व रा वि र ठकार यानीं गौरवपर भाषणे केली समारभ झाल्यावर श्रीमत राजेसाहेब पुण्यास परत आले

## प्रकरण २७ वे

# श्रीमंत राजेसाहेब यांनीं आपल्या कारकीर्दीत केलेल्या सुधारणा

श्रीमत राजेसाहेब १९२२ च्या जुलैमध्ये गादीवर आले ऑगस्टच्या १८ तारखेस राज्यारोहणसमारभ झाला त्या वेळेपासून आतापावेतो त्याच्या कारकीर्दीस १७ वर्षे पूर्ण झाली सतरा वर्षांच्या या कारकीर्दीत त्यानी अनेक सुधारणा सर्वांगीण प्रगतीच्या केल्या त्यानी कोणत्या खात्यात काय काय सुधारणा केली त्याचे सविस्तर वर्णन त्या त्या खात्याच्या वर्णनात देण्यात आलेच आहे तथापि वाचकाच्या सोयीकरिता व ज्याना सर्व सविस्तर हकीकत वाचण्यास पुरेसा अवधि नाही, त्याचेकरिता सक्षिप्त समालोचन या प्रकरणात करण्याचे योजिले आहे

श्रीमत राजेसाहेबानीं केलेल्या सर्व सुधारणाचे समालोचन खालील मुख्य आठ शीर्षकात करण्यात आले आहे

### १ प्रजाजनांच्या फार दिवसांपासूनच्या न्याय्य तक्रारीचा निकाल

या मथळ्याखालीं पुढील प्रमुख गोष्टींचा समावेश होतो —

( क ) लग्नटक्का, पाटदाम, घरपट्टी, म्हैसपट्टी इत्यादि खेड्यातील गरीब रयतेपासून बरेच दिवसापासून वसूल करण्यात येणारे विषमतादर्शक कर माफ केले या करमाफीमुळे सस्थानचे उत्पन्नात एकदर रुपये १२,००० दरसाल घट सोसावी लागली

( ख ) सुधागड तालुक्यातील रयतेच्या मालकीच्या जमिनीतील सोळा प्रकारची झाडे सरकारी मालकीची ठरविण्यात आली होती त्या झाडावरील हक्क सोडून दिला त्यामुळे सरासरीने वार्षिक रु ३५०० उत्पन्न कमी झाले

( ग ) सभाबदीचा कायदा रद्द केला

( घ ) सरकारी फॉरेस्ट राखण्यात आल्यामुळे राजगड तालुक्यातील बारा गावाचे लोकाचे घराशी सरकारी जगलच्या हद्दी येऊन भिडल्या, त्यामुळे

लोकाची अतिशय गैरसोय झाली आणि रयतलोकानी सरकारकडे तक्रार केली तेव्हा त्याची तक्रार न्याय्य असल्याबद्दल खात्री झाल्यामुळे सरकारी जगलातील ५१४ एकर जमीन लोकाचे उपयोगाकरिता देण्यात आली

( ड ) हिरडा फळे लिलावाने विकण्याची पद्धत होती ती बद करून दर खडीमागे रु २ सरकारी स्वामित्व ( रॉयल्टी ) घेण्याची नवीन पद्धत सुरू केली या पद्धतीने कोणाहि शेतकऱ्यास अगर धदेवाईक इसमास खाजगी अगर सरकारी फॉरेस्टातील हिरडा फळ गोळा करून सरकारी स्वामित्व ( रॉयल्टी ) खडीमागे रुपये २ देऊन विक्रीस नेण्याची सवलत मिळाली ही पद्धत चालू आहेच तथापि हिरड्यास असावा तितका भाव नसल्यामुळे शेतकऱ्यास वरील पद्धतीप्रमाणे धदा करणे किफायतशीर होईना व हिरडा फळ पडून राहू लागले तेव्हा सस्थानातील रयतेपासून हिरडा खरेदी करून तो विक्रीस सरकारतर्फे बाहेरगावीं पाठविण्याची नवीन पद्धति दरबारने सुरू केली शेतकऱ्यास धदा नसल्यामुळे त्याची उपासमार होते ही गोष्ट लक्षात घेऊन, वरील पद्धतीने सरकारतर्फे हिरडा विक्रीचा प्रयत्न प्रयोगादाखल गेलीं दोन वर्षे करण्यात येत असून, ही पद्धत फायदेशीर होऊन शेतकऱ्याना रिकाम्या वेळापुरता धदा होईल असे वाटत आहे ही नवीन पद्धत सुरू करण्यात आली तरी धदेवाईक इसमास अगर सस्थानातील कोणाहि शेतकऱ्यास सस्थानास पूर्वपद्धतीप्रमाणे रॉयल्टी देऊन स्वतत्रपणे हिरडा सस्थानबाहेर नेऊन विकण्यास परवानगी ठेवण्यात आलेली आहे

( च ) प्रचडगड तालुक्यातील काहीं खेडयातून खासगी जमिनीतील जाभळाच्या झाडावर सरकारची मालकी होती ती सोडून दिली

( छ ) बदरीमालावरील जकात व शेतीच्या उपयोगी जनावरावरील गुरचरण फी माफ केली

( ज ) सस्थानातील शाळा, कचेऱ्या, धर्मशाळा, इत्यादि ठिकाणी पाळण्यात येणाऱ्या अस्पृश्यतेचे उच्चाटन केले

( झ ) कै रावसाहेबाचे कारकीर्दींत अपुरे राहिलेले फॉरेस्ट सेटलमेटचे काम श्रीमताचे कारकीर्दींत पुरे करण्यात आले या कामाकरिता ब्रिटिश

हिंदुस्थानातील एका सेवानिवृत्त अधिकाऱ्याची नेमणूक करण्यात आली होती त्याने आपले काम सन १९३७ अखेर पुरे केले

वरील सेटलमेन्टच्या कामाबाबत लोकाच्या तक्रारी आल्यावरून षष्ट्यब्दपूर्ति सभासदाच्या वेळी नवीन जगल कमिटी नेमण्याचे जाहीर केले ही कमिटी लवकरच नेमण्यात येणार आहे

## २ राज्यकारभाराच्या सर्व शाखांची व संस्थानांतील सर्व खात्यांची सर्वांगीण सुधारणा

ह्या शीर्षकाखालीं पुढे दिलेल्या गोष्टींचा समावेश करण्यात आला आहे सस्थानच्या नोकरींत वाटणारी अनिश्चितता काढून टाकण्यात आली प्रत्येक खात्याच्या मुख्य जागेवर भरपूर पगार देऊन माहितगार व लायक इसम अधिकारी म्हणून नेमले या गोष्टी साध्य करण्यासाठी पुढील गोष्टी केल्या —

( क ) पेन्शन, ग्रॅच्युइटी व भाडे-भत्त्याचे नियम जरूर त्या दुरुस्त्या करून लागू करण्यात आले

( ख ) पगार, बढत्या आणि नोकरींतील वाव यात सुधारणा घडवून आणली. पगारवाढ केल्यामुळे दरसाल बराच खर्च वाढला

( ग ) सस्थानात स्वतत्र हायकोर्ट स्थापन केले डिस्ट्रिक्ट आणि सेशन्स जज्जाची कामें व डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटचीं कामें स्वतत्र व्यक्तींकडे सोंपवून दिवाणी आणि फौजदारी कामें न्यायाने, नि पक्षपातीपणाने यथायोग्य पार पडतील अशी सोय केली. सस्थानात हायकोर्टास वर्षभर सतत पुरेल इतके काम नसल्याने त्या कामाकरिता दरसाल एक महिना मुदतीने ब्रिटिश हद्दींतील फर्स्टक्लास सबजज्जाच्या दर्जाच्या इसमाची नेमणूक करण्यात येऊन त्याच्याकडून हायकोर्टचे काम करून घेण्यात येते सन १९३९ पासून हे काम दिवाणाचेकडे सोपविण्यात आले आहे

(घ) पोलिसखात्यावर ब्रिटिश सरकारचे नोकरीतील पेन्शनर लायक अधिकारी नेमून त्याचे नेतृत्वाखालीं पोलिसखात्याची सर्वांगीण सुधारणा केली आणि कवाईत आणि शिस्त याचा समावेश करण्यात आला

(ड) काहीं चळवळ्या पुढाऱ्यानीं प्रचडगड तालुक्यातील रयतेस फितवून अराजक चळवळ सुरू केली ती चळवळ मोडून टाकून सस्थानात शातता प्रस्थापित करण्याकरिता आडमाळ येथें नवीन पोलिस ठाणे बसविले

या सर्व खात्यातील सुधारणानीं सस्थानच्या खर्चांत एकूण जवळ जवळ १। लक्षापर्यंत वाढ झाली आहे तथापि त्यायोगे रयतेच्या सुखात व सस्थानच्या प्रगतींत बरीच भर पडली आहे

## ३. संस्थानच्या राज्ययत्राचा एक विभाग म्हणून उपयुक्त प्रातिनिधिक संस्थांची स्थापना

(क) या सदरात एक्झिक्यूटिव्ह कौन्सिल, भोर सस्थान कायदे-मडळ, तालुका लोकलबोर्डस्, भोर म्युनिसिपॅलिटी, शिरवळ नोटिफाइड एरिया कमिटी, पाली सॅनिटरी बोर्ड वगैरे लोकप्रतिनिधियुक्त सस्थाचा अतर्भाव होतो श्रीमत राजेसाहेबानीं आपल्या खाजगी उत्पन्नातून रु २०,००० कायदे-मडळाचे हवालीं आणि तालुका लोकल बोर्डाकडे रु २१,३२५ इतक्या रकमेच्या ३।। टक्के व्याजाच्या सरकारी प्रॉमिसरी नोटा खरेदी करून दिल्या आहेत या रकमाच्या व्याजाचा विनियोग त्या त्या सस्थानी आपल्या अधिकारात लोकोपयोगी कार्यांकडे करावयाचा आहे तसेच भोर म्युनिसिपॅलिटी रु ३२५०, शिरवळ नोटिफाइड एरिया कमिटी रु ५०० आणि पाली सॅनिटरी बोर्ड रु ५०० याप्रमाणे दरसाल देणग्या देण्यात येतात सन १९३८ च्या जूनपासून पाली येथें नोटिफाइड एरिया कमिटी स्थापन करण्यात आली आहे हे पहिले कौन्सिल १९२८ साली स्थापन केले त्याची त्रैवार्षिक मुदत १९३१ मध्ये सपल्यावर दुसऱ्या वेळीं नवीन कौन्सिल बनविण्यात आले, तेव्हा त्यात पुढील तीन प्रगतिपर तत्त्वाचा समावेश केला भोर म्युनिसिपालिटीच्या लोकनियुक्त प्रतिनिधींपैकी एक व पाच तालुका लोकल बोर्डांतर्फे एक एक प्रतिनिधि निवडून कायदे-मडळावर पाठविण्याचा हक्क देण्यात आला लोकनियुक्त उपाध्यक्ष देण्यात आले तालुका लोकल बोर्डाना बिनसरकारी सभासदाचे बहुमत आणि बिनसरकारी उपाध्यक्ष बोर्डांच्या सुरुवातीपासूनच देण्यात आले आहेत कायदेमडळाची आणि लोकलबोर्डांची मुदत नियमाने तीन वर्षांची ठरविण्यात आली आहे

षष्ट्यब्दिपूर्तीच्या वेळीं केलेल्या घोषणेने निवडणुकीचे तत्त्व लागू करण्यात येऊन २१ सभासदापैकी १२ लोकनियुक्त सभासद प्रत्यक्ष मतदानपद्धतीने नेमण्यात येणार आहेत कायदे-मडळाचा अध्यक्ष बिनसरकारी नेमलेला आणि उपाध्यक्ष लोकनियुक्त राहणार आहे कायदेमडळाची मुदत पाच वर्षाची राहणार आहे

कौन्सिलपुढे खाजगी खर्चाच्या रकमेखेरीज बाकी बजेट चर्चेकरिता ठेवण्यात येणार आहे, व त्यावर कपातीच्या सूचना आणता येतील मात्र त्या दरबारवर बधनकारक असणार नाहीत

भोर म्युनिसिपालिटीत $\frac{2}{3}$ सभासद लोकनियुक्त व अध्यक्ष व उपाध्यक्ष लोकनियुक्त देण्यात आले

शिरवळ-पाली येथील नोटिफाइड एरिया कमिटीत लोकनियुक्त सभासद $\frac{2}{3}$ व त्याचा अध्यक्ष दरबारने नेमलेला अधिकारी ठेवण्यात येणार आहे

तालुका लोकल बोर्डात ५ सभासद लोकनियुक्त व ४ सरकारनियुक्त आणि अध्यक्ष सरकारी अधिकारी व उपाध्यक्ष लोकनियुक्त देण्यात येणार आहेत

कायदेमडळाने आपल्या जबाबदारीच्या कक्षेत खालील महत्त्वाचे कायदे पास करून सामाजिक सुधारणाप्रगति करण्याच्या कामी फार मदत केली आहे

(१) हिदु-पद्धतीच्या दत्तकाच्या कायद्यात सुधारणा, (२) हिंदु विधवाचा वारसाहक्क व पोटगीहक्क आणि वारसाहक्काचे कायद्यात दुरुस्ती, आणि (३) बालविवाहप्रतिबधक कायदा संस्थानास लागू करण्याबाबत

(ख) श्रीमत राजेसाहेब यानी आपल्या राज्यकारभारविषयक धोरणाचे ध्येय 'जबाबदारीची राज्यपद्धति' असल्याचे जाहीर केले आहे भोर संस्थानच्या सरकारचा कायदा ( Government of Bhor State Act ) पास करून तो संस्थानात लागू केला जबाबदार राज्यपद्धतीचे ध्येय साध्य करण्याकरिता संस्थानात वरील प्रातिनिधिक संस्था स्थापन करण्यात आल्या आहेत 'जबाबदार राज्यपद्धति' हे ध्येय असल्याचे पुन्हा षष्ट्यब्दिपूर्तीचे वेळीं जाहीर करून लोकनियुक्त मत्र्याकडे लोकोपयोगी खाती ५ वर्षांनी देण्यात येतील असे जाहीर केले

(ग) श्रीमत राजेसाहेब सस्थानच्या उत्पन्नातून उत्पन्नाच्या योग्य प्रमाणात ठराविक रक्कम दरसाल खाजगी खर्चाकरिता घेतात

(घ) मुबई ग्रामपचायतीचा कायदा सस्थानच्या दृष्टीने जरूर त्या सुधारणा करून तो सस्थानला लागू केला आहे

## ४. लोकोपयोगी खात्यांत घडवून आणलेल्या सुधारणा

(क) नद्यावरील पूल —भोर येथें निरा नदीवर सुमारे रु १,४६,००० खर्च करून १९३३ साली पूल बाधला श्रीमत राजेसाहेब याच्या द्वितीय पत्नी कै श्री सौ राणीसाहेब याच्या स्मरणार्थ या पुलास ‘ लक्ष्मीबाई ब्रिज ’ असे नाव देण्यात आले आहे सुधागड तालुक्यात पेहेडली गावी तेथील ओढ्यावर रु ९००० खर्च करून नवीन पूल बाधला आहे वेले व अबवणे येथें एक पूल व एक कॉजवे असे तयार केले आहेत त्यास खर्च रुपये ७००० झाले आहेत तसेच पौनमावळ तालुक्यात चाले गावीं नवीन पूल बाधला त्यास रुपये ४२०० खर्च लागला अबवडे येथें असलेल्या ओढ्यावर रु १०,००० खर्च करून एक झुलता पूल बाधून त्यास कै श्री सौ जिजीसाहेब याचे स्मरणार्थ ‘ जिजीसाहेब झुलता पूल ’ असे नाव देण्यात आले आहे नसरापूर येथील शिवगगा नदीवर रु १८६०० खर्च करून नवीन पूल बाधण्याचे काम चालू आहे मोसे खोऱ्यात दळणवळणाच्या सोयीकरिता एक साकू बाधण्यात येणार आहे

(ख) जुन्या रस्त्याची दुरुस्ती आणि नव्या रस्त्याची बाधणी — महाड-पढरपूर रस्त्यावर वरध्या घाटाचा सुमारे ५ मैल भाग नादुरुस्त झाला होता तो रु २०,००० खर्च करून दुरुस्त केला सुधागड तालुक्यात पालीपासून नागोठण्यापर्यंत रस्ता बाधण्याचे कामी पाली-नागोठणा रोड कमिटीस रु २५,००० बिनव्याजी कर्जाऊ दिले

(ग) नवीन दवाखान्याचे उद्घाटन —श्रीमत राजेसाहेबानी सस्थानातील सर्व तालुक्यात औषधोपचाराची व्यवस्था करण्याकरिता पाली, नसरापूर, वेले आणि कोळवण या ठिकाणीं नवीन दवाखाने सुरू केले पुणे येथील शेठ ताराचद रामनाथ आयुर्वेदिक धर्मार्थ रुग्णालयास रु १२,००० मदत

केली आहे या रुग्णालयाच्या चालकानीं संस्थानच्या रयतेच्या सोयीकरिता दोन रुग्णशय्या कै श्री सौ जिजीसाहेब याच्या स्मरणार्थ ठेविल्या आहेत पुणे येथील किंग एडवर्ड मेमोरिअल संस्थेस रु ५०,००० देणगी दिली त्या संस्थेच्या कार्यकारी मंडळावर संस्थानचा एक प्रतिनिधी घेण्यात आला असून संस्थानचे रुग्णाची औषधोपचाराची सोय करण्यात आली आहे

माजी बादशाह पाचवे जॉर्ज याच्या कारकीर्दीची रौप्य ज्युबिली ता ६ मे १९३५ रोजीं झाली ज्युबिलीच्या स्मरणार्थ भोर येथील दवाखान्याचे किंग जॉर्ज दि फिफ्थ सिल्व्हर ज्युबिली हॉस्पिटल बनविण्यात आले त्याच्या नित्य खर्चाकरिता कायमनिधि म्हणून श्रीमंत राजेसाहेब यानी संस्थानचे उत्पन्नातून रु १०,००० व स्वत चे खाजगी उत्पन्नातून रु १०,००० देणगी देऊन या रकमेच्या व्याजातून रुग्णालयाचा खर्च भागविला जावा अशी तजवीज केली दवाखान्याची पूर्वीची दरसालचे खर्चाची रक्कमहि हॉस्पिटलकडे दरसाल पूर्वी-प्रमाणेच देण्यात येत असते

(घ) १९३३ सालीं संस्थानातील वेड्याचेकरिता वेडयाचे इस्पितळाची सोय श्रीमंत राजेसाहेब यानी केली आहे

(ङ) शैक्षणिक सुधारणा — सर्व संस्थानातील प्राथमिक शिक्षण मोफत केले असून दुय्यम शिक्षणास १२ आण्यापासून जास्तींत जास्त रु १।। रुपया-पर्यंत फी ठेविली आहे दुय्यम शिक्षणक्रमात विद्यार्थ्यांना उत्तेजनार्थ प्रत्येक वर्गांत हुशार विद्यार्थ्यांकरिता शिष्यवृत्त्याहि ठेवण्यात आल्या आहेत

हायस्कूलकरिता रु. ९२,००० खर्च करून नवीन इमारत बांधण्यात आली आहे या इमारतीस ‘ राजा रघुनाथराव हायस्कूल ’ असे नाव देण्यात आले आहे श्रीमंत राजेसाहेबानीं आपल्या खाजगी उत्पन्नातून रुपये २०,००० ची मदत इमारत बांधण्यास केली आहे

संस्थानच्या गरीब विद्यार्थ्यांची उच्च शिक्षणाची सोय होण्याकरिता श्रीमंत राजेसाहेबानीं शिष्यवृत्त्या ठेविल्या असून कांहीं फ्रीशिप्सहि ठेविल्या आहेत अशा चार शिष्यवृत्त्याची कायमची सोय म्हणून श्रीमंत राजेसाहेबानीं आपल्या धर्मादायाच्या रकमेतून रुपये २०,००० बाजूला काढून त्या

रकमेच्या प्रॉमिसरी नोटा खरेदी केल्या आहेत या रकमेच्या व्याजातून वरील शिष्यवृत्त्या देण्यात येतात यापैकी हरिजन विद्यार्थ्यांस उच्च शिक्षणाकरिता एक शिष्यवृत्ति राखून ठेवण्यात आली आहे शिवाय संस्थानचे उत्पन्नातून रु १०,००० सांगली येथील विलिंग्डन कॉलेजला देणगी दिली आहे या देणगीच्या मोबदल्यात डेक्कन एज्युकेशन सोसायटीने संस्थेच्या पुणे अगर सांगली येथील कॉलेजात संस्थानचे चार विद्यार्थी दरसाल उच्च शिक्षणाकरिता मोफत घेण्याची सोय केली आहे यापैकीं एक फ्रीशिप हरिजन विद्यार्थ्या-करिता राखून ठेवून त्याचे शिक्षणाची सोय केली आहे तसेच सातारा येथील आर्यांग्ल वैद्यक विद्यालय या संस्थेस रु १००० ची देणगी देऊन तिचे बदला भोरच्या एका विद्यार्थ्यास आयुर्वेदिक शिक्षण त्या संस्थेकडून मोफत मिळेल अशी सोय केली आहे

सातारा येथील देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण शिक्षण संस्थेस १००० रुपये देणगी दिली असून संस्थेच्या कार्यकारी मंडळावर संस्थानतर्फे एक प्रतिनिधि नेमण्यात आला आहे संस्थेने भोरच्या लायक गरीब विद्यार्थ्यास शिक्षणा-करिता पुस्तके वगैरेसाठी मदत देण्याचे कबूल केले आहे

संस्थानातील खाजगी शाळांना आणि वाचनालयांना देणग्या देण्या-संबंधात नियम करण्यात आले असून त्या नियमाप्रमाणे देणग्या देण्यात येतात भोर, शिरवळ येथील अशा संस्थांना व श्रीराम क्रीडाभुवन व श्री सौ गंगूताई-साहेब वाचनालय या संस्थेस दरसाल देणग्या देण्यात येतात शेवटच्या दोन संस्थांना अनुक्रमे रु १२० व रु १०० देण्यात येतात भोर येथील श्री सौ गंगूताईसाहेब पंतसचिव वाचनालयाची इमारत श्रीमंत राजेसाहेब यांनी रु २५,००० खर्च करून बांधिली आहे या वाचनालयास दोन हजार रुपये किंमतीचा आपला ग्रंथसंग्रह व काही कपाटे दिली

भोर येथील राजवाड्यात ‘पदार्थसंग्रहालय’ Palace Museum आणि ‘पॅलेस लायब्ररी’ ( Palace Library ) नवीन तयार करण्यात आली आहे

( च ) इतर लोकोपयोगी कामें ---भोर येथील म्युनिसिपॅलिटीच्या रस्त्याचे दिव्यांना व सरकारी इमारतींना व भोरच्या रहिवाश्यांचे घरगुती उपयोगाकरिता वीज-पुरवठा करण्यात आला

ग्रामोद्धाराच्या प्रश्नाकडे व लहान लहान धद्याच्या वाढीकडे विशेष लक्ष पुरविण्यात येते उत्रवली येथील ओढ्यावर गावकऱ्यानीं सहकार्याने व स्वावलबनाने पूल बाधला व त्यास श्रीमताचे हस्ते ' रामनाथ पूल ' असे नाव देण्यात आले या स्वावलबनाचे कार्यास उत्तेजनार्थ रु ४०० देणगी श्रीमत राजेसाहेब यानी दिली आहे सागली येथील उद्योगशाळेत पद्धतशीर शेतकी कशी करावी याचे आणि कोंबड्या पाळणे, दूधदुभते करणे याचे शिक्षण घेण्याकरिता दोन विद्यार्थी सस्थानतर्फे पाठविण्यात आले पुणे येथील ग्रामसुधारणा मडळाचे भादे येथील केंद्राचा उद्घाटनसमारभ करून त्याचे ग्रामोद्धाराचे कार्यास मदत म्हणून रुपये २५० ची देणगी दिली बावडे येथील ग्रामसुधारणेच्या कार्यास रु ६०० आणि पाली येथील हरिजनसेवक सघास रु २०० देणगी दिली आहे

(छ) सस्थानच्या साऱ्याचे दर नजीकच्या ब्रिटिश हिंदुस्थानातील दरापेक्षा जास्त नाहीत, तथापि दुष्काळाचे दिवसात सस्थानात सारासूट व सारा तहकुबी देण्याचे धोरण ठेविण्यात आले आहे सन १९३२–३३ सालीं जास्त प्रमाणात पाऊस पडल्यामुळे धान्याचे भाव फारच उतरले, त्यामुळे शेतकऱ्याच्या हिताकडे लक्ष देऊन उदार मनाने श्रीमत राजेसाहेबानी रु ४०,००० ची सारासूट दिली आणि सारातहकुबी रु. ८००० दिली

## ५ संस्थानचे दर्जांत वाढ

सस्थानचे राज्यकारभारात श्रीमत राजेसाहेबानीं गादीवर आल्यापासून ज्या अनेक प्रगतिपर सुधारणा केल्या त्या सर्व सुधारणावरून श्रीमताचे प्रगतिपर धोरण लक्षात घेऊन श्रीमत राजेसाहेबाना १९२७ साली ९ तोफाची वशपरपरा सलामी आणि १९३५ सालीं ' राजा ' हा वशपरपरा किताब देऊन साम्राज्य सरकारकडून त्याचा गुणगौरव केला गेला तसेच त्या सरकारकडून सस्थानच्या कारभाऱ्याना ' दिवाण ' म्हणण्याची परवानगी देण्यात आली आहे सस्थानला सर्व फौजदारी अधिकार देण्यात आलेले असून त्या योगाने सस्थानचे दर्जांत बरीच वाढ झाली आहे. दुसऱ्या सस्थानच्या रहिवाश्यानी भोर सस्थानचे हद्दीत खून केल्यास त्याची चौकशी करण्याचा अधिकार सस्थानला देण्यात आला आहे

पुढें दिलेल्या गोष्टींमुळेहि संस्थानच्या दर्जांत भर पडली आहे संस्थानचें नाव दक्षिणेतील पहिल्या प्रतीच्या सरदाराच्या यादींत होतें संस्थानाधिपतित्वाला ते कमीपणा आणणारें असल्यामुळे ते श्रीमत राजेसाहेबाच्या विनतीवरून काढून टाकण्यात आले दक्षिणेतील संस्थानाचा एक गट तयार करण्यात येऊन तीं सर्व संस्थाने कोल्हापूर येथील एजट टु दि गव्हर्नर जनरल याचे ताब्यात देऊन त्याचा मुबई सरकारशीं असलेला सबध तोडून तीं हिंदुस्थान सरकारचे प्रत्यक्ष देखरेखीखालीं देण्यात आली सन १९३५ च्या गव्हर्मेंट ऑफ इडिया ॲक्टने ए जी जी हा हुद्दा बदलून त्यास सर्व संस्थानचे रेसिडेंट असे सबोधण्यात येते या गोष्टीने दक्षिणेतील संस्थानाचा दर्जा साहजिकच वाढला आहे

या गोष्टींखेरीज आणखी तितक्याच महत्त्वाच्या अशा दोन गोष्टी आहेत या दोनहि गोष्टी श्रीमत राजेसाहेब गादीवर आल्यापासून १० वर्षांच्या आतच घडून आल्या त्या म्हणजे संस्थानचे हद्दींत भाटघर येथें हिंदुस्थानचे व्हाइसरॉय नेक नामदार लॉर्ड अर्विन याना चहापार्टी देण्याचा मान सन १९२६ सालीं प्रथमच संस्थानला मिळाला आणि हिंदुस्थानचे सर सेनापति नेक नामदार जनरल सर फिलिप चेटवुड यानीं भोरला भेट दिली भोर संस्थान लहान असल्यामुळे हिंदुस्थानचे व्हाइसरॉयसाहेब याच्या भेटीचा योग पूर्वी कधीं आला नव्हता, म्हणून वरच्या गोष्टींना महत्त्व आहे

गव्हर्मेंट ऑफ इन्डिया ॲक्ट १९३५ मधील वाटणीप्रमाणे हिदुस्थानच्या सयुक्त राज्यघटनेतील हिन्दुस्थान सरकारच्या मध्यवर्ति कनिष्ठ व वरिष्ठ विधिमडळात जजिरा, मुधोळ आणि भोर या तीन संस्थानात मिळून एक जागा देण्यात आली आहे म्हणजे भोर संस्थानचे वाटणीस $\frac{1}{3}$ जागा आली आहे

सन १९३० सालीं श्रीमत राजेसाहेबानीं विलायतची सफर केली या सफरीस आलेला खर्च खाजगींतून केला इग्लडमध्ये असताना माजी बादशहाचे भेटीचा लाभ श्रीमत राजेसाहेबाना मिळाला तसेच त्या वेळीं प्रिन्स ऑफ वेल्स ( हल्लीं डयुक ऑफ विंडसर ), डयूक ऑफ कॅनॉट याच्या भेटी घेतल्या त्याचप्रमाणे माजी बादशाह आणि महाराणी मेरी याच्याकडे लचला श्रीमत राजेसाहेब गेले होते

श्रीमत राजेसाहेब १९३७ च्या मे महिन्यात बादशाह षष्ठम जॉर्ज व महाराज्ञी एलिझबेथ याच्या राज्यारोहणसमारभास हजर राहण्यासाठी दुसऱ्यादा विलायतेस गेले ता १२ मे १९३७ रोजी वेस्टमिनूस्टर ॲबेमध्ये झालेल्या राज्यारोहणसमारभास ते हजर राहिले होते याहि प्रवासाचा खर्च श्रीमतानी आपल्या खाजगीतूनच केला राज्यारोहणसमारभ पाहून ते व्हिएन्ना येथे गेले तेथें प्रसिद्ध डॉक्टरना आपली आणि श्री युवराज याची तब्बेत दाखविली, आणि काहीं औषधी पाण्याचीं व हवेचीं ठिकाणे पाहून पॅरिस येथील आतरराष्ट्रीय प्रदर्शन पाहून ते हिंदुस्थानात परत आले

## ६. विशेष संस्मरणीय गोष्टी

( क ) श्रीमत राजेसाहेब १९२२ पासून १९३० पर्यंत दक्षिणेतील मध्यगटातर्फे नरेन्द्र-मडळाचे प्रतिनिधि होते श्रीमत राजेसाहेब १९३० सालीं विलायतचे सफरीस गेले त्या वेळीं याच कार्याची पुरवणी म्हणून लहान सस्थानिकाच्या तक्रारी—ईस्ट इडिया असोसिएशनतर्फे झालेल्या चहापार्टीच्या वेळी जाहीर भाषण करून बटलर कमिटी आणि सायमन कमिशनचे रिपोर्ट यावर आपले वैयक्तिक मत प्रदर्शित करून इग्लडमधील अधिकारी वर्गाना समजावून सागण्यात लहान सस्थानाची बहुमोल कामगिरी केली त्याबद्दल दक्षिणेतील लहान सस्थानाचे अधिपतींनी त्याचे या कामगिरीबद्दल अभिनदन केले

( ख ) भोर सस्थानचे आद्य सस्थापक ब्रह्मीभूत श्रीशकराजी नारायण याचा पुण्यतिथि-महोत्सव भोर येथें आधुनिक पद्धतीवर मोठ्या प्रमाणात १९३० सालापासून श्रीमत राजेसाहेबानी सुरू केला

श्रीमत राजेसाहेबाच्या ठिकाणी श्रीशकराजी नारायण याच्याविषयी किती आदर, प्रेम आणि भक्ति वसत आहेत ते, त्याची अबवडे येथील समाधि व सभामडप रु ३१,००० खर्च करून नवीन बाधली आणि शकराजी नारायण पारितोषिक रु. ३०० वाङ्मय, इतिहास आणि शास्त्रे यावरील प्रयास दरसाल देण्याचे ठरविले या दोन गोष्टींवरून दिसून येते

( ग ) **संस्थानांतील अराजक चळवळ:**–

सस्थानात उत्पन्न झालेली अराजक चळवळ नाहींशी करून शातता व सुव्यवस्था स्थापन केली

( घ ) श्रीमत राजेसाहेबाना ता १२ मार्च १९३५ रोजी नप्तृमुख पाहण्याचा सुयोग प्राप्त झाला

## ७. ब्रिटिश सरकारशी सहकार्य

सस्थान दरबारने भाटघर येथील लॉइड डॅम धरण बाधण्याचे कामीं स्वार्थ-त्यागपूर्वक बहुमोल मदत केली आहे लॉइड धरणावर सस्थानच्या त्या मदतीचा निदर्शक असा प्रस्तरफलक मेमोरिअल बिल्डिंगमध्ये लावण्यात आला आहे.

ब्रिटिश हिंदुस्थानात १९३१-३२ साली कायदेभगाची चळवळ झाली, त्या वेळी श्रीमत राजेसाहेबानी शक्यनुसार साहाय्य केले

## ८. देणग्या

श्रीमत राजेसाहेब गादीवर आल्यास सतरा वर्षे झाली या सतरा वर्षांत त्यानी सस्थानातील आणि सस्थानाबाहेरील अनेक लोकोपयोगी सस्थाना सढळ हाताने आपल्या खाजगी उत्पन्नातून आणि सस्थानचे उत्पन्नातून देणग्या दिल्या आहेत बाहेरच्या ज्या सस्थाना देणग्या दिल्या आहेत त्या सस्थापासून सस्थानला व सस्थानचे प्रजाजनाना फायदा होईल अशी काळजी घेण्यात आली आहे त्या सर्व देणग्याचा उल्लेख केल्याखेरीज या समालोचनाला पूर्णता येणार नाही

खाली दिलेल्या रकमा श्रीमत राजेसाहेबानी आपल्या खाजगीकडून दिल्या आहेत

रु २०,००० भोर कायदेमडळास

रु २०,००० सस्थानातील लायक आणि गरीब विद्यार्थ्यांकरिता चार शिष्यवृत्त्या ठेवण्यासाठी

रु २१,३२५ भोर सस्थान तालुका लोकल बोर्डास

रु १२,००० पुणे येथील शेट ताराचद रामनाथ आयुर्वेदिक धर्मार्थ रुग्णालय अणि दवाखाना यास

रु. ३,००० ग्रथप्रसारक मडळीस ( उत्तम ग्रथप्रकाशन करणारी सस्था ).

रु २०,००० भोर हायस्कूलचे इमारतीस

रु १०,५०० भोर येथील किंग जॉर्ज दी फिफ्थ सिल्व्हर ज्युबिली हॉस्पिटल.

रु २,००० देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणसस्था

रु १,००० माजी बादशाह पाचवे जॉर्ज याचे कारकीर्दीचे रौप्य-ज्युबिली-फडास देणगी

रु १,००० क्वेट्टा भूकप-निवारण फडास मदत

रु १,००० प्रौढ शिक्षणाकरिता

खालीं दिलेल्या रकमा स्टेटचे उत्पन्नातून दिलेल्या आहेत

रु १०,००० सागली येथील विलिंग्डन कॉलेजला देणगी

रु २५,००० कै श्री सौ गगूताईसाहेब पतसचिव वाचनालयास देणगी

रु ७,००० पुणे बालवीर सस्थेस देणगी

रु ६,२७५ शारीरिक शिक्षणसस्थाना देणगी

रु ७,००० बाळकृष्ण पाडुरग ठकार याना रामायण, महाभारत इत्यादि पवित्र आणि राष्ट्रीय प्राचीन वाङ्मयाचे प्रकाशनास मदत

रु १,५०० बिहार भूकप-निवारण फडास देणगी.

रु १०,००० किग जॉर्ज दी फिफ्थ सिल्व्हर जुबिली हॉस्पिटल, भोर

रु २,००० पुणे येथील सर परशुरामभाऊ कॉलेजचा असेब्ली हॉल बाधण्यास देणगी

रु १,००० माजी बादशाहा पाचवे जॉर्ज याचे कारकीर्दीचे रौप्यज्युबिली फडास मदत

रु १,००० देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणसस्था, सातारा

रु ९,५०० सार्वजनिक आरोग्याच्या सस्था.

रु १५,४०० लोकोपयोगी सस्थास देणग्या.

रु १,००० क्वेट्टा भूकप-निवारण फड.

रु १,००० भोसला मिलिटरी स्कूल, नाशिक

रु १,००० प्रतापगडावरील श्रीभवानी देवीचे देवळाच्या जीर्णोद्धारास मदत

रु ३,००० क्षयरोग निवारण फड.

रु ६०० बावडे ग्रामसुधारणा मडळास देणगी

---

## प्रकरण २८ वें

# संकीर्ण

चरित्रमुद्रणाचे काम चालू असताना सन १९३९ इसवी सालातील ज्या काही महत्त्वाच्या गोष्टी श्रीमत राजेसाहेबाच्या मनात घोळत होत्या व ज्याचा निर्णय हे पुस्तक पुरे होण्यापूर्वीच झाला आहे, त्या गोष्टींचा उल्लेख या प्रकरणात करण्याचे योजिले आहे ज्या मागील प्रकरणात या गोष्टी-सबधीं पूर्वोल्लेख आलेला आहे, ती प्रकरणे सपूर्ण मुद्रित होऊन गेल्याकारणाने या स्वतत्र प्रकरणात त्या गोष्टी देणे जरूरीचे भासत असून, त्याच्या अनुल्लेखाने या चरित्रखडास अपुरेपणा येणार आहे यास्तव, मागील प्रकरण-सदर्भ देऊन त्या त्या विषयाची, स्वतत्रपणे पूरक परिच्छेद देऊन समाप्ति करणार आहों तसेच आतापर्यंतच्या प्रकरणातून ज्या गोष्टींचा उल्लेख करण्यात आलेला नाही अशा काही गोष्टींचा परामर्श येथें घेण्याचे योजिले आहे

## हिंदुस्थानच्या संयुक्त घटनेस संमति

प्रकरण १४ च्या अखेरीस, सयुक्त राज्यघटनेच्या सामीलनाम्याचा मसुदा दरबारकडे आला आहे व त्याबाबत विचार-विनिमय चालू असून दरबारचे उत्तर जावयाचे आहे, असे लिहून ते प्रकरण पुरे केले आहे त्यानतर या सामीलनाम्याच्या नवीन मसुद्याबाबत विचार करण्याकरिता नरेंद्र-मडळाचे चॅन्सेलर यानी सर्व सस्थानिकाची व त्याच्या दिवाणाची मुबई येथें ता ९ जून ते ता १३ जून १९३९ पर्यंत ताजमहाल हॉटेलमध्ये सभा भरविली या सभेस हजर राहण्यास श्रीमत राजेसाहेब आपले दिवाण व ऑफिसर्स याना बरोबर घेऊन मुबईस गेले होते या सभेत सामीलनाम्यास समति द्यावी अगर न द्यावी यासबधी साधकबाधक गोष्टीची चर्चा करण्यात येऊन असे ठरले की, सामीलनाम्याने मिळणाऱ्या सवलती व संरक्षक बधने अपुरीं आहेत म्हणून सामीलनाम्यास नकार द्यावा या आशयाचा ठराव परिषदेत सर्वानुमते पास करण्यात आला मात्र याबाबत जास्त वाटाघाटी करण्यास मार्ग मोकळा असल्याचे त्यासबधींच्या ठरावात नमूद करण्यात आले

या अखिल-भारतीय संस्थानिकाच्या परिषदेने पास केलेल्या ठरावानुसार वागावे की न वागावे, हे आपआपल्या संस्थानाचे हितसबध लक्षात घेऊन ठरविण्याकरिता दक्षिणेतील संस्थानिकाच्या गटातर्फे स्वतत्रपणे पुणे येथील सचिवाच्या वाड्यात सभा भरविण्यात येऊन वाटाघाट करण्यात आली या सभेस हजर असलेल्या बऱ्याचशा संस्थानिकानीं सयुक्त घटनेत सामील झाल्यापासून त्याच्या हितसबधास विशेष बाध येत नसल्यामुळे सामीलनाम्यास समति देण्याचे ठरविले, व बाकीच्यानीं सामीलनाम्यास नकार द्यावा असा आपापल्यापुरताच मुबई परिषदेचा निर्णय कायम ठेविला वरील ज्या बऱ्याच संस्थानिकानीं सयुक्त घटनेत सामील होण्याचे ठरविले त्या लहान संस्थानाना समति देण्यापासून नुकसान होणार नाहीं यास्तव वरीलप्रमाणे त्यानीं ठरविले आहे मोठ्या संस्थानाचे प्रश्न भिन्न आहेत व त्याकरिता त्याना जास्त प्रयत्न करणे भाग असल्यामुळे, त्यानीं मुबई येथील परिषदेत नकारात्मक ठराव पास केला. वर सागितलेल्या ज्या लहान संस्थानिकानीं मुबईच्या ठरावास चिकटून राहण्याचे ठरविले, त्याच्याहि संस्थानाबाबत काहीं प्रश्नाची वाटाघाट करून त्याचा निर्णय करून घेणे त्याना इष्ट वाटत असल्यामुळे तशा प्रयत्नास वाव मिळावा, म्हणूनच त्यानीं त्या ठरावाचा आश्रय केला पुणे येथील वाटाघाटींत ज्या बऱ्याच संस्थानानी सयुक्त घटनेत सामील व्हावे या निर्णयास समति दर्शविली त्यात भोर संस्थानहि होते पहिल्या प्रथम सामीलनामा मिळाल्यापासून उत्तर जाण्याची मुदत सहा महिन्याची म्हणजे जुलै १९३९ इसवीअखेर देण्यात आली होती परतु ही मुदत ऑगस्ट १९३९ च्या अखेरपर्यंत म्हणजे आणखी एक महिन्याने वाढविण्यात आली त्याप्रमाणे वरील निर्णयास अनुसरून श्रीमत राजेसाहेब यानीं बादशहाचे हिदुस्थानातील राजप्रतिनिधि नेक नामदार व्हाइसरॉयसाहेब याच्याकडे आपली समति ता १७ माहे ऑगस्ट सन १९३९ इसवी रोजी पत्र पाठवून कळविली आहे मात्र ही समति देताना अशी शर्त ठेवण्यात आली आहे कीं, ज्या राजेलोकास ही योजना अपुरी वाटते त्याच्याबरोबर वाटाघाट होऊन, त्याच्या मागणीप्रमाणे त्याना जास्त अधिकार देण्याचे ठरल्यास भोर संस्थानने पहिल्याप्रथम मान्यता दिल्यामुळे त्यास वरील संस्थानाप्रमाणेंच नवे जास्त अधिकार मिळण्यास हरकत येऊ नये.

मुबई येथील सस्थानिकाच्या परिषदेने ज्या हैदरी कमिटीच्या शिफारशी-वरून फेडरेशन नाकारण्याचा ठराव पास केला त्या हैदरी कमिटीच्या रिपोर्टातच, फेडरेशनमध्ये सामील होण्यातच सस्थानाना बरेच फायदे होणारे आहेत आणि फेडरेशनमध्ये सामील होण्याखेरीज त्याना गत्यतर नाहीं असे कमिटीने स्पष्ट शब्दात म्हटले आहे, ही विशेष लक्षात घेण्यासारखी गोष्ट आहे कमिटीच्या रिपोर्टांतील पुढें उद्धृत केलेल्या उताऱ्यावरून वरील विधानाची सत्यता पटणार आहे त्यावरून ज्या सस्थानिकानीं फेडरेशनमध्ये सामील होण्याचे ठरविले, त्याच्यापुढें सामील होण्याच्या अनेक कारणामध्ये हैदरी कमिटीच्या रिपोर्टांत नमूद केलेले हे एक महत्त्वाचे कारण होते

**Extract from Hydari Committee's Report**

" Whether Federation is inaugurated or not, the provincial constitution under the new Act has come into operation, and the political forces and tendencies arising therefrom have begun to play their part. It cannot be expected that the States can escape the consequences of these factors by remaining outside Federation It is possible to hold the view that by entering Federation the States will have opportunities of counteracting the political pressure to which the Governor-General will be subject in matters affecting the States In a Federation where the States participate they will have opportunities of effectively influencing the interplay of political forces, and when political parties are driven to seek the co-operation of the States, the States may be in a better position to arrest forces which otherwise tend to weaken their internal autonomy

" It will, therefore, be a grave error to be so unduly alarmed at recent events, which are doubtless very disquieting, as to omit entirely from consideration the main issues which originally guided the States in their resolve to accept the ideal in part at least, because they were dissatisfied with the present regime under which they are seriously affected by British Indian policy in regard to matters of common concern without having a part in its determination Federation appeared then

to be the best means of giving them a share in the determination of the policy, while at the same time preserving their independent sovereignty as autonomous units To this general argument in favour of Federation was added the ideal, to which the Rulers at the time made a distinguished contribution, of realising the unity of India as a whole. Both the general argument and the ideal remain as true as they were then "

## मागील प्रकरणांत न आलेल्या कांही महत्त्वाच्या गोष्टी

### श्रीमत राजेसाहेबाचे बटलर कमिटीच्या रिपोर्टाबाबत भाषण

सन १९२८ साली सस्थानाच्या प्रश्नाची चौकशी करून सुधारणा घडवून आणण्याचे कामी शिफारशी करण्याकरिता सर हारकोर्ट बटलर याच्या अध्यक्षत्वाखालीं Indian States Committee नेमण्यात आली. या कमिटीने आपला रिपोर्ट प्रसिद्ध केल्यावर श्रीमत राजेसाहेब यानी भोर कायदे-मडळाच्या तिसऱ्या बैठकीच्या सुरुवातीस ता १३ सप्टेंबर १९२९ रोजीं भाषण करून त्या रिपोर्टावरील आपले मत प्रगट केले याच सुमारास नरेंद्र-मडळ या सस्थेच्या सद्हेतूबद्दल बराच गैरसमज प्रचलित झाला होता, व त्याबाबत वर्तमानपत्रातून टीका सुरू झाली होती श्रीमत राजेसाहेब नरेंद्र-मडळाचे प्रतिनिधि सभासद म्हणून काम करीत असल्याने नरेंद्र-मडळाच्या कामकाजाची त्याना उत्तम प्रकारची माहिती होती व सस्थानातून सुधारणा घडवून आणण्यास व सस्थानिकाना येत असलेल्या अडचणी दूर करून घेण्यास ह्या सस्थेचा चागला उपयोग होतो, तसेच सस्थेचे ध्येय ब्रिटिश हिंदुस्थानच्या प्रगतीच्या आड येत नाही, असे श्रीमताना माहीत असल्यामुळे त्यानी नरेंद्र-मडळाच्या कामकाजाची व ध्येयाची जनतेस माहिती व्हावी, तसेच हिंदुस्थान सरकारला जकातीचे उत्पन्न मिळते त्याचा वाटा सस्थानाना त्याच्या हिश्याप्रमाणे मिळाल्यास त्याचा विनियोग सस्थानच्या कामाकडे होईल कीं नाही याबद्दल ब्रिटिश मुलखातील पुढाऱ्याकडून व सस्थानच्या रयतेकडून शका प्रदर्शित करण्यात येत होती त्या शकेच्या निवारणार्थ या रकमेचा विनियोग सस्थानच्या रयतेच्या सुखसोईकडेच करण्यात येईल असा खुलासा करण्याची सधी घेण्याच्या हेतूने ( या विषयावरील श्रीमताच्या १९३० च्या फेब्रुवारींतील नरेंद्रमडळाच्या

बैठकीचे वेळी भाषणात केलेल्या खुलाशाचा उल्लेख या पुस्तकाचे प्रकरण १४ पान ६५९ मध्ये आलेला आहे तो पाहिला असता श्रीमताचे म्हणण्याचा जास्त उलगडा होणार आहे ), आणि ब्रिटिश गव्हर्नमेंटचे पोलिटिकल ऑफिसर्स सस्थानाना भेटी देतात, त्याच्या खर्चाचा बोजा सस्थानावर फार पडतो त्याबद्दल गैरसमज पसरविण्यात येतो तो दूर करण्याकरिता, वरील भाषणात त्या त्या विषयाचा सविस्तर ऊहापोह करून नरेंद्र-मडळाविषयीचे गैरसमज दूर करण्याचा प्रयत्न केला, व तो प्रयत्न बराच यशस्वी झाल्याचे दिसून आले कारण हे भाषण वर्तमानपत्रातून प्रसिद्ध झाल्यावर योग्य वेळी भाषण करून सस्थानिकाची फार महत्त्वाची कामगिरी केल्याबद्दल बिकानेर, भोपाळ, सितामाहू, धोलपूर, नवानगर इत्यादि मोठमोठ्या सस्थानाच्या अधिपतीनी अभिनदनपर पत्रे श्रीमत राजेसाहेबाना पाठविली या दृष्टीने हे भाषण महत्त्वाचे असल्याने त्यातील महत्त्वाचा भाग या ठिकाणी देत आहे, व त्यावरील अभिनदनपर पत्रे परिशिष्ट २४ मध्ये दिली आहेत

ता १३-९-१९२९ रोजीं भरलेल्या भोर कायदेमडळाच्या
तिसऱ्या बैठकीच्या आरभीं श्रीमत राजेसाहेब यानी
केलेल्या भाषणातील महत्त्वाचा उतारा

"आज सुरू होणारे Council चे वैशिष्टय म्हणजे सभासदानीं आपले लक्ष केवळ राजकीय अथवा औद्योगिक बाबींपुरतेच सकुचित न करिता सामाजिक गोष्टींतहि घातले आहे ही समाधानाची गोष्ट आहे कारण सामाजिक उन्नतीखेरीज बाकीच्या उन्नतीचा नीट विकास होत नाही दुसरे बैठकींतील वैशिष्ट्य हे आहे की, विचारलेल्या प्रश्नात काही प्रश्न बटलर कमिटीसबधी माहिती मिळणेबाबत आहेत त्यावरून बिनसरकारी सभासदास सदर कमिटीचे कामकाजाबद्दल व त्या कमिटीसबधी दरबारने काय धोरण स्वीकारले आहे व दरबारचे काय विचार आहेत ते समजून घेण्याबद्दल व इतर काहीं अनुषगिक माहिती मिळणेबद्दल उत्सुकता दिसून येत आहे, व ती असणे साहजिक आहे परतु प्रश्न इतके व्यापक स्वरूपाचे आहेत की, त्याची उत्तरे थोडक्यात व सभासदाची दिसून येणारी उत्सुकता तृप्त करण्यास पुरेशी अशीं देणे शक्य नाही शिवाय कौन्सिलच्या नियमाप्रमाणे त्याचीं उत्तरे कौन्सिलमध्ये देणे

अशक्य आहे तथापि कोणास याबद्दल विशेष बाबतींत काहीं विशिष्ट प्रकारची माहिती किंवा एखाद्या मुद्द्यावर खुलासा पाहिजे असल्यास त्यानीं आम्हास खाजगी रीतीने विचारल्यास आम्ही तो मोठ्या आनदाने त्यास यथामति देऊ

सदर कमिटीचा रिपोर्ट हा सध्या सर्व हिंदुस्थानच्या चर्चेचा विषय झाला आहे, व त्यावर दोन पक्ष निर्माण होऊन दोघाकडून साधकबाधक टीका होत आहे, व उभय पक्षामध्यें एकमेकाच्या हेतूबद्दल व कार्यांविषयीं गैरसमज व गैरविश्वास उत्पन्न झाला आहे त्याला कारण कोण, कोणाकडे विशेष दोष आहे, या कामी कोणी प्रथम सुरुवात केली वगैरे गोष्टींबद्दल विचार करणेचे हे स्थानहि नाहीं, व तसे करण्याची आमची इच्छाहि नाहीं, परतु ह्यामुळे उत्पन्न झालेली परिस्थिति उभय पक्षाच्या दृष्टीने अगर एकदर देशकल्याणाच्या दृष्टीने समाधानकारक नाही हे उभय पक्षातील समजस व देशाभिमानी लोक नि सशय कबूल करतील सर्वांना हिदुस्थानच्या कल्याणाची इच्छा व तळमळ उत्कट आहे सर्वमान्य हिदुस्थानचा राजकीय अतिम दर्जा, त्याला विरोध करण्याची कोणीहि देशाभिमानी मनुष्य खटपट करीत नाहीं व करणारहि नाहीं मग कोणी असे विचारील कीं, असे जर आहे तर मग एवढालीं रणे माजण्याचे काय कारण? तर, त्याला आमच्या समजुतीने हे कारण सागता येईल की, उभय पक्षानीं आपआपले ध्येय साधण्याकरिता व अडचणी दूर करण्यासाठीं सद्धेतूने चालू केलेल्या चळवळीबद्दल एकमेकाचा परस्पर गैरसमज व नतर परस्पराबद्दल गैरविश्वास उत्पन्न होऊन शेवटी त्याचे पर्यवसान चालू परिस्थितींत झाले आहे आता झाल्या गोष्टीबद्दल विशेष चर्चा करण्यात हशील नाहीं, तथापि, आहे ती स्थिति गृहीत धरून ती नाहींशी करणे अवश्य आहे कीं नाहीं, व अवश्य असेल तर ती कशाने नाहींशी होईल हे पाहणे जरूर आहे, व त्याकरिता प्रत्येक हिंदवासीयाने शक्य तितकी खटपट करणे जरूर आहे कारण उभय पक्षातील लोक एकाच हिंदमातेच्या उदरातून निघालेले आहेत. सर्वच एकमेकाशीं नात्यागोत्याने अथवा हरएक प्रकारच्या सबधाने निगडित झालेले आहेत एकमेकावाचून एकमेकास गत्यतर नाहीं व कोणासहि हिंदुस्थान सोडून जावयाचे नाहीं, व कोणीहि कोणास नामशेष करू शकणार नाहीं सर्वांना मायभूमि सारखीच प्रिय आहे,

सर्वांचाच तिच्यावर सारखा हक्क आहे व म्हणून तिचा जेणेकरून उत्कर्ष होईल ते करणे, हे उभय पक्षाचे आद्य व पवित्र कर्तव्य आहे तेव्हा उभय पक्षानीं परस्पराचे गुणदोष काढून एकमेकाची मने दुखविणे व दोन तट माजविणे हे कोणासहि श्रेयस्कर नाहीं हे सर्वांसच कळत आहे प्रत्येकामध्ये दोष आहेत, चुका प्रत्येकाकडून होत आहेत व होतीलहि, परतु त्या सर्व विसरून जाऊन एकमेकाच्या मनोभावनाचे, अडचणीचे व सस्कृतीचे सूक्ष्म निरीक्षण करून व त्याकडे सहानुभूतिपूर्वक पाहून पुढे काय करावयाचे, झालेल्या चुका पुढे कोणत्या उपायानी होणार नाहीत व सर्वांचे इच्छित कार्य कसे साधेल ते पाहण्यास लागले पाहिजे

आनदाची गोष्ट ही की, अलीकडे उभयपक्षी ह्या दिशेने खटपट सुरू झाली आहे दोघाहि पक्षाना आपल्या कार्यात सध्याच्या परिस्थितीमुळे कसे अडथळे येत आहेत व पुढे येण्याचा सभव आहे ह्याची जाणीव होऊ लागली आहे नरेन्द्र-मडळाकडून ह्या बाबतीत प्रयत्न सुरू करण्यात आले आहेत. ह्याची आपणास खात्री पटावी म्हणून सन १९२८ सालीं नरेन्द्र-मडळाचे बैठकीत Good Government वर ठराव पास केला आहे, व त्याची जाणीव वरचेवर नरेन्द्र-मडळाचे बैठकीतून राजेलोकास करून देण्यात येत असते चालू असलेली चळवळ केवळ स्वार्थमूलक नाहीं हे स्पष्टपणे जाहीर करण्याकरिता मुबईस १९२८ चे एप्रिलमध्ये भरलेल्या नरेन्द्र-मडळाच्या सभेमध्ये Customs वगैरे बाबतीत उत्पन्नाचा अश ब्रिटिश इडियाकडून मिळाल्यास त्याचा विनियोग सस्थानच्या आर्थिक सुधारणा करण्यात खर्च करण्यात येईल अशाबद्दल ठराव पास करणेत आला आहे तसेच गेल्या जून महिन्यात मुबईमध्ये नरेन्द्र-मडळाची Conference होऊन बटलर कमिटीच्या रिपोर्टावर नरेन्द्र-मडळाने आपले मत प्रदर्शित करताना एक ठराव पास केला आहे तो ठराव येणेप्रमाणे आहे —

"Whilst welcoming the attainment by British India of her due place among the British Dominions under the ægis of the British Crown, this conference expresses its gratification at the Indian States Committee's recognition, as a corollary of the true constitutional position of the States, that the rela-

tionship between the Paramount Power and the Princes should not be transferred without the agreement of the Princes to any third party, which recognition leaves the door open for negotiation between the States and the British India with a view to arriving at an equitable and satisfactory arrangement on terms fair and honourable alike to British India and the Indian States '

यावरून राजेलोकाचे अखिल हिंदुस्थानच्या भावी घटनेबद्दल काय मत आहे व कशा प्रकारचे धोरण ते स्वीकारणार ह्याची कल्पना आपणास सहज येणार आहे दुसऱ्या बाजूनेहि आता चालू झालेले प्रयत्न आपणा सर्वांस विश्रुत आहेतच, यामुळे त्याची पुनरुक्ति करण्याचे कारण नाही शेवटी हिंदुस्थानच्या भावी कल्याणाकरिता उभयतानी काय केले पाहिजे व काय लक्षात ठेविले पाहिजे ह्याबद्दल उभय पक्षास मान्य अशा मोठ्या पुढाऱ्यानी व खुद्द व्हाइसरॉयसाहेब यानी हिंदु-मुसलमानासबधीं काढलेले उद्गार आपल्याला प्रस्तुत प्रसगी लागू पडण्यासारखे आहेत असे वाटल्यावरून ते आम्ही खालीं देत आहोंत त्याचा सर्वजण अवश्य विचार करतील अशी आम्हाला उमेद आहे

बिपिन चद्रपाल —" हिंदूना हे स्पष्ट कळून आले पाहिजे की, सर्व मुसलमानाना घालवून देणे अगर हिंदु करणे अशक्य आहे मुसलमानानाहि समजून चुकले पाहिजे की, हिंदुस्थानातून हिंदूना नामशेष करणे अशक्य आहे हिंदु व मुसलमान या दोहोंसहि असे कळले पाहिजे की, आपल्या हल्लीच्या चढाऊ धोरणाने आपल्या जातिविषयक हितसबधाचे रक्षण अगर सवर्धन होणे शक्य नाही स्वार्थमूलक ज्ञातिहितबुद्धीपेक्षा राष्ट्रीयत्व श्रेष्ठ आहे, हे जेव्हा हिंदु-मुसलमानाना कळून येईल त्याच वेळीं हा प्रश्न सुटेल "

त्याचप्रमाणे हिंदुस्थानचे व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विनसाहेब यानीं विलायतेस जाण्यापूर्वी सिमला येथें चेम्सफर्ड क्लबात भाषण करताना गेल्या जूनमध्ये याच आशयाचा अभिप्राय प्रकट केला आहे ते म्हणतात —

"The first requisite of progress is to exercise and allay the spirit of suspicion and fear that forbids mutual confidence and drives men to seek security in the strength of their own defences

proceedings, after which you will proceed to the election of the President and other business I thank you all very sincerely for your hearty response '

---

## परिशिष्ट १५

सातारा येथील सस्कृत विद्यालय-उद्घाटनाचे वेळचे
श्रीमत राजेसाहेबाचे भाषण
ता २३।७।१९३८

''वेदशास्त्रसपन्न गोकर्णकरशास्त्री, वे शा स रगाचार्य रड्डीशास्त्री आणि सभ्य जनहो,

आपण सर्वांनी आज या समारभाचे अध्यक्षस्थान स्वीकारण्यास आम्हास बोलावून या विद्यालयाचे उद्घाटन करण्याची सधि दिलीत याबद्दल आम्ही अत्यत आभारी आहोत वास्तविक आम्ही मोठे विद्वान् गृहस्थ नसल्यामुळे या समारभाकरिता एखाद्या प्रथितयश साहित्याचार्यास बोलावून या विद्यालयाचे उद्घाटन त्याच्या हस्ते करणे हेच जास्त योग्य झाले असते असे आम्हास वाटते तथापि, आम्हास बोलावून आमच्याबद्दल आपले ठिकाणीं वसत असलेली आदरबुद्धि व स्नेहभाव व्यक्त करून आमचा गौरव केलात याबद्दल आम्हास फार आनद होत आहे

ह्या समारभाचे निमत्रण वरील कारणाकरिता नाकारावे असे आमचे मनात प्रथम आलेहि होते, परतु सरस्वतीची आमच्यावर पूर्ण कृपा नसली तरी ती व्हावी म्हणून, अशा तऱ्हेने ही तिची सेवा करण्याची आलेली सुसधि जाऊ देऊ नये असे वाटून आम्ही रुकार दिला तेव्हा आता ' सरस्वतीं प्रणम्यादौ सर्वकार्यार्थसिद्धये ' अशा प्रकारे प्रथम तिची स्तुति करून आपण आपल्या कार्याकडे वळू

या शहरीं पूर्वी सस्कृत पाठशाळा होती परतु ती पुढें काहीं कारणास्तव बद पडली साताऱ्यासारख्या इतिहासप्रसिद्ध ठिकाणीं जुन्या विद्येची पाठशाळा नसणे ही मोठीच उणीव होती, व ती अलीकडे बरीच जाणवू लागली होती

पाठशाळेची उणीव भासू लागली. अशा स्थितींत येथील प्रमुख नागरिकाच्या उत्साहाने व प्रयत्नाने, तसेच वेदशास्त्रसपन्न गोकर्णकरशास्त्री याच्या धडाडीने ही पाठशाळा सुरू करण्यात येत आहे ही फार आनदाची गोष्ट आहे बहुतेक मोठ्या शहरात सस्कृत पाठशाळा आहेत त्याप्रमाणे ती येथेंहि असणे जरूर आहे

सस्कृत विद्येची आवश्यकता, महत्त्व आणि उपयुक्तता ह्याचा ऊहापोह उत्तम रीतीने वेदशास्त्रसपन्न रगाचार्य रड्डीशास्त्री यानीं आपल्या विस्तृत व विद्वत्ताप्रचुर भाषणात आताच केला आहे तेव्हा त्याबद्दल आता विशेष काही सागावयाचे कारण राहिले नाही

सस्कृत भाषा ही प्रत्यक्ष व पर्यायाने सध्या प्रचलित असलेल्या बहुतेक भाषाची आद्य जननी आहे असे म्हटले तरी चालेल सस्कृत भाषेचा बहुतेक भाषावर थोडाबहुत परिणाम झालेला आहे आपल्याकडील अतिशय बहुमोल ग्रथ सर्व सस्कृत भाषेतच आहेत ऋग्वेदादि श्रुतिग्रथ, मन्वादि स्मृति, श्रीभगवद्गीता, उपनिषदादि वेदान्त, रामायण-महाभारतासारखे ग्रथ, आपल्या जुन्या चालीरीति, आचार-विचार, शौर्य, पराक्रम वगैरे ज्यात वर्णिलीं आहेत अशीं इतिहास-पुराणे व अत्युत्तम काव्ये इत्यादि ग्रथ सस्कृत भाषेतच आहेत तेव्हा थोडेबहुत का होईना, पण आपणास व आपल्या भावी पिढ्याना तिचे ज्ञान असणे अत्यत जरुरीचे आहे

प्रत्येक सुधारलेल्या पौर्वात्य व पाश्चात्य देशामध्ये सस्कृत वाङ्मयाचा सागोपाग अभ्यास सुरू आहे तेव्हा सस्कृत विद्येचे माहेरघर अथवा उगम-स्थान जो आपला हिंदुस्थान देश त्यामध्ये सस्कृत भाषा आपल्या भावी पिढ्यात चिरकाल परिचित असणेची सोय करणे याबद्दल कोणाहि विचारी माणसाचे दुमत होणार नाहीं.

या पाठशाळेचा अभ्यासक्रम जो ठेविला आहे तोहि चागला आहे त्यायोगाने इग्रजी शिकणाऱ्या विद्यार्थ्यांस सस्कृत भाषेचा अभ्यास करावयास मिळणार आहे तसेच महामहोपाध्याय, पडित वगैरे पदव्या मिळविण्यास लायक होण्याची ज्याची इच्छा आहे, त्याच्याहि अभ्यासाची म्हणजे दशग्रथी

होण्यापर्यंतच्या ज्ञानप्राप्तीची सोय या ठिकाणीं करण्यात आली आहे, ही फार चागली गोष्ट आहे

भिक्षुकवर्गास आवश्यक असे वैदिक कर्मकाडाचे शिक्षण जे अलीकडे फार दुर्मिळ होत चालले आहे त्याच्याहि अध्ययनाची ह्या पाठशाळेत सोय झाली आहे ही चागली गोष्ट आहे

आम्ही आता या विद्यालयातील तिसऱ्या शाखेकडे, विशेष रीतीने धार्मिक आचारविषयक, ब्रह्मकर्म आणि दशग्रथादींचे शिक्षण याकडे वळतो

आपला सनातन वैदिक धर्म ज्या आदितत्त्वावर अधिष्ठित झाला आहे त्या तत्त्वाचे परिपाल्नार्थ आचारविचार पूर्णतेने आचरणात येण्यासाठी या शिक्षणाचा उपयोग होईल अशी आम्हाला आशा आहे, व तसेच आपले सर्वांचेहि मत असेल अशी आमची खात्री आहे आर्यांच्या खऱ्याखुऱ्या आचारविचाराविषयीं हल्ली सर्वत्र अनास्था दिसून येते ती का दिसून येते व त्याला काय काय कारणे असावीत याविषयीं अनेकाचीं अनेक मते आहेत पहिले, परधर्मी राजसत्ता व त्या सत्तेची सर्व प्रकारच्या शिक्षणावर व राहणीवर पडलेली छाप, आणि दुसरे म्हणजे, ज्यानी आचारधर्माचे शिक्षण घेतलेले असते त्याचे ठिकाणीं त्या शिक्षणास साजेशा वर्तनाचा अभाव आचारधर्म-पालनाचे व्रत घेतलेला भिक्षुकवर्ग उदरपूर्तीपुरतेहि मिळत नसल्यामुळे अन्य व्यवसाय करण्यास उद्युक्त होतो व त्याच्या वागणुकीने सामान्य जनतेच्या अश्रद्धेत भरच पडते तेव्हा लोक धर्मप्रवण व्हावेत, वरील आचारधर्म पाळणाऱ्या वर्गाची वर्तणुक सुधारावी आणि त्याच्या उदरनिर्वाहाचा प्रश्नहि सुलभतेने आणि सौकर्याने सुटावा इत्यादि प्रश्न यात महत्त्वाचे आहेत हे प्रश्न सोडविण्यास काय योजना केली पाहिजे हे ठरविणे मोठमोठ्या राष्ट्रकार्यधुरधर पुरुषाचे काम आहे त्याच्याकडून वरील मुद्दयाची जरूर ती विचारणा व्हावी एवढ्याच हेतूने आम्हीं हा प्रश्न आपणा सर्वांचेपुढें माडला आहे

आधुनिक पाश्चात्य शिक्षणापासून जसा ‘ जुने सर्व वाईट व नवे सर्व चागले व म्हणून सर्व नाहींसे केले पाहिजे ’ असे म्हणणारा एक वर्ग निर्माण झाला, तसाच जुन्या तऱ्हेच्या एकागी शिक्षणामुळे ‘ जुने ते सोने, आपल्या जुन्या चालीरीती, जुने आचारविचार, जुनी वर्णव्यवस्था इत्यादि सर्व उत्तम

असून यावच्चद्रदिवाकरौ असेच चालले पाहिजे, यात काडीचाहि फेरबदल होता कामा नये ' अशा तऱ्हेची विचारसरणी असणाराचाहि एक वर्ग आहे नव्या विचाराच्या लोकाची प्रचड लाट जोराने सुरू झाली आहे या दोन्ही वर्गांत सारखा झगडा सुरू आहे तेव्हा या दोन्ही वर्गांचे सुन्दर असे समिश्रण झाले तरच समाज-स्वास्थ्याला व समाजोन्नतीला फार पोषक होईल नाही तर दोन्हीचा विरोध असाच कायम राहील तर जो बलहीन वर्ग आहे तो अजिबात नाहीसा होण्याची भीति आहे, व ही भीति दिवसेदिवस वाढत जाणार आहे, हे आपण पाहतच आहा लाटेच्या योगाने जुन्या विचाराच्या लोकाचा निभाव लागणे अशक्यप्राय आहे व त्या योगाने आपल्या प्राचीन धर्मकल्पनात व आचारविचारात जे काही उत्तम व त्रिकालाबाधित आहे ते सुद्धा नाहींसे होईल याचे आम्हास भय वाटत आहे एवढ्याकरिता नवीन पिढीला जे वरील तिसऱ्या वर्गातील धार्मिक शिक्षण देणे ते या नवीन लाटेपुढें टिकाव धरील, त्याच्यामध्ये स्वधर्माविषयींचा आदर उत्पन्न करील व सध्याच्या कालातच नव्हे तर भविष्यकालीहि योग्य प्रकारे आपली पूर्वापार आलेली उत्कृष्ट सस्कृति व आपले उच्च स्थान कायम ठेवील, अशा प्रकारचे शिक्षण मिळेल अशी जरूर ती योजना केल्यास ठीक पडेल असे आमचे मत आहे

हे सस्कृत शिक्षणाचे कार्य हाती घेऊन आपल्या प्राचीन शास्त्राचे आस्थापूर्वक परिपालन करण्यासाठीं वे शा स गोकर्णकरशास्त्र्यासारखे दशग्रथी, उत्तम वैय्याकरणी आणि वेदात-अलकारादि शास्त्रपारगत असे अध्वर्यु वडाडीने व अपूर्व उत्साहाने पुढें आले आहेत, ही फार आनदाची गोष्ट आहे तेव्हा त्याच्या नेतृत्वाखालीं व येथील प्रमुख नागरिकाच्या साहाय्याने आणि सक्रिय सहानुभूतीने ही आज बाल्यावस्थेंत असलेली सस्था लवकरच उत्तम प्रकारे भरभराटीस येईल अशी आम्हास आशा आहे आम्ही या सस्थेस मदत म्हणून अल्प देणगी रु ३०० देण्याचे जाहीर करून व वर निर्दिष्ट केलेली आमची सदिच्छा श्रीप्रभु रामचद्र पूर्ण करो अशी प्रार्थना करून व सरस्वतीस पुन्हा प्रेमपूर्वक अभिवादन करून या विद्यापीठाचे उद्घाटन केल्याचे आम्ही जाहीर करतों ''

---

# परिशिष्ट १६

## श्रीमताना विलायतेस जाण्यापूर्वी निरोप देण्याचा दरबार ता २८ एप्रिल १९३० रोजीं झाला त्या वेळचे श्रीमताचे भाषण

"नामदार सभासद, दिवाण व इतर सभ्य गृहस्थहो,

आपण सर्वांनीं मोठ्या प्रेमाने मला निरोप देण्याकरिता हा जो समारभ केला त्याबद्दल मी आपणा सर्वांचे मन पूर्वक आभार मानतों हा समारभ भोर सस्थानचे कायदे-मडळाचे लोकपक्षीय नामदार सभासदानी स्वयस्फूर्तीने केला आहे यामुळे जो आनद व एक प्रकारचे विलक्षण समाधान वाटत आहे ते मोकळया मनाने आपणास कळविण्याम मला सतोप वाटत आहे भोर सस्थानचा अलीकडचा १०-१५ वर्षांचा राजकीय घडामोडींचा इतिहास ज्याना इत्थभूत माहीत आहे त्याना माझ्या वरील उद्गाराचे खरे रहस्य कळणार असून, मला जो आनद व जे समाधान वाटत आहे ते अप्रयोजक नसून यथोचित आहे असेच वाटल्यावाचून राहणार नाहीं हा समारभ राजा व प्रजा याजमधील असलेल्या जिव्हाळ्याचे द्योतक आहे, केवळ औपचारिक प्रकार नाही व म्हणूनच मी या ममारभास मोठ्या आनदाने समति दिली परस्पराची भूमिका परस्परानीं कालमानाप्रमाणे सहानुभूतिपूर्वक अवलोकन करून तदनुरोधाने वर्तन ठेविल्यास अशा प्रकारचे परस्परामध्ये—निदान सस्थानात्न तरी—प्रेम दृग्गोचर होण्यास हरकत पडणार नाहीं असें माझे प्रामाणिक मत आहे

हिंदुस्थानातील बहुतेक मोठमोठालीं शहरें व स्थळे जीं राजकीय, धार्मिक, औद्योगिक, ऐतिहासिक, तशींच शिक्षणदृष्टया महत्त्वाचीं आहेत तीं पाहणे झाल्यावर माझ्या मनात पाश्चिमात्य देशात प्रवास करावा असे बरेच दिवसापूर्वी आले होते, व त्या दृष्टीने विचार व प्रयत्न सुरू करून बहुतेक ठरल्यासारखे झाले होते तरी दैवी दृष्टीने ठरले नसल्यामुळे एकाएकीं लढाई सुरू झाल्यामुळे त्या वेळी जाण्याचा बेत रहित झाला पुढे मी गादीवर आल्याबरोबर पुन्हा विचाराने उचल खाल्ली, व बहुतेक कागदोपत्रीं तयारी केली, परतु वरीलप्रमाणेच माझा हेतु तडीस नेण्यास तो कालहि योग्य नव्हता, असाच ईश्वरी सकेत असावा असे दिसते त्याचे मनातून माझी व माझ्या प्रजाजनाची दाट

ओळख व्हावी, दृढ परिचय व्हावा व एकमेकाबद्दल परस्पराचा विश्वास पटावा व अशा रीतीने प्रेम उत्पन्न होऊन आजच्याप्रमाणे नि शक मनाने आपणा सर्वांचा प्रेमपूर्वक निरोप घेऊन आपण सर्वांनीं आपआपल्या परीने राज्याची योग्य जबाबदारी पत्करल्यावर आनदाने निर्विघ्नपणे जावें असे होते आपण मानवी प्राणी आहोंत, ईश्वराचे मनात काय आहे हे कळण्यास आपण असमर्थ आहोंत, त्याच्या कृतीचे फक्त कौतुक करण्यापलीकडे आपल्या हातात काहीं नाहीं, तो जे करतो ते सर्व आपल्या बऱ्याकरिताच करतो, हे शेवटीं परिणामा-वरून बरोबरच ठरते, व हाच सिद्धात प्रस्तुत प्रसगीं खरा ठरला आहे सागावयाचा मुद्दा इतकाच कीं, यापूर्वीं जरीं मी विलायतेस गेलों असतों तरी ते जाणे आजच्यासारखे आनददायक व सुखकारकच झाले नसते, हे सर्व गोष्टींच्या सागोपाग विचारातीं खरे ठरत आहे

इग्लड वगैरे ठिकाणीं जाऊन प्रकृति सुधारावी हा एक तिकडे जाण्याचा माझा हेतु आहे त्याजबरोबरच तिकडे जाऊन औद्योगिक, राजकीय, सामाजिक, धार्मिक, शिक्षणविषयक सस्था पाहून जो काय अल्पस्वल्प मला फायदा होईल तो यथाशक्ति व यथामति आपल्या प्रजाजनाना द्यावा हाहि हेतु आहे तरी ईशकृपेने हे दोन्ही हेतु कितपत सफल होतील हे पाहणे आहे सर्व गोष्टी परमेश्वराचे स्वाधीन आहेत त्याचे मनातून माझ्या हातून आपणा सर्वांची जी काय सेवा करावयाची असेल ती करून घेण्यास तो समर्थ आहेच परतु माझी इच्छा मात्र अशी आहे कीं, इग्लडहून परत आल्यावर आपले हातून अल्प प्रमाणात का होईना पण काही तरी चागले कृत्य व्हावें तसें होण्याबद्दल मी श्रीप्रभूची मनोभावाने प्रार्थना करितों

शेवटी महत्त्वाची एक गोष्ट जाहीर रीत्या व्यक्त करण्यास मला फार आनद वाटत आहे व ती ही कीं, माझे इग्लडचे प्रयाणाबद्दल माझे प्रजाजनास सतोष वाटत आहे व ते मोठ्या खुषीने तिकडे जाण्यास समति देत आहेत व हीच केवळ एक गोष्ट मला माझे प्रजाजनापासून, आप्तेष्टापासून व इतके दूर जाण्यास उमेद देत आहे आमच्या प्रवासास लोकाची समति आहे ही गोष्ट आजच्या या कायदे-मडळाच्या लोकपक्षीय सभासदानीं केलेल्या समारभावरून व उद्गारावरून स्पष्ट आहे तसेच अखिल भोर सस्थान प्रजापरिषदेच्या गेल्या

बैठकींत प्रोफेसर अभ्यकर यानीं प्रेसिडेंट या नात्याने माझ्या विलायतच्या प्रवासासबधीं जे उद्गार काढले आहेत त्यावरूनहि मला तिकडे जाण्याची विशेष उमेद वाटत आहे व तिकडे जाऊन त्यानीं म्हटल्याप्रमाणे सस्थानच्या प्रगतींत थोडीफार भर पडावी अशी मनापासून इच्छा उत्पन्न झाली आहे व ती सफल होणें ईश्वराधीन आहे

त्याचप्रमाणे गेल्या कौन्सिलच्या बैठकीच्या शेवटच्या दिवशीं दिवाणसाहेब याच्या समारोपाचे भाषणास उत्तर देताना लोकपक्षीय नामदार सभासदानी जीं आश्वासनपर भाषणे केली व दिवाणाना माझे गैरहजेरीत कोणतेहि अडचणीचे प्रसगीं राज्याच्या सुव्यवस्थेकरिता वाटेल ती मदत करण्याची तयारी दाखविली, त्या योगाने माझे मनास केवढा धीर आला आहे हे मला शब्दानी व्यक्त करता येत नाहीं अशी खरीखुरी जबाबदारी आपण नामदार सभासदानीं घेतली व त्याप्रमाणे वेळींअवेळीं प्रत्यक्ष कृतीने ती व्यक्त केली म्हणजे, कायदे कौन्सिल देऊन आपणास राज्यकारभाराचे जोखमीचे भागीदार केल्याचे सार्थक झाले असे मला वाटल्यावाचून राहणार नाहीं व योग्य काली आपणावर जास्त जास्त जबाबदारी टाकण्यास मला खात्रीने उमेद येईल

मेहेरबान पोलिटिकल एजटसाहेब नुकतेच येथें येऊन गेले त्यानीं आपले भाषणात मी इतक्या दूर व चळवळीच्या दिवसात देखील आपणा सर्वांवर विश्वासाने राज्यकारभाची जोखीम टाकून जात आहे याबद्दल जे प्रशसापर उद्गार काढले आहेत ते आपणा सर्वांस उत्साहजनक असल्यामुळे येथें वाचून दाखवितों

"But I am, I think, even more pleased to note your confidence which I am, from my own observation, inclined to consider fully justified in the loyalty and good sense of your subjects as shown by the facts that in these days of agitation you are able at last to contemplate the fulfilment of your long deferred plan to visit Europe"

दिवाण हे ब्रिटिश गव्हर्नमेंटमध्ये आपल्या कर्तबगारीने मोठ्या नावलौकिकास चढलेले असून ते कर्तव्यदक्ष, नि पक्षपाती, हुशार व लोकप्रिय किती आहेत हे मी आपणास सागण्याचे कारण नाहीं कारण आपणास त्याचा आता

प्रत्यक्ष अनुभव आलाच आहे तेव्हा त्याच्यावर व आपणा सर्वांवर सर्व राज्य-कारभाराचा बोजा टाकला असल्यामुळे मला आता पाठीमागील काहींएक काळजी उरली नाहीं, हे सागावयास फार आनद वाटत आहे

आता मी आपणा सर्वांचा निरोप घेत आहे व आपण तो मोठ्या प्रेमाने द्यावा अशी आपणास विनति आहे. ह्या वेळीं आपला निरोप मागणे व तो देणे या दोन्ही गोष्टी करताना आपणा उभयताचे मनात काय काय मनोविकार येत आहेत, ते शब्दचित्र रेखाटणे मला या वेळी अशक्य आहे प्रत्येकाने ते अनुभवानेच जाणणे योग्य आहे युरोपमध्ये जाऊन मोठमोठाले देश व शहरे पाहण्यास सापडतील, थोर लोकाच्या ओळखी होतील, ह्या गोष्टी मनात आल्या म्हणजे एक प्रकारचा आनद वाटतो परतु आपणा सर्वांचा, माझ्या प्रजाजनाचा व आपल्या सर्वांस प्रिय अशा मायभूमीचा, आता बरेच दिवस वियोग होणार ही गोष्ट मनात आली म्हणजे सर्व होत असलेला आनद नाहींसा होऊन दु खाने अत करणात कालवाकालव होत आहे परतु हे स्वाभाविक आहे व ते निमूटपणे सहन केले पाहिजे

आता आपण सर्वांनीं माझा युरोपचा प्रवास सुखकर होण्याबद्दल व इकडील राज्यकारभाराविषयी निष्काळजी राहण्याबद्दल जे उद्गार काढले त्या-बद्दल मी आपले पुन एकवार मन पूर्वक आभार मानून व आपले सर्वांचे इच्छेप्रमाणे सर्व काही घडो, अशी श्रीप्रभूची, ज्याने मानवी शक्तीस अतर्क्य अशा काही कारणाने इतके दिवस माझा प्रवास लाबविला व जो आज अनायासे व इच्छेप्रमाणे घडवून आणण्याची शक्ति व प्रेरणा देत आहे त्याची, मन पूर्वक प्रार्थना करून आपली सर्वांची रजा घेतों ”

---

# परिशिष्ट १७

श्रीमत राजेसाहेब, भोर, हे सर्व कुटुबियासह ता २२ जुलै रोजीं विलायतच्या प्रवासाहून स्वदेशीं सुखरूप परत आले, तत्प्रीत्यर्थ भोर म्युनिसि-पॅलिटीने दिलेल्या मानपत्रास भोर येथें ता ६ ऑगस्ट सन १९३७ रोजीं उत्तरादाखल केलेले श्रीमत राजेसाहेब याचे, ह्या दुसऱ्या सफरीच्या वृत्तान्ता-सबधींचे व "*Twenty-one Weeks*" ह्या पुस्तकासबधींचे भाषण

"भोर म्युनिसिपल सभासद व इतर सद्गृहस्थहो,

आम्हीं विलायतेहून सुखरूप परत येथें आल्याबद्दल आपण सर्वांनीं मानपत्र देऊन आमचे जे प्रेमळ स्वागत केले त्या समारभाचे प्रसगाने आमच्या प्रवासातील हकीकतीबद्दल चार शब्द आपल्यास उद्देशून सागावे असा आमचा हेतु आहे परतु तसे करण्याचे आधीं आपल्या मन पूर्वक स्वागताबद्दल व अभिनदन-पत्राबद्दल आमचा सतोष व्यक्त करून आपले आभार मानणे आमचे पहिले कर्तव्य आहे त्याचप्रमाणे गेल्या एप्रिल महिन्यात आम्ही येथून प्रवासास निघालों त्या वेळीं व पुणे आणि मुबई येथें फुले वगैरे देऊन ज्यानीं ज्यानीं आमचा शुभेच्छापूर्वक गौरव केला आणि स्वदेशीं सुखरूप परत आल्यानतर गेल्या महिन्यात ज्यानी आमचा असाच स्वागतपूर्वक सत्कार केला त्या सर्वांचे म्हणजे अधिकारी, नातलग, इष्टमित्र व सार्वजनिक सस्था या सर्वांचे आम्ही अत करणपूर्वक आभार मानतों. आमच्या गैरहजेरीत आमच्या मनोदयाप्रमाणे सर्वांनीं शातता ठेवली हीहि समाधानाची गोष्ट आहे तसेंच आम्ही तिकडे असताना सस्थानचा कारभार रा. ब दिवाणसाहेब व त्याचे सहकारी यानी चागल्या प्रकारे ठेविला याबद्दलहि आमचा सतोष व्यक्त करणे अवश्य आहे रा ब दिवाण यानीं खाजगीकडील श्रीरामनवमी-उत्सवात तिकडे त्याचा विशेष सबध नव्हता तरी आमचे इच्छेस अनुसरून जातीनिशीं अत्यत मेहनत घेऊन, तो उत्सव उत्तम रीतीने पार पाडण्याचे कामीं कळकळीने परिश्रम घेतले हे ऐकून आम्हास फारच समाधान वाटले सस्थानचे रेसिडेट मे ले -क के ए जी इव्हॅन्स-गॉर्डन यानींहि सस्थानवर लक्ष ठेवून राज्यकारभाराचे बाबतींत जरूर ती मदत स्थानिक अधिकाऱ्यास केली याबद्दल त्याचेंहि आम्ही आभार मानतों

चित्रांक २०९



श्रीमंत राजेसाहेबांना सन १९३० सालीं विलायतेस जाण्यापूर्वी भोर कायदे-मंडळानें समारंभानें निरोप दिला त्या वेळचा फोटो.

[ सं. पा. ५७६

## *Twenty-one Weeks in Europe*

सन १९३० मध्ये आम्ही जो युरोपचा प्रवास केला, त्याची हकीकत रा भावेशास्त्री यानी 'ऐक्य' पत्रातून क्रमश प्रसिद्ध केली व आम्हींहि आमचे डायरीचे उतारे दर आठवड्यास पाठवून सर्वांचे माहितीकरिता येथें व तालुकानिहाय बोर्डांवर हकीकत लावण्याची व्यवस्था केली होती त्यानतर सदरचे प्रवासासबधी *Twenty-one Weeks in Europe* म्हणजे '**युरोपांतील एकवीस आठवडे**' या नावाचे ५२० पानाचे इग्रजी पुस्तक प्रस्तुतचे दुसरे प्रवासास निघण्यापूर्वी ५ दिवस पाडव्याचे सुमुहूर्तानें आम्ही प्रसिद्ध केले आहे ते आपल्यास लवकरच वाचावयास मिळेल सदर पुस्तकात युवराज श्री भाऊसाहेब यानी घेतलेल्या फोटोंवरून तयार केलेली चित्रेहि भरपूर दिली आहेत त्याच्या प्रती आम्ही गगूताई वाचनालय व हायस्कुलास लवकरच देणार आहोत, त्या खुल्या जागेत सर्वांस पाहता येतील असे रीतीने दोन्ही सस्थानीं काही दिवस ठेवाव्या, अशी आमची इच्छा आहे याशिवाय तालुकेनिहायचे वाचनालयाकरिता व ऑफिसाकरिता आम्ही काहीं प्रती पाठविणार आहोंत त्यावरून तेथील लोकास सदर पुस्तक सवडीप्रमाणे पाहता येईल सदर पुस्तकासबधी व आमच्या दोन्ही प्रवासात युवराजाचीहि आम्हास पुष्कळ मदत झालेली आहे त्याबद्दलच्या सदर पुस्तकाचे प्रस्तावनेत केलेल्या उल्लेखाचा मराठींत सक्षिप्त गोषवारा आपल्यास वाचून दाखवितों, म्हणजे त्यावरून त्याचे मदतीची कल्पना आपल्यास येणार असून तिचे महत्त्व आम्हास किती वाटते हेहि आपल्यास समजून येईल

" आमच्या सफरीत व हे पुस्तक तयार करण्याचे कामी युवराजाचीहि बहुमोल मदत झाली आहे, हे या ठिकाणी सतोषपूर्वक नमूद करण्यास मला फार आनद वाटतो मागील प्रवासाचे सुमारास ते नुकतेच युनिव्हर्सिटीतून ग्रॅजुएट होऊन बाहेर पडले असल्यामुळे, ऐतिहासिक, बायबलातील किंवा अन्य वाङ्मयातील उल्लेख व पूर्वापार सबध त्याचे अगदी ताजे होते, व त्यामुळे कोणतीं स्थळे किंवा सस्था पाहावयाच्या किंवा कोणते ठिकाणीं काय महत्त्वाचे पाहावयाचे हे तेच आगाऊ ठरवून आम्हास सागत व कोणत्या पुतळ्याचा अगर चित्राचा कोठे काय सबध आहे ते सदर गोष्टी पाहताना स्पष्ट करून सागत

त्याचप्रमाणे फोटोग्राफीची कला त्यानीं चागली अवगत करून घेतली असल्यामुळे, महत्त्वाच्या सर्व दृश्याचे त्यानी फोटो घेतले व त्यातील बरेचसे पुस्तकात घातले आहेत यामुळे पुस्तकाच्या शोभेत बरीच भर पडली आहे. "

'युरोपातील २१ आठवडे' नावाचे मागील प्रवासाच्या माहितीचे पुस्तक आम्ही तयार केलेले आहे हे आताच आपल्या सर्वांच्या ऐकण्यात आलेच आहे सदर पुस्तक तयार करण्याच्या कामी रावसाहेब जोशी याचीहि आम्हास इतकी बहुमोल मदत झाली आहे कीं, त्या मदतीचे अभावीं कदाचित् हे पुस्तक बाहेरहि पडले नसते तेव्हा सदर मदतीचा आज रोजीं अशा रीतीने जाहीर उल्लेख करणे हे आमचे कर्तव्य समजून त्या कामगिरीबद्दल त्यास पारितोषिक म्हणून रु १००० देणगी देण्याचे ठरविले आहे

सदर पुस्तकाचे चार भाग केले आहेत पहिल्या भागात एकदर पर्यटनाचे सिंहावलोकन केले असून, लोकाच्या रीतीभाती, उद्योगधदे, राज्य-व्यवस्था, कलाकुसरी वगैरेचा निर्देश केला आहे, व दुसऱ्या आणि तिसऱ्या भागात समग्र प्रवासाची व त्यात पाहिलेल्या गोष्टींची व सस्थाची विस्तृत माहिती दिली आहे दुसऱ्या भागात लडन व ग्रेट ब्रिटन आणि आयर्लंडमधील वास्तव्याची व प्रवासाची हकीकत दिली असून, तिसऱ्या भागात युरोपातील इतर देशातील प्रवासाचे वर्णन केलेले आहे चवथ्या भागात प्रवासाची रोजनिशी थोडक्यात दिली असून, तिकडील वर्तमानपत्रात आमचेसबधी आलेले उल्लेख व तिकडे आम्ही केलेलीं भाषणे व महत्त्वाचीं पत्रे वगैरे दिलेलीं आहेत प्रारभीं रीतीप्रमाणे प्रस्तावना व अनुक्रमणिका आणि अखेर पारिभाषिक व नेहमीं व्यवहारात न येणारे शब्दाचा कोश ( Glossary ) दिलेला आहे अनुक्रमणिकेवरून पुस्तकात कोठे काय आहे याची कल्पना येणार आहे

या खेपेचा आमचा प्रवास, सन १९३० सालीं आम्ही युरोपला गेलों होतों त्या मानाने निम्मेच म्हणजे सुमारे साडेतीन महिन्याचा झाला परतु तेवढ्या अवधींत मागे पाहिलेल्या देशापैकी इटलीखेरीज बाकी सर्व देशातून आम्हास जावे लागले लडन येथें आमचा मुक्काम महिनाभर झाला व ऑस्ट्रियात व्हिएन्ना येथें अठरा दिवस, झेकोस्लोव्हाकियातील कार्ल्सबाद या

हवाशीर ठिकाणीं दहा दिवस, पॅरिस येथें एक आठवडा व व्हिची या हवेचे ठिकाणी एक दिवस याप्रमाणे मुक्काम झाला

आमच्या दोन्ही प्रवासात आमच्याबरोबरील माणसाची सख्या व त्याच्या तब्बेती लक्षा घेता आमच्यापेकी कोणीहि फारसे आजारी पडले नाही व काळजीचे असे केव्हाच काही कारण झाले नाहीं किंवा दर्यादुखीची बाधाहि फारशी कोणास झाली नाही यावरून परमेश्वराच्या लीलेचे कौतुक वाटते आणि त्याबद्दल प्रभु श्रीरामचद्राचे चरणीं नम्र भावाने आम्ही आपली उपकृतता प्रार्थनापूर्वक प्रथम विदित करतों

## दुसऱ्या सफरीचा वृत्तान्त

मागील प्रवासाहून परत आल्यानतर आमची तब्बेत सन १९३२ साली बारीक तापाने व अग्निमाद्याचे विकाराने बिघडली होती, व ती म्हणावी तशी नि शेप कधीच सुधारली नाहीं, यामुळे युरोपातील प्रख्यात डॉक्टरास प्रकृति दाखवून त्याचा सल्ला घ्यावा व काहीं दिवस औपधोपचार करावे असे कित्येकदा आमचे मनात येई सन १९३३ सालीं दक्षिणेतील सस्थानाचे तर्फे कोणीतरी सस्थानिकानी लडनला जाऊन त्यास सयुक्त राज्यघटनेत योग्य प्रतिनिधित्व मिळावे याकरिता राउड टेबल कॉन्फरन्समध्ये व जॉइट सिलेक्ट कमिटीपुढे खटपट करावी असा ठराव माझे बधु व फलटणचे अधिपति श्रीमत नानासाहेब याचे सूचनेवरून इकडील सर्व सस्थानिकाचे सभेत झाला होता व त्यात आम्हींच तिकडे या कामासाठीं जावे अशी सर्वांची इच्छा होती वरील प्रकृतीसबधीचे विचार मनात घोळत असल्यामुळे त्या वेळीं आम्हीहि जाण्याचा विचार करीत होतों परतु आमचीं मुले लहान असल्याकारणाने, श्रीमत सौ राणीसाहेब याचे पश्चात् त्यास एकटे ठेवून जाणे आम्हास योग्य दिसले नाहीं, तसेच त्यास बरोबर घेऊन जावयाचे म्हटले तर तेव्हा त्याचे वय अगदी लहान असल्यामुळे त्याना घेऊन जाणेहि योग्य वाटले नाहीं तेव्हा त्या वेळी तो बेत रहित केला होता त्यानतर गेल्या वर्षी **बादशहा पंचम जॉर्ज** याचे शोचनीय निधनानतर लडन येथें प्रेक्षणीय राज्यारोहणसमारभ सन १९३७ चे मे महिन्यात व्हावयाचा असे प्रसिद्ध झाल्यामुळे, त्यानिमित्त तिकडे जाण्याचा विचार आम्हीं मुक्रर केला व आमची मुलेहि साधारण

जाणतीं झाल्यामुळे त्यासहि घेऊन जाण्याचे ठरविले पुढे पॅरिस येथें आतरराष्ट्रीय जगी प्रदर्शनहि त्या सुमारासच व्हावयाचे जाहीर झाले व तेहि येताजाताना पाहून यावे या हेतूने युरोपला दुसऱ्यादा जावयाचा बेत पक्का केला

येथून निघाल्यानतर ता १७ एप्रिल रोजीं राची बोटीने आम्ही मुबईहून निघालो ते लडन येथें ता १ मे रोजी सायकाळीं सुखरूप जाऊन पोचलो वाटेत एडन एथें उतरून शेख ओथ्मान या सुमारे १०-११ मैलावर असलेल्या ठिकाणीं डॉ आफळे वगैरे दाक्षिणी मडळींनी आम्हास पानसुपारी केली तेथील आपल्या लोकाची जूट पाहून आम्हास फार सतोष झाला लडन येथें व्हिक्टोरिया स्टेशनवर जमखिंडीचे राजेसाहेब, मि टिम्स्, रिटायर्ड एक्झिक्यूटिव्ह एजिनियर, व थॉमस कुक् कपनीचे कॅप्टन ॲलन्सन् हे आम्हास घेण्यास आले होते लडन येथें आम्ही केन्सिग्टन् पॅलेस मॅन्शन्स हॉटेलमध्ये उतरलों होतों

## लंडन मुक्कामी राज्यारोहणासंबंधीं समारंभ

लडनमधील मुक्कामात कॉरोनेशन व तत्सबधी आलेल्या पाहुण्याचे निमित्ताने, आधी व मागाहून झालेल्या सरकारी अगर निमसरकारी व खाजगी सस्थानीं दिलेल्या गार्डन पार्ट्या, मेजवान्या किंवा रिसेप्शन्स या समारभाची बहुतेक रोज व कित्येक वेळा एकाच दिवशी दोन अशी निमत्रणे येत होतीं व त्याप्रमाणे सवडीप्रमाणे बहुतेक महत्त्वाचे समारभास आम्ही हजर राहिलों या समारभात इग्लडातील मोठमोठ्या लोकाच्या व वसाहती आणि इतर देश यातून आलेल्या बड्या लोकाच्या गाठी पडल्या या समारभात विशेषत कलोनियल सेक्रेटरी, हाउस ऑफ कॉमन्सचे स्पीकर व लॉर्ड चान्सेलर यानीं पार्लमेंट हाउसेस वगैरेमध्ये दिलेल्या पार्ट्या व सेक्रेटरी ऑफ स्टेट फॉर इडिया लॉर्ड झेटलड यानीं इडिया ऑफिसचे इमारतीत दिलेली पार्टी या महत्त्वाच्या होत्या वेस्टमिन्स्टर ॲबेमध्ये ता १२ मे रोजीं राज्यारोहणाचा जो प्रत्यक्ष विधि झाला त्यासहि आम्हास आमत्रण आले होते व त्याप्रमाणे आम्ही हजर राहिलों होतो यानतर स्पिट्हेड येथें नेव्हल् रिव्ह्यू ता २० मे रोजीं झाला, त्यासहि सरकारी निमत्रणावरून आम्ही गेलों होतो तसेच ता २६ मे रोजीं बकिंगहॅम राजवाड्यात कोर्ट बॉल झाला, तोहि पाहणेचा मान आम्हास मिळाला त्यातले त्यात ईस्ट इडिया ॲसोसिएशन व

## चित्रांक २१०



श्रीमत युवराज भाऊसाहेब गिल्वेल पार्कमध्ये स्काऊटचे शिक्षण घेत असताना ( सन १९३० ).
[ स पा प ८८

## चित्रांक २११




लंडनमधील व्हिक्टोरिया मेमोरिअलनजीक सहावे जॉर्ज बादशहा यांच्या राज्यारोहणानिमित्त निघालेल्या मिरवणुकीचें दृश्य ( सन १९३७ ). [ स. पा. प. ८६

तिचेप्रमाणेच असलेल्या आणखी ३-४ सस्था या सर्वांनीं मिळून एपायर प्रीमिअर्स म्हणजे इग्लडचे व वसाहतीचे मुख्य प्रधान याना जी टोलेजग मेजवानी ता २४ मे रोजीं ग्रोव्हनर हाउसमध्ये दिली तिला आमचे जाणे झाले होते. ती विशेष प्रेक्षणीय होती या मेजवानीस सुमारे १२०० लोक हजर होते त्या वेळी माजी मुख्य प्रधान दि राइट ऑनरेबल मि (आता अर्ल) बॉल्डविन् व वसाहतीचे मुख्य प्रधान याचीं आणि हिंदुस्थानचे वतीने इपीरिअल कॉन्फरन्समध्ये नेमलेले सस्थानिक प्रतिनिधि हि हा सर सयाजीराव गायकवाड याचीं महत्त्वाची भाषणे झाली. तसेच **बादशहा सहावे जॉर्ज व महाराणी एलिझाबेथ** याचे सन्मानार्थ जुन्या साप्रदायाप्रमाणे व काही नवीन मनूस अनुसरून प्रत्यही अद्यापि समारभ होत आहेत त्यात लॉर्ड मेयरचे मेजवानीस जाताना मूळ लडनचे सीमेवर तलवार अर्पण करणेचा समारभ व नुकतीच स्कॉटलडला बादशहानी भेट दिली तेव्हा एडिनबर्गचे किल्ल्याची किल्ली त्याचे स्वाधीन करण्यात आली तो समारभ, हे जुन्या साप्रदायाचे होते हे सर्व समारभ प्रत्यक्ष पाहून व ऐकून जुन्या साप्रदायाचे गतानुगतिक न्यायाने अनुकरण सुधारलेल्या राष्ट्रातहि आजच्या शास्त्रीय युगात जशाचे तसे चालू आहे यातहि कसे औचित्य आहे ते आमचे मनास विशेष प्रतीत झाले आपल्याकडे अगदीं अलीकडे छत्रपति शिवाजीमहाराजानी स्वत स विधिपूर्वक राज्याभिषेक करून घेतला, व तिकडे नेपोलियनलाहि पोपकडून मुकुटस्वीकारसमारभ करून घेण्याची राजकीय दृष्टया जरूर वाटली यात मोठे तत्त्व साठविलेले आहे, व ते सुधारलेल्या राष्ट्रातील पुढाऱ्यासहि मान्य करावे लागले आहे लडन येथील राज्याभिषेकसमारभ म्हणजे "हे राजे तुम्हास पसत आहेत काय?" असें आर्चबिशप् ऑफ कॅंटरबरींनी चारही दिशाचे लोकास विचारणे, "मी राजधर्म यथाशास्त्र पाळीन" अशी बादशहानी शपथ घेणे, धर्माधिकाऱ्यानी त्याना तेल लावणे, खुर्चीवर बसविणे, राजचिन्हे अर्पण करणे, मुकुट घालणे इत्यादि विधी होत असताना, मूर्तीत जशी आपल्याकडे प्राणप्रतिष्ठा करतात व तिला देवत्व आणतात, त्याप्रमाणे सिंहासनाधिष्ठित व्यक्तीला सदर समारभानीं त्याच्या गाभीर्याने दैविक शक्ति प्राप्त करून दिली जाते असे म्हणण्यास हरकत नाहीं व यात पुष्कळ अर्थ भरलेला आहे, व तो असा समारभ प्रत्यक्ष

पाहणाराच्या व करून घेणाराच्या विशेष अनुभवास येणारा आहे तसेंच या निमित्ताने जी जगी मिरवणूक निघाली व जिच्या अग्रभागीं साम्राज्यातील सर्व भागातील चतुरग दळाच्या पलटणी एक तासभर चालू होत्या त्यावरून साम्राज्याचे वैभव व सामर्थ्य आणि साम्राज्याची एकी जगाच्या चागली निदर्शनास आली, व इग्रजी राष्ट्रासहि आपल्या बळाचा आत्मप्रत्यय आला हा परिणाम लक्षात घेतला म्हणजे अशा समारभाचे औचित्य जास्त ध्यानात येते आपल्याकडेहि या समारभाचे विधी अनुरूप असे ठिकठिकाणच्या नद्याच्या व समुद्राच्या पाण्याच्या कलशाचे अभिषेक वगैरे आहेतच असो स्पिटहेड्चे आरमारी रिव्ह्यूतहि इग्रजी आरमारातील लढाऊ जहाजाशिवाय इतर बऱ्याच राष्ट्राची लढाऊ जहाजे हजर होती व त्या अवाढव्य काफिल्यासभोवतीं बादशहाच्या बोटीने प्रदक्षिणा घातली, व तिचे मागून जाणाऱ्या बोटीत कॅमेरोनिया नावाच्या बोटीतून सरकारी पाहुणे या नात्याने आम्हासहि जाता आले तो देखावा खरोखर अत्यत अपूर्व होता राज्याभिषेकसमारभाच्या निमित्ताने जमले असताना साम्राज्याचे व वसाहतीचे मुख्य प्रधान याची व हिंदुस्थानचे प्रतिनिधीची साम्राज्यपरिषद् भरवून साम्राज्याच्या अडचणी, आकाक्षा, गरजा व पुढील धोरण याची सागोपाग वाटाघाट झाली, हीहि गोष्ट त्या वेळी फार महत्त्वाची अशी घडली साराश, या सर्व गोष्टी राज्यारोहण-समारभामुळेच घडून आल्या, व त्या सर्वांचे निरीक्षण आम्हास तिकडे गेल्या-कारणाने समक्ष करिता आले

## भेटीगांठी

आमच्या लडनमधील मुक्कामात माजी व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन व लॉर्ड विलिंग्डन आणि मुबईचे माजी गव्हर्नर लॉर्ड लॅमिंग्टन, लॉर्ड लॉइड व सर फ्रेडरिक साइक्स याच्याशी आमच्या भेटी झाल्या व त्याचप्रमाणे लेडी विलिंग्डन, लेडी लॅमिंग्टन व लेडी साइक्स यासहि आम्ही भेटलो राज्याभिषेका-निमित्त झालेल्या समारभात मुबईचे भावी गव्हर्नर सर रॉजर लम्ले व त्याच्या पत्नी याच्याशीहि आमची ओळख झाली तसेच सेक्रेटरी ऑफ स्टेट लॉर्ड झेटलड, व त्या वेळचे अडर-सेक्रेटरी मि बट्लर यानीहि आमची गाठ घेतली हिंदुस्थानचे हाय कमिशनर सर फिरोजखान नून याची आमचीहि तेथे

चित्रांक २१२




राज्यारोहणाचे वेळी सहावे जॉर्ज बादशहा यांचें पिअर मडळी दर्शन घेत असताना ( सन १९३७ ).

[ स. पा. प. ८८

ओळख झाली ले -क टेट, कोल्हापूरचे माजी रेसिडेंट, याची इंडिया ऑफिसात ले -क नील्, पोलिटिकल ए डी सी टु दी सेक्रेटरी ऑफ स्टेट, याचे मदतीस राज्यारोहणासाठीं येणाऱ्या हिंदी संस्थानिकाचे तजविजीकरिता खास नेमणूक झाली होती, त्यामुळे तेहि आम्हास तेथें भेटले व त्याचा आम्हास फार उपयोग झाला सर रॉबर्ट बेल व मि मार्टिन् याचेकडे आम्ही त्याचे बोलावणे-वरून चहास गेलों होतों आणखीहि कित्येक रिटायर्ड अधिकाऱ्यानी आम्हास बोलावले होते परतु, वेळाचे अभावी आम्हास जाता आले नाहीं त्यापैकी मि किंकेड, मि पर्सिव्हल, मि ब्रॅडर, मि हॅच वगैरेस आम्हीच आपलेकडे बोलाविले होते

## लंडनमधील मुक्कामांत पाहिलेल्या नवीन् गोष्टी

मागील खेपेस लडनमधील प्रेक्षणीय स्थळे व कार्यक्रम आम्हीं बरेचसे पाहिलेच होते त्यामुळे या मुक्कामात त्या गोष्टींकडे आमचे विशेष लक्ष नव्हते फक्त बाळास महत्त्वाची प्रेक्षणीय स्थळे दाखवून आणण्याची व्यवस्था स्वतत्रपणे केलेली होती प्रेक्षणीय गोष्टी जरी आम्हास विशेप पाहावयाच्या नव्हत्या तरी ब्रिटिश ब्रॉडकास्टिंग कॉर्पोरेशनमार्फत टेलिव्हिजनचा प्रयोग आम्हीं हॅमस्टेडचे पलीकडे असलेल्या ॲलेक्झाड्रा पॅलेसमध्ये मुद्दाम जाऊन पाहिला रेडिओ आता आबालवृद्धाच्या परिचयाचा झाला आहे त्यात हजारो कोसावरून माणसाचे गाणे, बोलणे वाटेल तिकडे प्रत्यक्ष ऐकू येते टेलिव्हिजनमध्ये प्रत्यक्ष माणूस काय करीत आहे तेहि पाहता येते परतु ५० मैलापेक्षा जास्त अतरावर या-बद्दलचा प्रयोग अद्याप करता येत नाही हे अतर वाढवण्याचा यत्न चालू आहे व तोही इतर यत्नाप्रमाणे सिद्धीस जाईल अशी आशा आहे खाली माणसे बागेत काम करीत होती ते आम्हास प्रथम प्रत्यक्ष दाखविण्यात आले व नतर तेच दृश्य वरील मजल्यावर आम्हास पडद्यावर प्रत्यक्षासारखें पाहता आले त्याचप्रमाणे सिनेमातील एक प्रवेश सिनेमायत्रात घेण्याचे काम चालू होते तेच आम्हास दुसरीकडे प्रत्यक्षासारखे काचेच्या भिंगातून दाखविणेत आले हे प्रयोग अभिनव असल्यामुळे मुद्दाम व्यवस्था करून आम्हीं पाहून घेतले याच कपनीचे रेडिओचे ब्रॉडकास्टिंग हाउस शहरात आहे, तेथे मग आम्हास नेऊन तेहि दाखविण्यात आले

याखेरीज लडनमध्ये इतर पुष्कळ थोर व्यक्तींप्रमाणे कीट्स कवीचे घर मुद्दाम तसेच राखून ठेवण्यात आले आहे, ते आम्ही जाऊन पाहिले तसेच सायन्म म्यूझिअम नावाची सस्था आमचे राहण्याचे ठिकाणानजीकच होती, तीहि विशेषेकरून पाहिली ज्ञात जगाच्या प्रारभापासून खाणेपिणे, राहणी, आउते, शास्त्रे, दळणवळणाची साधने वगैरे बाबतीत क्राति व प्रगति कशी होत गेली व आजतागायतचे शोध कसे व काय काय लागले याची रूपरेषा सदर पदार्थसग्रहालयात निरनिराळीं मॉडेल्स, रिलीफ्स, नकाशे वगैरे देऊन सुलभ रीतीने दाखविलेलीं आहेत व तळमजल्यात मुलाकरिता एक विभाग वेगळा ठेवलेला आहे पुढे पॅरिसचे प्रदर्शन आम्ही पाहिले त्या वेळी ते प्रदर्शन म्हणजे अशा म्यूझिअमची सर्व राष्ट्राची मिळून वेगवेगळी शतगुणित केलेली आवृत्तिच आहे असे आम्हास वारवार वाटले याशिवाय विशेष पाहिलेल्या गोष्टी म्हणजे महाराणी व्हिक्टोरिया याचा जन्म झाला तो केन्सिग्टन पॅलेस व नजीकच केन्सिग्टन बाग आणि तीत असलेले त्याच्या पतीचे भव्य स्मारक व समोरच त्याच्या नावाचा प्रचड आल्बर्ट हॉल या सस्था बारकाईने पाहिल्या कारण त्या नजीकच असल्यामुळे अनेकवार सहज फिरण्याचे वेळी देखील आम्हास तेथे जाता येई सदर बागेत वसाहतींतील काही सैन्याच्या तुकड्याचा तळ लहान लहान राहुटया देऊन पडलेला होता, तोहि एक नमुना पाहण्यास मिळाला

सर्वांत आणखी एक या मुद्द्याचीच गोष्ट सागावयाची म्हणजे, राज्याभिषेकसमारभानतर वेस्टमिन्स्टर ॲबे त्या समारभाकरिता सजवलेल्या स्थितीत लोकास पाहण्यासाठी तिकिटे ठेवून कायम काहीं दिवस ठेवला होता, तो एक वेळ मुद्दाम विस्तृत रीतीने आम्ही जाऊन पाहिला.

यातील बहुतेक गोष्टींची वर्णने वर्तमानपत्रातून व मासिकातून रसभरित तात्काळ आपल्या वचनात आलीच असतील व सिनेमाचे द्वारे प्रत्यक्ष दृश्यहि आपणापैकी काहींना पाहावयास मिळाले असेल किंवा लवकरच मिळेल तसेच रेडिओवरहि कित्येकानी ॲबेमध्ये घडत असलेल्या समारभाची हकीकत ऐकलीच असेल म्हणून त्याबद्दल विस्तृत माहिती देऊन येथें आपला वेळ घेण्याची आम्हास आवश्यकता दिसत नाहीं तेव्हा यापुढच्या सुमारे सव्वा महिन्याच्या आमचे प्रवासाची सक्षिप्त रूपरेषा आपल्यापुढे माडण्याकडे आम्ही वळतो

## व्हिएन्ना

लडनहून पॅरिसला जाणेचा आमचा विचार होता, परतु ठरलेप्रमाणे येथील प्रदर्शनाचे काम पुरे होण्यास अद्यापि सुमारे महिना लागेल असे आम्हास समजलेमुळे प्रथम व्हिएन्नास जाऊन शेवट शेवट पॅरिसला जाणेचे आम्ही ठरविले पॅरिसचे प्रदर्शन फ्रेंच राष्ट्राचे प्रेसिडेंट लेब्रन यानी ता. २४ मे रोजीं अर्धवट स्थितीतच खुले केले, परतु नतर जूनअखेर आम्ही पॅरिसला आलो तरी प्रदर्शन बरेच अपुरे असून ते पुरे होण्यास आणखी कित्येक महिने लागणार आहेत असे आम्हास समजले, तेव्हा मात्र फार आश्चर्य वाटले युरोपिअन राष्ट्रात नियमितपणा म्हणजे ठरलेले वेळी ठरलेल्या गोष्टी व्हावयाच्या हा जो सिद्धान्त, तो पॅरिस प्रदर्शनाचे बाबतीत इतका ढिला झाला याबद्दल राहून राहून नवल वाटल्यावाचून राहत नाही प्रदर्शन आम्ही जेव्हा प्रत्यक्ष पाहिले तेव्हा त्याचा भव्यपणा पाहून व निरनिराळ्या ४३ राष्ट्राचे निरनिराळे विभाग प्रचड प्रमाणावर तयार व्हावयाचे आणि मूर्ती तितक्या प्रकृती या न्यायाने ज्याची त्याची कल्पना वाढून काम वाढावयाचे असा प्रकार झाला असण्याचा सभव आहे असो एवच पॅरिसला न जाता लडनहून ता ३१ मे रोजी तिसरे प्रहरी निघून थेट व्हिएन्नास दुसरे दिवशी सायकाळी आम्ही येऊन पोहोचलो

आम्ही लडनला गेलो तेव्हा राची बोटीत राज्याभिषेकसमारभाकरिता जाणारे मलायातील एक राजे व इतर प्रतिनिधी असे पेनागहून आलेले होते तसेच पोर्ट सय्यद येथें पॅलेस्टाइनचे काही सैनिक प्रतिनिधी बोटीवर चढले याखेरीज मुबईचे ऑनरेबल सर कॉवसजी जहागीर व कौन्सिल ऑफ स्टेटचे लाहोरचे सभासद नामदार रावबहादुर लाला रामशरणदास हे हिदुस्थानचे प्रतिनिधी त्याच बोटीत होते त्याशिवाय लेजिस्लेटिव्ह असेब्लीचे सेक्रेटरी बॅ महमद राफि हेहि आमचेबरोबर होते व या सर्वांची आमची बोटीत ओळख झाली त्यात प्रकृतिसबधाच्या गोष्टी निघाल्या, तेव्हा लाला रामशरणदास यानी "व्हिएन्ना येथें पचनविकाराची परीक्षा डॉ पोर्जेस फार चागली करतात असा आपल्या कुटुबाचे बाबतीत आपल्यास प्रत्यक्ष अनुभव आलेला आहे, तरी त्यानाच तुम्ही तब्बेत दाखवा " असे सुचविले होते औषधोपचाराचे

बाबतींत व्हिएन्नाची ख्याति प्रसिद्धच आहे, म्हणून व युवराजानींहि " ही संधि घालवू नये " असे आग्रहपूर्वक सुचविलेमुळे तेथें आम्ही गेलों व डॉ पोर्जेस यासच तब्बेत दाखविली ते एक्स-रेने पोटाची स्थिति अन्न घेण्यापूर्वी व नतर दोन वेळ ४-६ तासाचे अतराने पाहतात व मग औषधयोजना करतात त्याचेच माहितीने युवराजाचे पायाचे बाबतींतहि आम्हीं डॉ श्रम् या प्रख्यात शस्त्रवैद्याचा सल्ला घेतला डॉ पोर्जेस हे निव्वळ धदेवाल्यासारखे वागले नाहीत त्यानीं आम्हास एखाद्या स्नेह्याप्रमाणे वागविले आणि जेवणास बोलाविले, मग आम्हीहि त्याना मेजवानी दिली त्याचे हॉस्पिटलहि आम्ही पाहिले रोग्याकरिता उत्तम इमारती बाधून नामाकित उपकरणाचा व अद्ययावत् शास्त्रीय शोधाचा त्यास फायदा मिळेल अशा योजना युरोपात फारच शिखरास पोंहोचविलेल्या आहेत त्याचा थोडासा नमुना पाहून फार आनद वाटला. डॉ पोर्जेस यानीं सुचविलेल्या योजनेप्रमाणे त्याचे नजरेखाली काही दिवस पथ्यपाणी करावे या हेतूने आम्ही तेथे बरेच दिवस राहिलों व त्या मुदतींत व्हिएन्ना येथील मुक्कामात फावल्या वेळात खुद्द व्हिएन्नातील व अजूबाजूचा प्रदेश व काही प्रेक्षणीय गोष्टी पाहिल्या त्यात काही जत्रेतील मुलाचे पाळणे वगैरे खेळ असलेले प्रेटर ( Prater ) व ल्यूना पार्क ( Luna Park ), स्टड पार्क ( Stadt Park ), बुर्गगार्टन ( Burg-garten ) व व्होल्क्सगार्टन ( Volks-garten ) या रमणीय बागा, वृक्षराजीनी शोभित झालेले विस्तृत रस्ते व त्याच्या दोन्ही बाजूस असलेल्या आल्हाददायक इमारती, मराया थेरीसा ( Maria Theresa ), फ्रॅन्सिस जोसेफ ( Francis Joseph ) व मार्शल रॉडझेस्की ( Marshal Rodzesky ) या इतिहासप्रसिद्ध व्यक्ति आणि मोझर्ट ( Mozart ), गटे ( Goethe ), शिलर ( Schiller ), बीथहोव्हन् ( Beethoven ) इत्यादि विख्यात कवि याचे चित्ताकर्षक स्मारक-पुतळे ( Monuments ), ऑपेरा थिएटर ( Opera Theatre ), बर्ग थिएटर ( Burg Theatre) इत्यादि नाणावलेली भव्य व सुदर नाटकगृहे व शॉन्ब्रन् (Schonbrunn ) सारखे प्रचड उद्यानपरिवेष्टित राजवाडे पाहिले त्याचप्रमाणे क्राउझेन्स्टाइन ( Kreuzenstein ) व लायचेन्स्टाइन् ( Liechtenstein )-सारखे मध्ययुगीन डोंगरी किल्ले व त्यातील खिस्त मदिरे, कॉब्लेन्स (Coblenz)

चित्रांक २१३




काह्लेनबर्ग टेरेसवरुन दिसणार व्हिएन्नाचें दृश्य (सन १९३७). [स पा. प. ९०

चित्राक २१४



गटेच्या पुतळ्याशेजारीं, व्हिएन्ना (१९३७)

१ श्री. अ. रा. जोशी, २ श्री. राजेसाहेब, ३ श्री. युवराज. [स. पा. प. ९०

व काल्हेन्बर्ग ( Kahlenberg ) टेकड्यावरील देखावे पाहण्याच्या जागा व व्हिएन्नाचे आसपासचे सुदर रस्ते असलेले रमणीय अरण्य-विभाग व बेडन ( Baden ) येथील ऊन पाण्याचे झरे ( Hot springs ) पाहणेत आले आणखी विशेष सागण्यासारख्या गोष्टी म्हणजे व्हिएन्ना म्युनिसिपालिटीने गरीब लोकाकरिता बगीचे, सिनेमागृहे, पोहण्याच्या सोयी व स्नानगृहे यानी समृद्ध अशा बाधलेल्या लाबच लाब चाळी व डायनाबाद् ( Dianabad ) या नावाने ओळखली जाणारी कृत्रिम लाट व झिमझिम पाऊस येत असलेली पोहण्याची सरोवरे आणि किरणस्नान ( Sunbath ), बाष्पस्नान ( Steambath ) व मृत्तिकास्नान ( Mudbath ) घेण्याची व पोट अथवा हृदय यास आयास न पडू देता विजेचे शक्तीनें चालणाऱ्या यत्राच्या साह्याने दुसऱ्या किंवा दमलेल्या अवयवास व्यायाम देण्याच्या अनेक सोयी असलेली व्यायामगृहे, गासहौफेलबाद ( Gansehaufelbad ) सारख्या अनेक पोहण्याच्या सस्था ( Lido ), आणि तेथील जगप्रसिद्ध स्पॅनिश रायडिंग स्कूल ( Spanish Riding School ) व त्याचा प्रदर्शनखेळ ( Display ) या होत सदर खेळ, मध्ये एक पटागण व त्याचे चारहि बाजूस दुमजला लोकास बसण्यास जागा, अशा ठिकाणी झाला, व त्या खेळामध्ये घोड्याच्या निरनिराळया गती व घोडेस्वाराचे अश्वविद्या-नैपुण्य उत्तम रीतीने पाहता आले व त्यामुळे शॉनब्रन् ( Schonbrunn ) राजवाड्यातील तद्विषयक काहीं सुन्दर चित्रे पुढें आमचे पाहण्यात आली, त्याचाहि जास्त बोध झाला व्हिएन्ना येथें मिन्याचे ( Enamel ) कामहि चागले होते व तशाहि काही वस्तू आम्ही पाहिल्या व्हिएन्ना येथें उदयशकर या हिंदी नृत्यकलापटु गुणिजनाचे नृत्यगायनाचा कार्यक्रम, त्याचा मुक्काम त्याच वेळीं तेथें असलेमुळे, पाहण्यास मिळाला हा एक योगायोगच होय आपल्या लोकास तिकडील गायनवादन समजत नाही, तसेच आपलेहि त्यास सहज समजणारे नाही परतु, तिकडील श्रोत्यासहि, आपण त्याचे गाणे ऐकतो तितपत तरी, हिंदी नृत्य पाहण्या-ऐकण्याइतके मोहित करण्यासारखे कलाचातुर्य उदयशकर याचे अगीं आहे हे पाहून व या एका हिंदी कलेची विजयध्वजा युरोपातील रगभूमीवर एक हिंदी इसम फडकवीत आहे, हे लक्षात येऊन मनास विशेष सतोष झाला, हे आम्हीं सागितले पाहिजे असे नाहीं उदयशकर याचे

लडन वगैरे ठिकाणींहि नतर जलसे झाले व ते लोकास आवडले असे वर्तमानपत्रावरून समजले, तेव्हा हा आनद साहजिकच द्विगुणित झाला काशी येथें नृत्यगायनाचे नवे केद्र स्थापन करण्याचा त्याचा विचार असल्याचे नुकतेच वर्तमानपत्रावरून आपल्या वाचनात आलेच असेल

येथील मुक्कामात आणखी एक सागण्यासारखी गोष्ट म्हटली म्हणजे, व्हिएन्ना येथें डॉ अग्निहोत्री या सद्गृहस्थाचे परिश्रमाने स्थापन झालेल्या ऑस्ट्रो-इडियन् इन्स्टिटयूट या सस्थेतर्फें ता १७ जून १९३७ रोजी हि हा दि महाराजा ऑफ म्हैसूर याच्या ५३ व्या वाढदिवसानिमित्त झालेला ॲट होम-( गृहातिथ्य )समारभ होय या समारभास आम्ही सस्थेच्या आग्रहाचे निमत्रणावरून मुद्दाम मुक्काम वाढवून हजर राहिलो होतो, व त्या वेळी महाराजाच्या कर्तबगारीबद्दल आम्हास वाटणारा अभिमान व प्रेम व्यक्त करून वाढदिवसानिमित्त त्याचे समयोचित शब्दात अभिनदन केले सदर समारभास जमखिंडीचे राजे व इतर बरेच हिंदी लोक हजर होते त्याचप्रमाणे व्हिएन्नातील पुष्कळ प्रमुख व्यक्ती व काहीं परराष्ट्रीय वकीलहि हजर होते त्यात ग्रेट ब्रिटनचे वकील सर सालफर्ड सेल्बी हेहि आलेले होते तेथें आमचा व त्याचा परिचय डॉ अग्निहोत्री यानी करून दिला व्हिएन्नासारख्या परकीय राष्ट्राचे राजधानीत एका प्रमुख हिंदी सस्थानिकाचे वाढदिवसाचे निमित्ताने विद्वान् व वजनदार लोकाचा बराच मोठा समाज जमू शकतो, याबद्दल आम्हास विशेष आनद झाला व यावरून हिंदी लोक व व्यापार याचे अभिवृद्धीसाठीं ऑस्ट्रो-इडियन इन्स्टिटयूट कशी महत्त्वाची कामगिरी करीत आहे याचीहि कल्पना आली तसेच जे हिंदी विद्यार्थी वैद्यकीय ज्ञानासाठीं तेथे जातात त्याचेहि एक मडळ तेथे आहे व अशा विद्यार्थ्यांस हरएक प्रकारची मदत देणारी सस्थाहि तेथे चागले काम करीत असते, हे समजून सतोष वाटला

युरोपात अनेक आरोग्यप्रसिद्ध गावे आहेत त्यास स्पा (Spa) असें म्हणतात त्यात फ्रान्समधील व्हिची (Vichy) नावाचे गावास क्वीन ऑफ स्पा (Queen of Spa) असे म्हणतात त्या ठिकाणीं काही दिवस जाऊन राहण्याचा आमचा विचार होता परतु, डॉ पोर्जेस याचे मत पूर्वीचे आस्ट्रिया-तील व हल्लीं झेकोस्लोव्हाकिया ( Czechoslovakia ) देशातील कार्ल्सबाद

चित्रांक २१५



स्प्रूडल झरा, कार्ल्सबाद [ स. पा. प. ९३

( Karlsbad ) नावाचे गावीं राहणे जास्त फायद्याचे होईल असे पटल्यामुळे आम्हीं तिकडे जाण्याचे ठरविले झेकोस्लोव्हाकियात प्रवास करीत असताना मागील खेपेस या स्पाची व नजीकच ३० मैलावर असलेल्या मेरियनबाद ( Marienbad ) याची माहिती आम्हास कळलीच होती, व त्याचे-बद्दलचा उल्लेख आम्हीं आपल्या पुस्तकात केलेलाहि आहे अशी नामांकित स्थळे वेळेचे अभावी आम्हास पाहता आलीं नाहींत, असे खेदाचे उद्गार आम्ही आपल्या पुस्तकात काढलेले आहेत. तेव्हा डॉ पोर्जेस याच्या सल्लयाने तीहि ठिकाणे पाहण्याची या वेळी अनायासे चालून आलेली संधि आम्हीं वाया दवडली नाहीं

## कार्ल्सबाद

सदर ठिकाणी रेल्वेने जाता येते परंतु वाटेत आगगाडी बदलावी लागते, म्हणून आम्ही मोटारनेच गेलों कार्ल्सबाद ( Karlsbad ) हे ठिकाण व्हिएन्नाहून सुमारे २५० मैल आहे सकाळी ९-३० वाजता निघून रात्री १० चे सुमारास आम्ही पोहोचलों सामानाची लॉरी बरोबर असल्यामुळे आम्ही थांबत थांबत गेलों व म्हणून थोडा जास्त वेळ लागला वाटेत दुपारचे जेवणाकरिता बुडविस् ( Budeis ) येथें व चहाकरिता पिल्सेन ( Pilsen ) येथे थांबलो होतों, व त्याबद्दल आगाऊ तजवीज केली होती कार्ल्सबाद ( Karlsbad ) या ठिकाणी निरनिराळ्या उष्णतामानाचे वेगवेगळे १६ झरे असून स्प्रुडेल ( Sprudel ) नावाच्या झऱ्याचे पाणी कारंजासारखे बरेच उंच उडते हे झरे पालीनजीक उन्हेरे येथे उन्हाळे आहे, त्याप्रमाणे आहेत सर्व झरे चांगले बांधून काढले असून मार्बल टाइल्सचे कोनाड्यात तोटयानीं त्याचे पाणी जाणाऱ्या येणाऱ्या लोकास ताजे घेण्याची व्यवस्था केली आहे तोटयाजवळ गणवेष घातलेल्या मुली बसलेल्या असतात व नजीकच कांचेची व एनॅमलची किंवा पोर्सलेनची भांडीं ठेवलेलीं आहेत त्यातील भांडे घेऊन मुली पाणी देतील ते सावकाश फिरता फिरता प्यावयाचे अशी पद्धत आहे पाणी पिणारे लोक त्या मुलीस मर्जीप्रमाणे मग थोडीशी बक्षिशी देतात या पाणी पिण्याबद्दल नियम असा आहे कीं, कोणींहि आपल्या मनाने वाटेल ते पाणी वाटेल तेव्हा किंवा वाटेल तितके प्यावयाचे नाहीं ज्यास पाणी पिणे असेल त्या प्रत्येकाने

तेथील डॉक्टरास आपली तब्बेत दाखवून तो सांगेल तितके व त्या पद्धतीने व तेहि एकाच अगर वेळोवेळीं असे अनेक झऱ्याचे पाणी प्यावयाचे नाहीतर उपायाऐवजी अपाय होण्याचा संभव असतो लांबच लांब नक्षिदार कलोनेडच्या सिमेंट कॉंक्रीटच्या सुंदर इमारतींतून या झऱ्याची प्राणप्रतिष्ठा ठिकठिकाणीं त्यांची नावे, गावें, गुणधर्म वगैरे देऊन केली आहे ते पाहिले म्हणजे एखाद्या गोष्टीची कशी जोपासना करून ती विकासप्रवण व मनोहर करावयाची हा पाश्चात्याचा गुण किती अनुकरणीय आहे ते मनावर बिंबते

स्प्रुडेल झऱ्याचे पाण्याबद्दल अशी एक आणखी नवल वाटण्यासारखी गोष्ट कळली की, त्या पाण्यात हिंवाळ्यात फूल म्हणा, पान म्हणा, कोणतीहि वस्तु १० दिवसापासून एक वर्षपर्यंत ठेवली, तर तिचे स्वरूप कायम राहून ती दगडासारखी घनीभूत होते व तिला तऱ्हेतऱ्हेचे चित्रविचित्र रंग येतात याचे नमुने म्हणून काहीं वस्तू आम्हीं आणल्या आहेत व त्या येथें वाड्यातील म्यूझिअममध्ये लोकास पाहण्यास मिळतील

कार्ल्सबाद ( Karlsbad ) येथील झऱ्याचा शोध ५०० वर्षांपासून लागला आहे चार्लस राजा जंगलात शिकार करीत असताना एका कुत्र्याने एका जागीं उडी मारली, तो तेथे खळगा पडून त्यातून ऊन पाणी वाहू लागले व त्या आगीने भाजल्यामुळे ते कुत्रे मेले व मूळ झरा कळून आला, अशी एक या शोधाबद्दलची गोष्ट सांगतात पीटर दि ग्रेट हा रशियाचा बादशहा ( झार ) सन १७११-१२ सालीं येथें येऊन राहिला होता येथील झरे ज्वालामुखीचे योगाने उत्पन्न झाले असावेत. त्या झऱ्याच्या पाण्याचे औषधी गुणधर्म शोधाअंतीं समजून आल्यामुळें, पचनक्रियेत दोष असलेले रोगी येथें उपचारासाठीं येण्याची प्रथा फार पूर्वीपासून पडली आहे सन १७६८ पासून त्याबद्दलची खानेसुमारी ठेविली असून दरसाल कमीजास्त लोक किती व कसे आले हे आकृतीने ( Diagram ) दाखविणारा एक तक्ता एका झऱ्यापाशीं भिंतीवर तयार केलेला आहे. त्यावरून ७०,००० रोगी तेथें जास्तींत जास्त एक सालीं येऊन गेले असून अलीकडे ४०,००० चे आत-बाहेर येतात असे समजून आले बाहेरून येणाऱ्या रोग्यामुळे व पाण्याचे औषधी गुणधर्मामुळे येथें कायमची लोकसंख्या २५,००० पर्यंत झालेली आहे

व डॉक्टरहि पुष्कळ आहेत त्याचप्रमाणे बागा, हॉटेलेहि अनेक आहेत शिवाय, म्युनिसिपॅलिटीनेहि स्नानगृहे, पूर्वी व्हिएन्नाचे वर्णनात निर्दिष्ट केली आहेत, त्या प्रकारचीं ठेविली असून ठराविक फीत त्यात २८ दिवस रोग्यास राहण्या-जेवण्याची, औषधपाणी देण्याची व डॉक्टरी तपासणी करून घेण्याची, किंबहुना मनोरजनाकरिता ठराविक नाटके व सिनेमा पाहण्याचीहि सोय करून देतात त्यात एका स्नानगृहास झॉडर इन्स्टिटयूट ( Zonder Institute ) या नावाची विजेच्या साह्याने निरनिराळ्या अवयवास व्यायाम देण्याची सस्था जोडलेली आहे तीहि आमच्या पाहण्यात आली रोग्यास किंवा साध्या प्रवाशास कर ठेवला असून फिरण्यासवरण्यास सभोंवारचे डोंगरात चागले रस्ते केलेले आहेत त्याची एकदर लाबी १०० मैल आहे हवा थड असल्यामुळे केव्हाहि फिरावे, दमले म्हणजे रानोमाळ रस्त्यावर थोडथोड्या अतरावर बाके टाकलीं आहेत त्यावर बसावे व थोड्या विश्रातीनतर आणखी पुढे जावे अगर परतावे भूक लागली तर वेळ असेल त्या मानाने ब्रेकफास्ट, चहा किंवा लच घेण्यास वाटोवाट हॉटले किंवा बगीच्यामधील कॅफे ( चहागृहे ) तयार आहेत कित्येक कॅफेत २००० पर्यंत खुर्च्या आहेत म्हणजे इतक्या माणसाची एकदम सोय आहे व प्रत्येक खुर्चीवर खाली अथरण्यास व टेकण्यास अशीं दोन ब्लॅंकेटे हवा थड असल्यामुळे घालतात तींहि त्या मानाने आहेत चहा घेताना बॅंटचे वादन ऐकण्याचीहि सोय असते, हेहि न सागता आपणास समजेल सभोंवतीं डोंगर व मध्ये कार्ल्सबाद अशी याची रचना आहे काहीशी वस्ती व वसाहत महाबळेश्वरप्रमाणे आहे अनेक वर्षांच्या या घडामोडीमुळे लहानच गाव, पण त्यास आधुनिक सुदर शहराचे महत्त्व आले असून सर्व शहरी सुखसोयी, पुतळ्यासारखे मॉन्युमेन्टस् ( स्मारके ), बागा वगैरेसारख्या सुद्धा असख्य गोष्टी त्यात झालेल्या आहेत

कार्ल्सबाद येथें आमचा मुक्काम असताना नजीकच झेकोस्लोव्हाकिया या महायुद्धोत्तर नवीन देशाचे प्रेसिडेंट डॉ बेनेस याचा मुक्काम होता आम्ही आल्याचे त्यास कळल्यावरून व त्यानीं इच्छा दर्शविल्यावरून स्टड थिएटरमध्ये एक ऑपेरा म्हणजे सगीतप्रधान नाटक पाहण्यास आम्ही गेलों असता त्याचे भेटीचा मान आम्हास सहजगत्या मिळाला

कार्ल्सबादचे आसपास फिरावयास जाण्यासारखी सुदर ठिकाणे बरीच आहेत व डोगरावर जाण्याकरता घोड्याच्या गाड्या मिळतात एबर्ग टेकडी व तिजवरील गोपुरा( Tower )वर व क्रूसचे टेकडीवर आम्ही एकदा गेलों होतों, तेथून ४–५ मैल अतरावर एल्बाजन गावचे हद्दीत टेपले नदीचे कडेस उच कड्याची अशी एक ठेवण आहे की, त्यावरून त्यातील निरनिराळ्या कड्यास लग्नाचे वऱ्हाडातील माणसाची नावे म्हणजे नवरा-नवरी, सासू, उपाध्याय, वाजत्री वगैरे अशीं दिली असून त्यानीं मना केले असता मागे पाहिल्यामुळे अहिल्येसारखे ते शिळा होऊन पडले आहेत अशी दतकथा निर्माण झाली आहे एक दिवस त्या ठिकाणी आम्ही जाऊन आलो प्रत्येक ठिकाणी कॅफेगृह आहे हे सागण्यास नकोच जिकडे तिकडे दाट, परतु चोराचिलटापासून किंवा भयानक अरण्यापासून निर्भय, जगल असून त्यात पाइन नामक झाडे फार आहेत हीं आरोग्यास फार चागली म्हणतात कार्ल्सबादनजीकचे मेरियनबाद हे ठिकाण एके दिवशीं अशीच मोटारची सहल करून आम्ही पाहून आलों तेथेंहि या तऱ्हेचीच व्यवस्था आहे

व्हिएन्ना येथें इटरनॅशनल प्रदर्शन गेल्या शतकात झाले, त्या वेळी आयफेल् टॉवरप्रमाणे किंवा लडनचे क्रिस्टल पॅलेसप्रमाणे एक लोखडी प्रचड टाउन हॉल बाधला होता तो प्रदर्शनानतर तेथून मोडून कार्ल्सबाद येथे बागेत उभा केला आहे तोहि आम्हीं पाहिला त्यात हल्ली एक जगी कॅफेगृह आहे

कार्ल्सबादचे आसपास काचेचे व पोर्सलेनचे कारखाने आहेत त्यापैकी एक मिरहोफन ( Mıerhofen ) गावचा ५–६ मैलावरील काचेचा कारखाना एक दिवस आम्हीं पाहिला साधाच ग्लास, पण त्यावर यत्राने नक्षी कोरणे किंवा पेलू पाडणे अगर रग भरणे ही कामे विशेष प्रेक्षणीय वाटलीं त्या ठिकाणी सूर्यकिरणासारखे ॲरो असलेले स्टार ( Star ) नावाचे झुबर आम्ही नमुना म्हणून विकत घेतले आहे, व तेहि लवकरच आपणास पाहण्यास मिळेल. त्याचप्रमाणे १० मैलावरील जकिमाव ( Jachymov ) नावाचे गावीं रेडिअमची खाण आहे, तीहि आम्हीं पाहिली ती पाहण्यास सरकारी परवानगी लागते ती आम्हास मिळाली होती त्या गावचे मेयर

चित्राक २१६

कार्ल्सबाद येथील थिएटरमध्ये ( सन १९३७ )



डॉ बेनेस ( त्या वेळचे झेकोस्लोव्हाकियाचे अध्यक्ष ) व श्रीमत राजेसाहेब याची येथे ओळख करून देण्यात आली

१ ला मजला १ ला खण ( उजवीकडे ) १ श्रीमत राजेसाहेब, २ श्री युवराज, ३ श्री. अ रा जोशी

व पोलीस अधिकारी आमचे स्वागत करण्यास व सर्व दाखविण्यास त्याचे सरकारचे हुकुमावरून मुद्दाम आले होते रेडिअम ही धातु नवीनच शोधून निघालेली असून ती अगदीं अल्प प्रमाणात सापडते व म्हणून तिला किंमतहि फार पडते या धातूच्या खाणी आशिया व युरोप या दोन खडात मिळून फक्त झेकोस्लोव्हाकिया या देशात व आफ्रिकेत बेल्जम कागोमध्ये आहेत या धातूचे पैदाशीवर त्या त्या देशाच्या सरकारचे कडक नियत्रण आहे साऱ्या वर्षांत जास्तींत जास्त ५ ग्रॅम ही धातू झेकोस्लोव्हाकियात काढता येते. कोळशाच्या वगैरे खाणींप्रमाणे सदर खाणींत लिफ्टने ( पाळण्याने ) आम्ही १५०० फुटापर्यंत खालीं खोल, हातात गॅसचा दिवा घेऊन गेलों होतों इतक्या खोलीवर सुरक्षिततेचीं, हवापाण्याचीं यत्रे बसविण्याची व ट्रॉली चालविण्याची व्यवस्था केलेली पाहून फारच नवल वाटते फ्रेंच शास्त्रज्ञ डॉ क्यूरी व त्याच्या पत्नी यानी हा शोध लावला या खाणींत काम करणारे मजूर आजारी कमी पडतात, या गमकावरून या धातूचा शोध लागला प्रथम येथें रुप्याच्या खाणी होत्या. मागाहून यात रग तयार होणारा माल सापडू लागला व अखेर ही धातू मोठाल्या खडकात अति लहान काळ्या रेषेत, क्वचित ठिकाणीं सूक्ष्म प्रमाणात इतर वस्तूशी निगडित असलेली अलग करण्याची युक्ति निघाली या धातूचा औषधोपचारात मोठा उपयोग असल्याचे आढळून आले आहे, व तसे उपचार करण्याचे एक हॉस्पिटल सदर गावात काढलेले आहे तेहि आम्हीं पाहून घेतले. त्याचप्रमाणे खाणींतून अशोधित स्वरूपात दगडा माल सापडल्यावर त्यातून रग व ही धातू काढण्याचा कारखाना सदर गावात खाणीपासून काहीं अतरावर आहे, तोहि पाहण्यात आला तसेच काढलेली रेडिअम धातू काचेच्या नळीत ठेवलेली काळोखात कशी प्रकाशमान दिसते, तेहि पाहिले हॉस्पिटलमध्ये या धातूचे माप काढण्याचे यत्र पाहिले त्याचेहि मोठे नवल वाटले कारण त्यात पाहिले व या धातूचा तुकडा डोक्याचे मागचे भागावरून स्पर्श न करता लावून डॉक्टरानीं नुसता फिरविला कीं, आतील दोन काळ्या रेघा जवळ जवळ येत असलेल्या दिसतात, व त्या गतीवरून त्या धातूची शक्ति अजमावता येते कार्ल्सबादहून आम्ही मोटारने तिसरे प्रहरी निघून एगर नावाचे जर्मन-झेकोस्लोव्हाकियन

सीमेवर असलेले स्टेशनवर एक तासात आलो, व तेथून थेट रेल्वेने दुसरे दिवशीं पॅरिस ईस्ट स्टेशनवर सुमारे एक वाजता येऊन पोहोंचलों पॅरिसला एक आठवडा आमचा मुक्काम होता त्यात एक दिवस व्हर्साय राजवाडा व येथील जगप्रसिद्ध विस्तीर्ण व नयनमनोहर बगीचा पाहिला रविवार असल्यामुळे सायकाळीं तासभर कारजीं खुली होतीं, तो देखावा फारच अप्रतिम वाटला बागेचे उतरते उतरते स्वरूप, जिकडे तिकडे पसरलेले शेकडों पुतळे, वाटोळे कलोनेड, कारज्यानजीकचे पुतळ्याचे निरनिराळे देखावे, अनेक दगडी पशूच्या आकृतींचे तोंडातून काढून दिलेले पाणी, कुशलतेने कातरल्यामुळे नक्षीदार दिसणाऱ्या झाडाच्या रागा, सर्वच प्रेक्षणीय व नवलोत्पादक आहे राजवाड्याच्या पुढील पटागणातील चौदाव्या लुईचा प्रचड अश्वारूढ पुतळा व आतील दालनातील भिंतीवरील व खालीबर तसूनतसू जागेत असलेलीं रगीत चित्रे, नक्षी पुतळे, झुबरे वगैरे सामान याचे वर्णन करणे अवघड आहे

बाकीचे दिवसात बाळास, नेपोलियन-थडगे ( Tomb ) व कीर्तिमदिर ( Pantheon ) या प्रेक्षणीय गोष्टी दाखविण्याची व्यवस्था करून आम्हीं बहुतेक दिवस प्रदर्शन पाहिले तरी, तयार असलेल्या प्रदर्शनाचा सर्व भाग ओझरता देखील आम्हास पाहता आला नाहीं सेन नदींत व तीतील जास्त विस्तृत केलेल्या स्वान बेटात व तिचे दोन्ही अगास २। मैल लाब व १। मैल रुद इतका प्रदर्शनाचा भाग आयफेल ( Effeul ) टॉवरचे मध्यबिंदूभोंवतीं झालेला आहे त्यात विशेषत मुलासाठी असलेले ॲम्यूजमेट पार्क ( Amusement Park), म्हणजे ज्यात जत्रेसारखे निरनिराळे परतु जास्त अकलेचे, सुधारलेले व इलेक्ट्रिकचे साह्याने चालविण्यात येणारे, लहान मोटारी, बलून वगैरे पाळण्यासारखे अनेक खेळ व कृत्रिम नदींतील लहान मोटार, बोटी इत्यादि प्रकार ठेविलेले आहेत, ते थोडे वेगळे अगास आहे, व दुसऱ्या एका अगास ग्रँड पॅलेस ( Grand Palais ) या राजवाड्यासारखे इमारतीचे एका भागात पॅलेस ऑफ डिस्कव्हरीज ( Palace of Discoveries ) म्हणजे शास्त्रीय शोधाचा राजवाडा म्हणून स्वतत्र विभाग आहे त्यात आजवर लागलेल्या शोधाची प्रगति क्रमवार दाखविलेली आहे. आत एकदर ४३ राष्ट्राचे पृथक् पृथक्, कमीजास्त मानाने भव्य व सुशोभित, असे पॅव्हिलियन्स (Pavilions)

म्हणजे तऱ्हेतऱ्हेच्या तबूप्रमाणे इमारती असून त्यात ज्यानी त्यानी आपापल्या देशातील कलाकुसरीचीं, शास्त्रीय शोधाचीं व उद्योगधद्याची कामे पाहण्याकरिता माडलीं आहेत हॉलड, बेल्जमसारख्या, ज्याना वसाहती आहेत त्या देशानी त्याचे विभाग स्वतत्र यातच ठेविले आहेत ब्रिटिशाचे कॅनडा वगैरे वसाहतीचे विभाग आहेत फ्रान्सतर्फे हे प्रदर्शन भरले असल्याकारणाने फ्रान्स देशाच्या निरनिराळ्या प्राताचे व वसाहतीचे विभाग सेन नदींतील बेटामध्ये स्वतत्र ठेविलेले दिसले त्या बेटासभोंवती नदींतून मोटार लॉचमधून प्रदक्षिणा घालून बेटातील व दोन्ही काठावरील प्रदर्शनाच्या इमारती बाहेरून आम्हीं पाहिल्या रात्रीं सगळीकडे विद्युद्दीपाची दिवाळी करतात, तेव्हा जी मौज दिसते तिचे वर्णन करणे अशक्य आहे प्रत्येक राष्ट्राने काहीं विशेष नजरेत भरतील अशा आपल्या वैशिष्ट्याच्या दर्शक म्हणून खुणा आपापल्या इमारतींसमोर अगर शेवटच्या मजल्यावर दर्शनी भागात ठेवून दिल्या आहेत उदाहरणार्थ, जर्मनीने भला थोरला गरुड ( Eagle ) आपल्या स्वस्तिक निशाणासह माथ्यावर ठेविला असून समोर दोन बाजूंस आईबाप व मुलगा अशा पिळदार बाध्याच्या ३ पुतळ्याचीं दोन कुटुबे, शक्तीचीं निदर्शक म्हणूनच कीं काय ठेविलीं जाहेत समोरच रशियाने औत घेतलेला शेतकरी व खुरपे घेतलेली स्त्री अशा अगडबब रुप्याच्या पुतळ्याच्या जोडीच्या रूपाने आपल्या राष्ट्राच्या शेतीप्रधानत्वाचे निशाण लावले आहे असा भास होतो इटली देशाने आपल्या इमारतीवर चौफेर पुतळे उभे केले असून पुढें अश्वारूढ पुतळा ठेवलेला आहे इटलीचे इमारतीत अबिसिनिया देशात काय सुधारणा केल्या, याचे दिग्दर्शन अनेक फोटो ठेवून करून दाखविले आहे, त्याचे सखेद नवल वाटले हॉलडचे पॅव्हिलियनमध्ये डच ईस्ट इडीजचे दालनात हिंदी सस्कृतीशीं सदृश अशीं दृश्ये पाहून थोडी आत्मीयता वाटली बेल्जममधील कॉगो वसाहतीतील शिंप्याजी नावाचे प्राणी व इग्लडमध्ये भुयारी ( Underground ) रेल्वेत ठिकठिकाणी पाहिलेल्या आपोआप पायऱ्या चढवून नेणाऱ्या इलेक्ट्रिक जिन्यासारखा तेथे एक एस्कॅलेटर ठेघलेला आहे, तो पाहूनहि थोडी मौज वाटली ज्या त्या राष्ट्राने आपले ऐश्वर्य, शोधकबुद्धि व सामर्थ्य दाखविण्याचा आपापल्या इमारतींत जो कमालीचा प्रयत्न केलेला आहे तो पाहून पाश्चात्याच्या प्रगमनशील बुद्धिमत्तेचे कौतुक

वाटले, परतु आपला मागसपणा व परावलबीपणा निदर्शनास येऊन खिन्नता वाटली पूर्वी सागितल्याप्रमाणे एक एक इमारत ही स्वतत्र तद्देशीय प्रदर्शनच आहे त्या सर्व प्रदर्शनाच्या समुदायाचे काय वर्णन करावे?

फावल्या वेळात पॅरिस येथें आम्ही राहत होतों, त्या लोटी हॉटेलच्या नजीकच टयूलरीज राजवाड्यापैकीं अवशिष्ट राहिलेली रमणीय भव्य टयूलरीज बाग, तिचे मागचा जगद्विख्यात म्यूझियमचा साप्रत अतर्भाव करणारा प्रचड लुव्ह राजवाडा, मध्यतरींची विजयश्रीची कमान व नजीकचा ग्याबेटाचा पुतळा व थोडया पूर्वबाजूचा जोन ऑफ आर्कचा पुतळा आणि टयूलरीज बागेपुढील व आतील कारजीं, अनत पुतळे व दुसऱ्या एका भव्य कमानीचे खालील सारखें तेवणारें अग्निकुड व अज्ञात वीराचे स्मारक इत्यादि गोष्टी पाहिल्या खरोखर मागील व या वेळीं एकसारखी सतत अशीं ही दृश्यदर्शने पाहून ज्या ठिकाणीं नसानसाचें वर्णन केले पाहिजे अशी कारागिरी, कोपऱ्यावर, बाजूस, शिखरावर, छतावर वगैरे ऐतिहासिक अगर पौराणिक किंवा काल्पनिक चित्रें, पुतळे वगैरे काढून, खोदून, राधा करून अगर ठेवून केलेली दृष्टीस पडते, तेथें वर्णक-बुद्धि कुंठित होते, व आपल्याकडे हीं दृश्ये विपुलतेने मधल्या अधकारयुगामुळे दृष्टीस पडत नाहींत, असा विचार मनात येऊन मनाचा विरस होतो किंबहुना सामान्य प्रवाश्याची साधारण बुद्धिमत्तासुद्धा या सर्व गोष्टींचीं मूलतत्त्वे समजून घेण्यास देखील किती कोती आहे व तींतहि किती सूक्ष्मता व विविधता येणे जरूर आहे, असाहि प्रश्न मन चक्षूपुढें आल्यावाचून राहत नाहीं या प्रकारच्या नमुन्यावर नव्या दिल्लींत व्हाइसरॉयाचे निवासस्थान अशत बाधलेले दिसते कारण त्याचे मागची मोंगल-गार्डन व त्यापुढील सेक्रेटरीएटच्या भव्य इमारती, ओबेलिस्कसारखे वसाहतींनीं नजर केलेले स्तभ, लाबट कारजीं, फ्लडलाइटचे विद्युद्दीप व वॉर-मेमोरियलची कमान हा देखावा पाहिला म्हणजे पॅरिस येथील लुव्ह (Louvre) राजवाडयापुढच्या प्रदेशाची आठवण झाल्यावाचून राहत नाहीं.

व्हिची

पॅरिसहून निघून व्हिची येथें ३॥ तासात ऑटोरेलने ( Auto-rail ) येऊन आम्ही दाखल झालों हे अतर सुमारें २२५ मैल आहे. ऑटोरेल

(Auto-rail) म्हणजे रेल्वेचे रुळावरून जाणारी दोन ट्राम किंवा बस इतकी लाब व ५० माणसाच्या सीटस् असलेली मोटार लॉरीच होय तींत सामान फारसे नेता येत नाहीं प्रवाशाचे हॅडबॅगसारखे थोडेसे सामान पुढें ठेवतात, व मोटार एजिन मागे असते व्हिची हे ठिकाण झरे, रचना, व विविध स्नानगृहे ( बाथ एस्टॅब्लिशमेटस् ) या दृष्टीने कार्लस्बादप्रमाणेच आहे यापैकी काहीं आम्ही हिंडून आलों त्यात मुलाकरिता एक पार्क बाधला आहे तो चागला वाटला त्यात पोहण्यासाठींहि एक तलाव बाधला आहे तिसरे प्रहरीं तेथील गोल्फ-क्लबमध्ये, डॉसर्ज ऑसिपॉक, तेथील आरोग्यभुवनाचे डिरेक्टर, यानीं चहास बोलाविले होते, व त्यानीं सकाळीं मुद्दाम मेहनत घेऊन झरेबाथ, कासेनो वगैरे आम्हास स्वत चे मोटारींतून हिंडवून दाखविले

पूर्वसकल्पाप्रमाणे, निदान उभाउभी तरी हे ठिकाण पाहावयाचेच असा बेत असल्यामुळे, एक दिवस तरी येथें मुक्काम करावयाचा होता त्याप्रमाणे तेवढाच मुक्काम करून, आम्ही सायकाळीं ६ वाजता निघून दुसरे दिवशीं सायकाळीं मार्सेलिस येथें रणपुरा बोटांत बसलो त्याचे दुसरे दिवशीं पहाटे ४ वाजता म्हणजे शनिवार उजाडताच बोट सुटावयाची होती त्याप्रमाणे निघून मुबईस परत आलों वाटेत एडन येथे स्टीमर पॉइटवर दक्षिणी मडळींनीं पुन्हा आमचे स्वागत करून चहा दिला या वेळीं भूमध्यसमुद्रातच फार उकाडा वाटू लागला व ताबड्या समुद्रात बोट किंचित् हलू लागली व शेवटपर्यंत मग समुद्र पावसाळी हवेमुळे किंचित् खवळलेला असल्याकारणाने ती हलतच होती पहिले १।२ दिवस हलण्यामुळे दर्यादुखी ( Sea-sickness ) ची बाधा बहुतेक प्रवाशास झाली त्याप्रमाणे आमचे पार्टींतील लोकासहि थोडीफार जाणवली परतु, नतर पुन्हा पूर्वस्थिति प्राप्त झाली, व एकदर प्रवास सुखावह झाला

## पूर्वीच्या व ह्या प्रवासातील काहीं अनुभव

या व मागील एकदर प्रवासात याप्रमाणे पुष्कळ गोष्टी पाहिल्या, परतु, पाहावयाच्या राहिल्या अशाहि महत्त्वाच्या असख्य गोष्टी आहेत परतु, सर्वच पाहणे कोणासच केव्हाहि शक्य नाहीं या व मागील प्रवासात मिळून विशेष सागण्यासारख्या गोष्टी म्हणजे एक प्लानेटेरियम् उर्फ कृत्रिम आकाशा-तले तारे, ग्रह वगैरे दाखविण्याचे गृह. हे बर्लिन येथे मागील वेळीं आम्हीं

पाहिलें आता तशीं गृहे पुष्कळ ठिकाणीं बाधलेलीं आहेत. तसेंच, एक पॅरिसचे प्रदर्शनातहि बाधलेले आहे दुसरी गोष्ट, स्पॅनिश रायडिंग स्कूल तिसरी गोष्ट म्हणजे ऊन पाण्याचे झरे व औषधीदृष्ट्या त्याचे सशोधन करून निरनिराळ्या तऱ्हेच्या स्नानाच्या द्वारें व व्यायाम घेण्याच्या पद्धतींनीं झरे असलेल्या आरोग्य-भवनाचा केलेला विकास या दोन्ही गोष्टींबद्दल वर सागितलेंच आहे. त्याच-प्रमाणे चवथी गोष्ट, म्हणजे कृत्रिम लाटाची व पाऊस पडत असलेली पोह-ण्याचीं सरोवरें याबद्दलहि वर उल्लेख आलाच आहे लडन येथील सायन्स म्यूझियम ही अशापैकींच गोष्ट होय लडनमध्ये अडर-ग्राउड मजले किंवा सब्-वे बाधले आहेत त्याचप्रमाणे अडर-ग्राउड रेल्वेचे शेकडों मैल जाळे पसरले आहे ती गोष्टहि प्रवाशास विशेष विलक्षण वाटते अशा रेल्वे पॅरिस, व्हिएन्ना येथेंहि आहेत परतु, लडन अडर-ग्राउड रेल्वेची व्यवस्था, स्वच्छता व रमणीयता हीं अवर्णनीय आहेत काहीं गोष्टी, किंबहुना बहुतेक गोष्टी, प्रत्यक्ष पाहिल्या-खेरीज त्याची खरी कल्पना येत नाही, अशा असतात उदाहरणार्थ, वर सागितलेल्या पॅरिस-प्रदर्शनासारख्या काहीं गोष्टी ओझरत्याच आम्हीं पाहिल्या परतु, आता त्याचीं शाब्दिक वर्णने वाचिलीं असता, जशी समजतात किंवा डोळ्यापुढें पाहत असल्याप्रमाणे उभीं राहतात तशी, कोणत्याहि गोष्टी न पाहता पुष्कळ वर्णन वाचले, तरी त्याची खरी प्रतीति येऊ शकत नाहीं त्यातलाच प्रकार अडर-ग्राउड रेल्वेचा व त्यासबधातील एस्कलेटर जिन्याचा

प्रस्तुतच्या व मागील प्रवासात आम्हास असा एक अनुभव आला कीं, आम्ही परदेशस्थ म्हणून कुतूहलाने जेथें तेथें आमचेकडे व इतर परस्थाकडे पाहणारे लोक आम्हास पुष्कळ आढळले त्यातहि कोठे समारभासाठीं जाण्या-करिता आम्ही इकडील पोषाख केलेले असले, म्हणजे गर्दी तर विचारा-वयासच नको त्यात या खेपेस आमच्याबरोबर मुली असल्यामुळे व त्याचा नेहमीं हिंदी रिवाजाचाच पोषाख असल्यामुळे त्याचेकडे कुतूहल व स्मितहास्य-युक्त चेहेऱ्याने पाहणाऱ्या व प्रेमळपणाने चौकशी करणाऱ्या आबालवृद्ध स्त्रीपुरुषाचा घोळका फारच जमावयाचा या कारणास्तव मुले बरोबर घेतल्या-बद्दल आम्हास आनदच वाटे

याव्यतिरिक्त या वेळची महत्त्वाची गोष्ट म्हणजे स्पिटहेडला जाण्यासाठीं साउदाम्टनला रेल्वेने जाताना, तसेच व्हिएन्नापर्यंतचा रेल्वेचा व व्हिएन्नापासून कार्लस्बाद, कार्लस्बाद ते पॅरिस व पॅरिस ते व्हिची, ह्यातील बराच प्रवास दिवसा झाल्यामुळे आणि व्हिएन्नाचे व कार्लस्बादचे आसपास फिरताना, तिकडील लोकाची शेती व शेतकरी, कामकरी, गरीब लोक याची राहणी आम्हास बरेच वेळा पाहावयास मिळाली अर्थात् इतर सुधारणाप्रमाणे त्याची शेतीहि नीटस, पद्धतशीर व सुधारलेली दिसली परतु बहुजनसमाजाम सकाळपासून सायकाळपर्यंत कष्ट केल्यावाचून पोटापुरते अन्न-वस्त्र मिळण्यास दुसरा इलाज नाहीं, हेच खरे त्रिकालाबाधित सत्य मनावर जास्त बिबले

प्रवास करताना आढळलेले खलाशी, हमाल वगैरे लोक, कारखान्यात दिसून आलेले मजूर, दुकानातील विक्रेते व इतर नोकर, हॉटेले, कॅफे थिएटरे यात सबव असलेले लोक, म्हणजे मेड्स, वेटर, व्हॅले, व नट-नटी इत्यादिकाचे जीवन पाहिले तरी तोच प्रकार इकडे प्रधानमडळासारखे उच्च दर्जाचे लोक पाहिले, तरी फुरसत नाहीं बादशहास विशेष सत्ता ठेवलेली नाही म्हणतात, तरी राज्याभिषेकापासून अजूनहि त्यास व महाराणीसाहेबास उसत म्हणून कसा तो नाहीं. रोज काहीना काहींतरी सार्वजनिक कार्यक्रम अगर फिरती ठेवलेलीच आहे, व त्यात जे लोक भेटतील त्याच्याशी त्याच्या पेशाच्या व प्रसगाच्या मानाने त्यास बोलावे लागते यालाहि पूर्वतयारी व अध्ययन पुष्कळ लागतें साराश, रिकामें बसून कोणालाच पोटास मिळावयाचे नाही, हाच जगाचा न्याय

तिकडील शेती सुधारलेली दिसली, तरी जमीनहि सुपीक दिसली गाई वगैरे जनावरे धष्टपुष्ट दिसलीं. गाई गाड्यास जुपतात, असेहि नजरेस आले थड प्रदेश, बारमाही पाऊस, बर्फ वगैरे कारणानीं नद्या नाले जलसमृद्ध दिसून आले जमीन खडकाळ नाहीं, सबसॉइलचा प्रश्न नाहीं, हवा उष्ण नाही, इत्यादि कारणानी पुष्कळसे प्रश्न सुटण्याला तिकडे सुलभ असावेत असे वाटले

वरील कारणास्तव सृष्टिशोभाहि पुष्कळ ठिकाणीं फार चागली दिसून आली मागील खेपेस आर नदीचा उगम व प्रवाह, बर्फांचे डोगर व इटरलोकननजीक स्वित्झर्लंड देशात बिअटयुस होहेलेन् नामक गुहा विशेष प्रेक्षणीय

दिसल्या तथापि, अशा सृष्टिशोभेच्या गोष्टींचीहि टामटूम पाहिजे. टामटूम करून कोणत्याहि गोष्टीची प्रसिद्धि करण्यात पाश्चात्य लोकाचे कौशल्य अप्रतिम त्याच्या देशातील सरकारें देखील आपल्या टापूतील प्रेक्षणीय स्थळाचे किंवा वस्तूचे सवर्धन करून परकीयाचे मन तिकडे वेधेल असे चित्ताकर्षक स्वरूप त्यास आणतात, व त्याच्या त्या स्वरूपाची जाहिरातीचे वगैरे द्वारे अतिशयोक्तीची प्रसिद्धि करून व रेल्वे वगैरे वाहनास सवलती देऊन, परकीयाचे मन ओढून घेतात, व आपल्या देशाचे ऐश्वर्य हस्ते-परहस्ते वाढविण्याचा सतत यत्न करतात या कामी त्यानी ज्या वकिलाती ठिकठिकाणीं ठेवल्या आहेत, त्याचा फार उपयोग होतो यासाठींच इग्रजाच्या वसाहतींनीं देखील परदेशात स्वतत्र वकिलाती ठेवण्याचा हक्क सपादन केला आता आमच्या मागील प्रवासात आतापावेतों उल्लेख केलेल्या राजवाडे, बागा, मदिरे, टॉवर, म्यूझियम्स याखेरीज ज्या अद्वितीय अशा सस्था आमच्या पाहण्यात आल्या त्याची थोडीशी माहिती देऊन आम्ही आपली हकीकत सागण्याचे काम पुरे करतों

जिनीव्हा येथील लीग् ऑफ नेशन्स ही पहिली, अशी सस्था होय सर्व सुशिक्षित माणसास या सस्थेची माहिती आता झालेलीच आहे लढाई न होऊ देता शाततेने राष्ट्राराष्ट्रातील तटे मिटवावयाचे, हा जो तिचा मुख्य हेतु तो साधण्याचे कामीं अलीकडे बऱ्याच अडचणी आलेल्या आहेत, हेहि आपल्यास ठाऊक आहे तरी, याखेरीज सर्व जग हे एक सामान्यत भूतदया-प्रेरित प्रभुराष्ट्र आहे, अशी कल्पना ठेवून त्याचे सामुदायिक ऐश्वर्यवृद्धीसाठीं व रोगराई जास्त न पसरता मानवी जीवित जास्त सुखकर कसें होईल, इत्यादि प्रकारच्या तजविजी करण्यासाठीं, सर्व राष्ट्रातील अत्यत बुद्धिमान् माणसे एकत्र करून त्याचे द्वारे अखिल विश्वाचे कल्याण साधण्याचे कामीं—ज्यात कोणता स्वार्थ आड येत नाहीं अशा प्रकारच्या गोष्टींत प्रयत्न करण्यात या सस्थेचा पुष्कळ उपयोग होत आहे, हे कोणासहि नाकबूल करता येणार नाहीं त्याचप्रमाणे अखिल जागतिक कामकरी हितसरक्षक मडळ ही सस्था जिनीव्हा येथेच राष्ट्रसघाच्या सहकारितेने काम करीत असते व तशीच शेतकरी-हितसवर्धक सस्था रोम येथे महायुद्धापूर्वीपासून स्थापन झालेली आहे शेतीच्या रोगराईविरुद्ध इलाज शोधून काढून ते सर्व लोकास

## चित्रांक २१७
### पॅरिसनजीकच्या आयफेल टॉवरच्या दुसऱ्या मजल्यावर ( सन १९३७ )



१ रा महाशब्दे, २ अ रा जोशी, ३ डॉ जोशी, ४ न गो अबेकर, ५ रा कु बापूसाहेब, ६ रा कु रावसाहेब, ७ श्री राजेसाहेब, ८ रा कु पद्मावतीराजे, ९ श्री. युवराज, १० मि. देशराज, ११ रा कु. विमलाराजे. [स. पा. प. ९९

## चित्रांक २१८
### व्हर्साइलच्या बागेत



१ म. रा. पुरदरे, २ डॉ. जोशी, ३ रा. महाशब्दे, ४ वि. मु. पारखी.
[स. पा. प. १००

चित्रांक २१९




अंतरिक्षातून दिसणारें नेपल्स शहर, वरचे बाजूस व्हेसुव्हिअस ज्वालामुखी पर्वताचें दृश्य

[स पा प १०२

प्राप्त करून देणे, सर्व जगात कोणते पीक किती झाले आहे, किंवा होऊ शकेल व कोणत्या देशात काय दर आहेत, याची माहिती संकलित करून सर्वांच्या उपयोगासाठीं वेळोवेळीं व वेळेवर ही संस्था प्रसिद्ध करते. यामुळे, ज्या त्या राष्ट्रातील लोकास आपआपले शेती व्यवसायाबाबत योग्य त्या सूचना वेळचेवेळीं घेण्यास सुलभ पडते या तिन्ही संस्थाचीहि विस्तृत माहिती आम्हीं आपल्या पुस्तकात दिलेली आहे ती एतद्विषयक जिज्ञासा असेल त्यानीं वाचण्यातील आहे

भूगर्भशास्त्र व प्राणिशास्त्र-विषयक बगीचा, म्हणून एक संस्था स्वित्झर्लंड देशात ल्यूसर्न येथें आहे ती त्या त्या विषयाचे प्रात्यक्षिकासारखी आहे विशेषत प्रारभीं माणसें पाण्यानजीक किंवा पाण्यात झोपड्या करून राहत, त्याबद्दलच्या अवशेषाची माहिती मनोरजक वाटते तसेच मोनॅको या युरोपातील अत्यत चिमुकल्या राष्ट्रात तेथील अधिपतीनीं सागरीय प्राणिशास्त्रविषयक एक सग्रहालय स्थापन केलेले आहे, हे आम्हास अपूर्व वाटले या संस्थाचा कारभार, जुगारींत मिळणाऱ्या पैशाचा अश जुगार चालविणाऱ्या येथील संस्थे-कडून येतो त्यावर चालतो समुद्राच्या विशाल पोटातील प्राण्याची, पृष्ठभागापासून १००० फुटापर्यंतचे खोलीवर सापडणारे व त्याहिपुढें २ ते ४ मैलपर्यंतचे खोलीवर मिळणारे, अशा खोलीचे मानाने वर्गवारी करून त्या प्राण्याचे नमुने या सग्रहालयात ठेवलेले आहेत व त्याच्या शरीरापासून निरनिराळ्या वस्तु तयार केलेल्या तेथील प्रदर्शनात पाहावयास मिळतात. वरील दोन्ही संस्थाची हकीकत आम्हीं आपल्या पुस्तकात दिलेली आहे, तीहि जिज्ञासू वाचकास मनोरजक व उपयुक्त वाटेल अशी आशा आहे

युरोपातील नाटकगृहाची पद्धतहि फार वेगळी आहे. म्हणजे या इमारती राजवाड्याप्रमाणे भव्य व सुदर आणि प्रशस्त अशा तिकडे बाधल्या जातात त्यात फक्त रगभूमि व प्रेक्षक बसण्याची जागा एवढाच समावेश नसून, बाहेर व सभोंवतीं आणखी ऐसपैस सुशोभित वाटोळ्या खाबाची मोकळी जागा प्रेक्षकास फिरण्यासवरण्यासाठीं ठेवलेली असते व तेथे चित्ताकर्षक मालाचीं किंवा वस्तूची अगर खाद्यपेयाचीं दुकाने असून आजूबाजूस भिंतींवर अगर

मोकळ्या जागेंत नटनटी, नाटककार वगैरे प्रख्यात स्त्री-पुरुषाचीं चित्रें, तसबिरी अथवा पुस्तके दृष्टीस पडतात तिकडील नाटकमडळींत नटनटींची व वाद्यवादन-पटूची सख्या बरीच दिसून येते. तिकडे मुख्यत लडनमध्ये आम्ही बुद्धचरित्रावर लिहिलेले 'प्रिन्स सिद्धार्थ' हे सगीतप्रधान नाटक व बर्नार्ड शॉचे 'कॅडिडा' हे नाटक अशीं पाहिलीं. पौर्वात्य विभूतीचे आयुष्यक्रमावर लिहिलेल्या नाटकाची लोकप्रियता झालेली पाहून व पौर्वात्य रिवाजाचा अनुवाद तिकडील नटनटींकडून झालेला अवलोकन करून आम्हास विशेष आश्चर्य वाटले तसेच ४० वर्षांपूर्वी लिहिलेले कॅडिडा नाटकहि अद्याप एकदर नाटककाराच्या कृतींमध्ये अग्रमान पटकावीत आहे हे निदर्शनास येऊन नवल वाटले पॅरिस-प्रदर्शनात इग्रजी भाषेतील प्रातिनिधिक नाटक म्हणून या नाटकाचीच निवड करण्यात आली, यावरून या नाटकाचा दर्जा अव्वल प्रतीचा असल्याचे स्पष्ट दिसते. सदर नाटक, हेन्री इब्सेन या प्रख्यात स्वीडिश नाटककाराच्या 'डॉल्स् हाउस' या, कॅडिडा नाटकाचे पूर्वी काहीं वर्षे प्रसिद्ध झालेल्या व समाजातील वैवाहिक बधनाच्या पावित्र्यास जोराचा धक्का देणाऱ्या आणि कायमची घराबाहेर पडलेली नायिका असलेल्या, नाटकाची चलती चालली होती तीस आळा घालण्याकरिता म्हणून, घरातच गुण्यागोविंदाने राहणाऱ्या नायिकेचे नाटक लिहिले होते व तो त्याचा हेतु सिद्धीस जाऊन अजूनहि कॅडिडा नाटकास सर्वच बाबतींत शीघ्रगतीने जाणाऱ्या पाश्चात्य समाजात मान्यता आहे, असे पाहून आपल्याकडील म्हणजे पौर्वात्य समाजातील वैवाहिक कल्पना कालमानानुरूप किरकोळ बदल करून, वस्तुत त्रिकालाबाधित राहण्याची कशी आवश्यकता आहे, हे मनात प्रतीत झाले

सद्गृहस्थहो, याप्रमाणे आमच्या प्रवासाची हकीकत आम्हीं आपल्या-पुढे माडलेली आहे ती थोडी लाबली असताहि, आपण शातपणाने ऐकून घेतल्याबद्दल व आम्हास मानपत्र देऊन आमचा गौरव केल्याबद्दल पुन आपले आभार मानून, आम्ही आपली रजा घेतों "

---

## परिशिष्ट १८

सहावे राज्यारोहणदिन-समारभाच्या वेळचे, त्या सालचे सुधागड तालुकासभेच्या अधिवेशनाचे अध्यक्ष रा ग. महादेव हरी मोडक याचे भाषण

ता १८-८-१९२७

"श्रीमत सरकार व सभ्य गृहस्थहो,

आजच्या मगल प्रसगीं दोन शब्द बोलण्याचा मला हक्क प्राप्त झाला आहे, याबद्दल मला आनद वाटतो हा हक्क म्हणजे श्रीमतानीं सुधागड तालुक्यातील लोकाच्या हितार्थ केलेल्या अनेक गोष्टींबद्दल त्या तालुका-सभेचा चालू अध्यक्ष या नात्याने कृतज्ञतादर्शन करण्याचा होय आपण जाणतच आहा की, मनुष्यप्राणी हा चराचर सृष्टींतील श्रेष्ठ प्राणी होय, व त्याची ज्ञान-शक्ति किंवा जाणीव ही सर्वश्रेष्ठ आहे आणि कृतज्ञताबुद्धि हे त्या जाणिवेचे उत्तम अग आहे आन्ड्रोक्लीजच्या गोष्टीवरून पशूदेखील उपकर्त्याबद्दल कृतज्ञ असतात असें असता मनुष्य जर कृतघ्न राहील तर तो पशूहूनहि नीच गणला पाहिजे. आणि म्हणूनच मी श्रीमतानीं केलेल्या उपकाराबद्दल येथे कृतज्ञता व्यक्त करीत असता मला कोणीं स्तुतिपाठक म्हणू नये.

आमच्या तालुक्यासबधीं केलेल्या जनहिताच्या गोष्टींची याद रा ब कारभारी यानीं आपणास वाचून दाखविलीच आहे त्या यादींतील सर्व गोष्टीपेक्षा जगलाच्या हक्काची देणगी अत्यत महत्त्वाची असून, म्हटले आहे 'प्रणयिषु शुभ-चेतसा प्रसाद प्रभवति सततिमप्यनुगृहीतु' श्रीमतानीं मला एकदा म्हटले होते कीं, माझ्या कारकीर्दीची चिरकाल स्मृति मी तुम्हास देणार आहे व ती त्यानीं या जगलाच्या देणगीच्या रूपाने दिली आहे असे मी समजतों या देणगीपायीं श्रीमताचे दरसाल रु ३५००चे नुकसान होत आहे, तथापि ते त्यानीं उदार-पणे सोसले आहे, ही त्याची उपकृति आम्ही कधीं विसरणार नाही

लोकाच्या काय तक्रारी आहेत हे समजण्याकरिता श्रीमत किती तत्पर असतात त्याचे मी एक ताजें उदाहरण देतों परवा पाली येथें लोकमान्याचे पुण्यतिथीनिमित्त रा लागू वकील याचे अध्यक्षतेखालीं सभा भरली असता तींत श्रीमतानीं जगलाबद्दल नुसते वाग्दान करून ठेविले आहे,

परतु तोड करणाराना, जरूर ते नियम अद्याप प्रसिद्ध केले नाहींत, मग फळ काय? अशी टीका होती ती टीका 'कुलाबा-समाचारा'त वाचून मी एक आठवडयाने पुण्यास आलों व कारभारी याना विचारले कीं, नियमाच्या अभावीं ही तुमची देणगी घशात अडकलेल्या घासाप्रमाणे आम्हाला नडत आहे तेव्हा ते म्हणाले, " मेहेरबान नियमाचा खर्डा खाजगी रीतीने बापूसाहेब लिमये प्रभृति लोकसभेतील शिष्टाच्या पसतीसाठीं रवाना झाला आहे तिकडून आल्यावर सरकारी रीतीने प्रगट होईल" मिशने, कमिशने, शिष्टमडळीचे फार्स करण्यापेक्षा अशा कळकळीने लोकाचे अभिप्राय मिळवून जनकार्य करणे हे अधिक प्रामाणिकपणाचे आहे नुसत्या नाटकात काय फायदा?

अपराध्यास योग्य शासन होऊन लोकास न्याय मिळावा याविषयींचीहि श्रीमताची उत्कठा अशीच तीव्र आहे तिचे उदाहरण म्हणजे पाली येथील एका पोलिस शिपायाने केलेल्या अत्याचाराबद्दल खटला होय त्या अत्याचाराबद्दलची वार्ता श्रीमताचे कानीं येताच चौकशीकरिता चीफ पोलिस ऑफिसर रा अळवणी यास ताबडतोब रवाना करून सर्व पुरावा गोळा करून आणविला व अपराध्यास सेशन्स कोर्टानेंहि अपराधानुरूप तीव्र शिक्षा ठोठावल्या

दुष्कृतास शासन करून जनमनास शाति देण्याविषयींची श्रीमताची कळकळ, उघड उघड आरोप ठरेल त्यासच शासन देऊन थाबत नाहीं मीं असे पाहिले आहे कीं, एखाद्या कामगारावर उघड उघड खटला भरला नाहीं, तथापि त्याची कृति जनतेला जाचक होत आहे असे श्रीमताना सूक्ष्म निरीक्षणानेच ध्यानात आले असता अशा अधिकाऱ्यासहि योग्य रीतीने व अन्योक्तीने श्रीमतानीं दूर केले आहे मात्र कौतुकाची गोष्ट ही कीं, येथेंहि श्रीमताची स्वभावसिद्ध दयाळुताहि कमी झालेली नाहीं

एका कवीने म्हटले आहे, 'क्रोधोऽपि देवस्य वरेण तुल्य' त्याप्रमाणें सरकारने वर्तन केले गणपतींचे विसर्जन करून आपण त्यास जलसमाधि देण्यासाठीं नदीतीरावर पोंचवीत असताहि त्याना त्याबरोबर शिदोरी देतों त्याप्रमाणे या दूर केलेल्या अधिकाऱ्यास काहीं शिदोरी देऊन दूर केलें आहे

लोकमताला मान देण्याची श्रीमताची हीच पद्धत मला अधिक थोरवीची व समजसपणाची दिसते कारण पुष्कळदा अधिकारीवर्गासबधानें लोकमत द्विधा असते कोणी म्हणतात 'येथुनि आताच या खळा दवडा ' उलटपक्षीं कोणी म्हणतात, 'हाची सदा असावा' येथे मालकानीं कोणते ऐकावे ? मी म्हणतों कोणाचेच ऐकू नये कारण एकनाथ म्हणतात, 'सोवळ्या माणसाला काळा कुत्रा शिवला काय किंवा पाढरा कुत्रा शिवला काय ? स्पर्शदोष सारखाच ' त्याप्रमाणे अशा वेळीं श्रीमतानीं 'क्ष' पक्षाचे ऐकिले काय किंवा 'ज' पक्षाचे ऐकिले काय-परप्रत्ययनेयत्वाचा दोष श्रीमतावर येणारच परतु पृष्ठदताने म्हटले आहे, ' विधेयै क्रीडन्त्यो न खलु परतन्त्रा प्रभुधिय ' म्हणजे प्रभूने अनुवर्ती जीवाच्या बुद्धीने खेळ पाहावे पण वागावे स्वबुद्धीने, व त्याप्रमाणे श्रीमतानीं दूर केलेल्या अधिकाऱ्याचे कामात वर्तन केलें व तेथेहि आपल्या सौजन्यात अतर आणिले नाहीं

श्रीमताच्या या सौजन्याची छाप त्याच्या सहवासी जनावरहि पडल्याचे पाहून, ॲडिसननें सर रॉजर डी कॉव्हर्ले याविषयी म्हटले आहे कीं, त्या उमरावाच्या सौजन्याची छाया त्याच्या देवडीवाल्याच्या मुद्रेतहि प्रतिबिंबित झालेली मला दिसली, त्याची आठवण मला होते कारण मी उतरलेल्या पथिकाश्रमात (गेस्ट हाउस) माझ्या व अन्य पाहुण्याच्या शुश्रूषेला दिलेल्या माणसाची कार्यतत्परता दडभीतीने प्रेरित नसून केवळ सौजन्याने प्रेरित आहे, असेच माझे नजरेस वाटते पचवार्षिक कारकीर्दीत भिन्न भिन्न खात्यात वाढलेले खर्चाचे आकडे पाहता कारकीर्दीच्या सुरुवातीपेक्षा आजमितीस सुमारे ६० हजारानीं खर्च वाढला आहे, व काहीं कर माफ केल्यामुळे सुमारें १६ हजार रुपये उत्पन्नात तूट आलेली आहे, हे ध्यानात घेण्याजोगे आहे

साराश, सस्थानचा मगदूर व देशकालपरिस्थिति यास सभाळून शक्य तितके लोकहित व लोकसरक्षण करण्याविषयीं श्रीमताची दक्षता मला तरी प्रशसनीय वाटते

आता श्रीमताच्या टीकाकाराबद्दल मला दोन शब्द कर्तव्यबुद्धीनेच बोलणे आलें आहे कारण अध्यक्ष या नात्याने सरकारचे कृतींतले दोष दाखविणे हे जर माझें कर्तव्यच आहे तर लोककृतींतले दोष प्राजलपणे दाखविणे हेंहि

माझे कर्तव्यच आहे 'कुलाबा समाचारा'च्या एका अकात माझे तरुण मित्र रा तात्या मराठे यानी नागोठणे-पाली रस्त्यावरील सरकारी तोडीसबधाने लेख लिहिला आहे मराठे हे जनहिताविषयीं नितात आस्था बाळगणारे व तत्प्रीत्यर्थ स्वत घस सोसणारे आहेत आणि म्हणूनच त्यानीं तजावराहूनहि हा लेख लिहिला आहे पण या लेखातील भाषा स्थलविशेषी थोडी अवहेलनात्मक झाली आहे ती माझ्या मते ज्याना उद्देशून ती वापरली आहे त्याच्या अनुरूप नाहीच, पण मराठ्याच्या सभ्यतेशीं अनुरूपहि नाहीं, असे मी त्यास नम्रपणे सुचवितों

आमच्या या छोटेखानी सस्थानातील तालुका शहरे थोडया वस्तीची असल्याकारणाने तेथील अधिकारीवर्ग व ग्रामस्थ लोक याची एकत्र बैठक अनेकवार होते व त्यामुळे पुष्कळसा अति परिचय होतो आणि याचा परिणाम 'अतिपरिचयात् अवज्ञा' या म्हणीप्रमाणे कधी कधी होतो, असे माझ्या ध्यानात आले आहे त्याचाहि माझ्या बधूनीं विचार करावा

इतरानीहि टीका करताना श्रीमतानी आजवर जनतेसाठीं काय काय केले आहे ते न विसरता टीका करावी

अखेर परमात्मा श्रीमतास दीर्घायु व आरोग्य देवो असे मी इच्छितों, असे म्हणून मी आपली रजा घेतों ''

## परिशिष्ट १९

पष्ट्यब्दपूर्ति-समारभाचे वेळीं आलेल्या अभिनदपर तारा व पत्रे

श्रीमत राजेसाहेबाच्या पष्ट्यब्दपूर्ति-समारभास येण्याबद्दल श्रीमत राजेसाहेबाकडून व सत्कारसमितीच्या अध्यक्षाकडून अगत्याचीं निमत्रणे पाठविण्यात आलीं होतीं. त्या निमत्रणाप्रमाणे ज्याना येण्याची इच्छा असून इतर काहीं कामकाजामुळे समारभास येता आले नाहीं त्यानीं सदरहू समारभ यशस्वीपणे पार पडावा अशी आपली सदिच्छा व्यक्त करणारे शुभ सदेश

पाठविले ता. १९–२० सप्टेंबर १९३८ रोजीं होणाऱ्या समारंभाच्या वेळी, व श्रीमंताच्या आकस्मिक आजारीपणामुळे तो समारंभ तहकूब होऊन पुन्हा ता १६–१२–३८ रोजीं झालेल्या समारंभाचे वेळीं, अशा दोन्ही समारंभाच्या वेळीं सदेश आले त्यातील महत्त्वाचे व विशेष उल्लेखनीय सदेश व पत्रे आलीं तीं या ठिकाणीं उद्धृत केली आहेत (या सदेशात काहीं ठिकाणीं Golden Jubilee असे म्हणण्यात आले आहे, ते बरोबर नाहीं षष्ठ्यब्दपूर्तिसमारंभाबद्दल Diamond Jubilee असा शब्द पाहिजे सत्कार-कमिटीने पाठविलेल्या निमंत्रणपत्रामध्ये Golden Jubilee असा शब्दप्रयोग चुकीने केला गेल्यामुळे काहींच्या उत्तरामध्ये Golden Jubilee असा शब्द आलेला आहे )

September 1938

1 H E. Sir Roger Lumley, the Governor of Bombay, 19-9-38.

"On the occasion of your Jubilee celebrations Lady Lumley and I, whom you rightly count as your sincere friends and well-wishers, send you our warmest congratulations and best wishes for the happiness of yourself and your State in the future"

2 H H The Maharaja of Bikaner, 20-9-38

"Understand Your Highness is celebrating Golden Jubilee of your sixtieth year Please accept my heartiest congratulations and warmest good wishes for many more happy returns of the day"

3 Sir Akber Hydari, (Prime Minister, Hyderabad Dn ), 20-9-38 (To President, Central Celebration Committee )

"Thanks kind invitation but regret inability to come Kindly convey my heartiest congratulations to Raja Saheb on his sixtieth birthday and best wishes for many more returns of the same"

4 H E Lord Brabourne, the then Acting Viceroy of India.

Simla, 20-9-38

"Lady Brabourne and I send you our hearty congratulations and best wishes on the occasion of the anniversary which you are celebrating to-day."

5 Dewan for H. H the Maharaj Saheb of Baroda
21-9-38

" On the occasion of the completion of sixty years kindly accept His Highnes's hearty congratulations and good wishes for long life, happiness and prosperity "

6 H H The Maharaja of Kolhapur (To President, Central Celebration Committee)

" Regret inability to attend the Golden Jubilee of His Highness Raja Saheb Bhor Sincerely wish every success to the function and hope the subjects of Bhor will be so fortunate to be under the wise and benevolent ruler, the Raja "

७ डॉ रघुनाथ पुरुषोत्तम पराजपे याचे ता १५-९-३८ चे पत्र –

" श्रीमत राजेसाहेब सस्थान भोर याचा षष्ट्यब्दपूर्तिसमारभ करण्याचे ठरले आहे हे वाचून फार आनद झाला श्रीमत राजेसाहेबास उदड आयुरारोग्य लाभो अशी त्याच्या प्रजाजनाप्रमाणे त्याचे स्नेही व चहाते याचीहि प्रार्थना आहे श्रीमत राजेसाहेबास आपल्या लाखो प्रजाजनाचे कल्याण करण्याची व त्याचा दुवा मिळविण्याची अपूर्व सधि लाभलेली आहे. त्यांच्यासारखे शिकलेले, बहुश्रुत व जगातील निरनिराळे देश पाहून आलेले जे राजे आहेत, त्याच्याकडून लोक फार मोठी अपेक्षा करीत असतात ती पूर्ण करण्याचा प्रयत्न ते गादीवर आल्यापासून करीतच आहेत. तेच कार्य अखड करीत राहण्यास त्याना शारीरिक व मानसिक बल सदोदित असो अशी माझी मनापासून इच्छा आहे "

८ श्रीमत भवानराव श्रीनिवासराव पतप्रतिनिधि, राजेसाहेब, औंध याचे ता. १६-९-३८ चे पत्र —

"हिंदवी स्वराज्याच्या ग्रहणकाळीं ज्या पचरत्नानीं आपले प्राण व सर्वस्व खर्चीं घालून मराठ्याची गादी वाचविली, त्यापैकीं प्रतिनिधि व पतसचिव हे असून त्याचा सबधहि एकजीव व अकृत्रिम असाच आहे त्यामुळे या प्रसगीं आम्हास अत्यत आपलेपणा, अभिमान व आनद वाटणे साहजिकच आहे. देशकालपरिस्थिति व चालू राजवट या सर्व गोष्टी लक्षात घेऊन आमच्या पूर्वजानीं जे स्थान इतिहासात स्वत साठीं निर्माण केले, तशाच प्रकारचे थोर कार्य श्रीमत बाबासाहेब याच्याहि हातून होईल अशी आमची खात्री आहे. "

९ श्री रा यशवत रामकृष्ण दाते, सपादक व चालक, महाराष्ट्र शब्दकोश, याचे ता १७-९-३८ च्या पत्रातील उतारा —

" श्रीपरमेश्वरकृपेने आपल्या वयास साठ वर्षे पूर्ण होऊन एकसष्टाव्या वर्षांत आपण पदार्पण करीत आहात या परमेश्वरी कृपेबद्दल आम्हास फार आनद होत आहे महाराष्ट्रामध्ये शिवछत्रपतींच्या कालापासून अव्याहतपणे जीं काहीं घराणीं पदाधिष्ठित आहेत त्यामध्ये आपले घराणे असून आपल्या घराण्याची उज्ज्वल परपरा सर्व महाराष्ट्रास विदित आहे आपल्या पूर्वजानी अष्टप्रधानापैकीं महत्त्वाच्या उत्कर्षकालात जी महाराष्ट्राची, छत्रपतींची व जनतेची सेवा केली ती अत्यत अभिमानास्पद अशी होती, व ती परपरा आपण कालचक्रामुळे बदललेल्या परिस्थितीतहि कायम ठेवली आहे महाराष्ट्राच्या इतिहासात आपल्या घराण्याचे स्थान अढळ असून प्रत्येक महाराष्ट्रीयास त्याबद्दल अभिमान वाटण्यासारखे आहे

आपला सह्याद्रीच्या पृष्ठावरील निसर्गरम्य प्रदेश परकीय जनाच्या पदक्षेपापासून बहुधा सर्वस्वीं अलिप्त असा असून प्राचीन परपराचे व ऐतिहासिक व धार्मिक क्षेत्रादिकाचे रक्षण आपल्या प्राताइतके इतरत्र क्वचितच झालेले आढळून येते, व त्यामुळे शुद्ध सोज्वल अशी महाराष्ट्रीय स्वराज्यपरपरा व तत्पूर्वपरपरा आपल्या प्रदेशात जितकी पाहावयास सापडते, तितकी इतरत्र क्वचितच आढळून येते ही गोष्ट आपल्या सस्थानास अत्यत भूषणावह आहे

आमच्या शब्दकोशरचनेच्या कार्यांतहि आम्हीं आपल्या येथील अमूल्य शस्त्रादि वस्तुसग्रहाचा व रूढ, प्रणाली वगैरेंचा अभ्यासपूर्वक उपयोग करून घेतला आहे, व या कामी आपल्या दरबारने व श्री युवराज भाऊसाहेब यानी आम्हास बहुमोल साहाय्य केल्याबद्दल आम्ही आपले अत्यत आभारी आहों "

१० सरदार विष्णु नारायण मुतालिक, सातारा, याचे ता. १७-९-३८ चे पत्र.—

" श्रीमताच्या आयुष्यक्रमात त्याचे हातून अत्यत महत्त्वाचीं, प्रजेच्या सुखाचीं, सस्थानच्या प्रगतीची कार्यें घडून आलीं, त्याची आठवण झाली म्हणजे या प्रसगाचे महत्त्व किती आहे हे सागण्याची जरूरीच नाही भोर सस्थानच्या

प्रगतीच्या दृष्टीने आजपर्यंत पूर्वी कधीं झाली नाही इतकी प्रगति झाली श्रीमताना अनेक अडचणींच्या प्रसगाना तोंड द्यावे लागले व त्यानीं दूरदर्शी-पणाने व चातुर्याने अडचणी सोडविल्या आहेत त्याची जाणीव सर्वत्र आहे ''

११ सर मोरोपत जोशी याचे ता १७-९-१९३८ चे पत्र --

" भोरच्या प्रजाजनानी श्रीमत सरकार, सस्थान भोर, याचे ६० व्या वर्षी त्याचे अभिनदन करणे युक्तच आहे व इतका दयाळु प्रभु प्रजाजनाना लाभला आहे याबद्दल आपले अभिनदन करतो श्रीमत राजेसाहेबाचा व माझा प्रेमाचा पण निरपेक्ष असा बऱ्याच वर्षांचा सबध आहे त्याचे ठिकाणीं सौजन्यादि अनेक गुणाची जाणीव मला वेळोवेळी झाली आहे व म्हणूनच असा प्रभू आपणास पुष्कळ वर्षे टिकावा अशी मी इच्छा करतों व राजेसाहेब व त्याचे कुटुबातील माणसाना असेच अभिनदनप्रसग येवोत अशी उमेद बाळगतों ''

12 Letter from H H the Raja Saheb of Jamkhandi, 19-9-1938

"Without trying to enumerate the various generous and foresighted activities of His Highness the Raja Saheb in his abiding solicitude for the people entrusted to his care by Providence, he feels his duty to give expression to the keen regard and sincere admiration His Highness has won among his brother rulers in the Deccan, by his ready insight into political affairs and practical statesmanship and to wish the labours of the Jubilee Committee fullest measure of success

May His Highness be spared many many happy and prosperous years, long long to rule over his loyal and contented people "

7 Letter from H. H. the Raja Saheb of Phaltan, ( through the Private Secretary, to the President, C C Committee ), 17-9 1938

"Shrimant Raja Saheb congratulates you on your graceful action It is a fitting tribute to a long and beneficent reign. He also offers his own and the Darbar's greetings and good wishes to Shrimant Raja Saheb of Bhor and wishes your function great success '

14 Lieut.-Col Sir Harold Wilberforce-Bell, former A G G for Kolhapur and the Deccan States Agency in his letter dated 20th Sept 1938, says —

"We hope that you will be spared for many years more to rule your State and to work, as you have done, for the prosperity and happiness of your subjects I do hope that the Golden Jubilee celebrations will form a fitting and happy conclusion to such a long era as that comprised in 60 years Knowing how well things are done in Bhor and functions are celebrated, I feel quite sure that the celebrations on this occasion will not differ from the general rule"

15 Sir Bertrand Glancy, the then Political Secretary to the Government of India, in his letter of 22nd Sept, says —

"I write to thank you for your letter of the 12th instant which I have just received I much regret that I have been unable to leave Simla and take part in the celebrations of the auspicious event of the Golden Jubilee of the Raja Saheb of Bhor I trust that the celebrations of this happy event were attended with every success"

16 His Highness the Maharawal Saheb Bahadur of Dungarpur State, in his letter of 24th Sept 1938, says ( through his Private Secretary ) —

"It has not been possible for His Highness to be in person on this auspicious occasion of your joyous celebration It is however His Highness' fervent prayer that Shrimant Raja Saheb be spared to his people and to his brother Princes for very many years to come Rulers like him who have made themselves an ideal for their subjects and have given their best in the service of their people are a pride of the Princely order and it is but proper that the Raja Saheb's subjects should so eloquently express their feelings of devotion, loyalty and homage to their Ruler on this occasion"

१७ श्रीमत राणीसाहेब, रीजट ऑफ कुरुदवाड सीनियर, या आपल्या ता ६-१२-३८ च्या पत्रात म्हणतात —

" आपले ता ५-१२-१९३८ चे पत्र पावले आपल्या आकस्मिक आजारीपणामुळे तहकूब झालेला षष्ट्यब्दिपूर्तिसमारभ ता १६ ला साजरा करण्याचे आपल्या प्रजाजनानीं ठरविले हे समजून फार समाधान वाटले आपले प्रजावात्सल्य व प्रजेची राजनिष्ठा या दोन्ही गोष्टी अशा समारभाचा आनद द्विगुणित करतात हे निराळे लिहिणे नकोच "

१८ पुणे येथील प्रसिद्ध वैद्य आयुर्वेदाचार्य पुरुषोत्तम गणेश नानल हे ता ९-१२-१९३८ च्या पत्रात लिहितात —

" ईशकृपेने प्रस्तुतचा समारभ प्रजेच्या दृष्टीने अपूर्व असाच आहे

श्रीमत सरकारचे प्रकृतीला आजपर्यंत अनेक शारीरिक व मानसिक धक्के बसले आहेत या सर्वहि सकटातून बचावून ज्या दीनवत्सल प्रभू रामचद्राने हा सोन्याचा दिवस दाखविला, तोच प्रभू रामचद्रजी श्रीमत सरकारचे हातून उत्तरोत्तर प्रजेच्या हिताचे दृष्टीने अधिक भरीव कार्य घडवून आणील "

१९ श्रीमत भवानराव श्रीनिवासराव पतप्रतिनिधि, राजेसाहेब औंध, हे आपल्या ता १३-१२-१९३८ इ च्या पत्रात लिहितात —

" श्रीमत राजे बाबासाहेब पडित पतसचिव, राजेसाहेब सस्थान भोर, याचा षष्ट्यब्दिपूर्तिसमारभ ता १६-१२-१९३८ रोजीं होणार त्यासबधींची निमत्रण-पत्रिका पोहोंचून परम सतोष झाला ज्या पाच पुरुषानीं हिंदुपद-पातशाहीची ढळती इमारत स्वत च्या सामर्थ्यावर तोलून ती महा दिव्यातून व सकटातून शीरसलामत नेली, त्या नररत्नात प्रतिनिधि व पतसचिव या दोन्ही गादीचे पूर्वज आहेत अर्थात् अशा आनदाचे प्रसगीं आमचा उत्साह अपरिमित होणे हे अगदीं स्वाभाविक आहे औंध व भोर या दोन गादींचा अकृत्रिम स्नेहसबध त्या वेळेपासून ते आजतागायत चालत आला आहे, ही अत्यत सतोषाची गोष्ट आहे

या प्रसगीं आम्ही श्रीमत बाबासाहेब याना श्रीजगदबेने अखड आरोग्य दीर्घायुष्य द्यावे असे इच्छितों व बदलत्या मनूप्रमाणे त्याची कारकीर्द त्याना व त्याचे प्रजाजनास सुखावह होवो अशी सदिच्छा प्रकट करितों. "

२० पुणे येथील मीमासा-विद्यालयातील वे शा स दत्तात्रयशास्त्री ताबे हे आपल्या १५-१२-१९३८ च्या पत्रात लिहितात —

" I shall be ever praying for your long life, good health and popularity among the subjects to the Fire-God in three forms

May the Fire-God shower upon you his blessings and may He grant you श्रद्धा, मेधा, यश, प्रज्ञा, आयुष्य, तेज, आरोग्य "

21 Dr R P Paranjpye, in his letter of 27th December 1938, says —

" I was very glad to read in the papers your recent announcement of reforms in your State and to hear that your subjects are grateful to you and love you all the more I hope that in the new atmosphere thus created your State and your house will attain increasing prosperity "

22 Prof Hari Prasad Shastri of Shanti Sadan in London in his letter of 15th January 1939, says —

" The Sat–Sangas of Shanti Sadan, London, congratulate Your Highness on the attainment of sixty years of age and pray to Lord Krishna that He may grant you many more years of joy, wisdom and Bhakti, to enable you to rule over your loving subjects in the spirit of Ram

Om ! Shanti ! Shanti !! Shanti !!!"

23 Col Gordon Neale, Pol A D. C to the Secretary of State for India, in his letter of 7th Feb 1939, says —

"( Very many thanks for your kind greetings for the new year and Makar Sankrant ) May I take this opportunity of congratulating you on having now reached the Diamond Jubilee of your life and wishing you more years of health and happiness "

24 Mr F H Brown, of the East India Association, London, in his letter dated 10th February 1939, says —

" I read with great interest the account in *The Times of India* of the celebrations of your 60th birthday and the

announcement Your Highness then made of many far-reaching reforms I feel that you were well advised to make these announcements and to intimate that Responsible Government was to be the goal of your administrative policy It is far better, as your own experience has shown to take the initiative in constitutional, educational and general advancement, rather than to have such changes demanded at the price of a great deal of agitation The position in many of the Indian States of late has been disquieting and I am glad to think that owing to your enlightened and far-sighted policy you have escaped, so far as I can gather, the unrest and trouble which has broken out in so many other principalities I take the opportunity to wish you many further years of service to your State and of seeing its development on the liberal lines which you have followed "

२६ पुणे येथील शेट ताराचद रामनाथ आयुर्वेदिक हॉस्पिटलच्या चिटणिसाचे पत्र आले, त्यात ते म्हणतात—

( रा त्र्यबकशास्त्री आपटे व डॉ मा पु जोशी, चिटणीस )

" शेट ताराचद रामनाथ आयुर्वेदिक हॉस्पिटल, पुणे, या आमच्या सस्थेच्या साप्रतच्या उत्कर्षाचे बरेचसे श्रेय श्रीमताकडे असल्यामुळे सस्था श्रीमताचे वारवार स्मरण करीत असून या समारभाच्या निमित्ताने श्रीमताना दीर्घ आयुष्य आणि आरोग्य चिंतीत आहो उन्नत अवस्थेला प्राप्त झालेली ही सस्था श्रीमतानी पुन्हा एकवार अवलोकन करावी व तिच्याच सन्निध नवीन बाधलेल्या इमारतींत चालू असलेले आमचे आयुर्वेद महाविद्यालय हेहि एक वेळ नजरेखालीं घालावे असे आम्ही इच्छीत आहो "

# परिशिष्ट २०

वेदिक शास्त्रीपडितानीं षष्ट्यब्दपूर्तिसमारंभाचे वेळीं दिलेले आशीर्वाद

## श्रीमत्पंडितपंतसचिवानां ‘राजा’ इति बिरुदशालिना

## रघुनाथरायाणां षष्ट्यब्दपूर्त्युत्सवे

## आशीर्वादयुतं संमाननपत्रम् ।

श्रीराम भज काम सकलजनमनोरथप्रदातारम् ।
धृतधनुष दाशरथि सीतया सह वने विहरन्तम् ॥ १ ॥

श्रीमानत्रिकुलोद्भव सुसचिवो विद्यावधूना वर ।
भूप श्रीरघुनाथनामकलितोऽनीतेर्विरक्तो भृशम् ॥
गोविप्रप्रतिपालक सममना यो धर्मराजोऽपर ।
समान्योऽद्य जनै सहाश्रितगणैरित्यागता स्मो वयम् ॥ २ ॥

त्रय्यभ्यासपरोऽस्तु वैदिकगण शास्त्रार्थचर्चां बुधा ।
कुर्युर्यज्ञविदो यजन्तु चरितान्यारूयान्तु पौराणिका ॥
गायन्तु स्वरकोविदा अविरत नृत्यन्तु वाराङ्गना ।
यद्देव सुकृतार्णवोऽद्य वयस षष्टि द्वितीया विशेत् ॥ ३ ॥

भो भो श्रीरघुराज पण्डितसखे षष्ट्यब्दपूर्त्युत्सवे ।
विज्ञप्ति परिगृह्य नोऽजनि जने यस्मादुदार सुखम् ॥
तस्मात्स्वीकुरु सत्क्रियां नरवर स्रग्भि सम चाऽऽशिष ।
तेन स्यात्सकलोऽयमाश्रितजनो मग्न प्रमोदार्णवे ॥ ४ ॥

देशोत्कर्षकरो नरो हि बहुधा राजादरानास्पदम् ।
राजोत्कर्षपरो नर पुनरय लोकादराद् हीयते ॥
सत्येव रघुनाथराय भवता लब्ध द्वयं दुर्मिलम् ।
मन्येऽसौ महिमा चकास्ति भवत पाण्डित्यसाचिव्ययो ॥ ५ ॥

प्रजानुरागश्च नृपादरश्च द्वय विरुद्धं खलु ये वदन्ति ।
ते नैव जानन्ति यतो न दृष्टो भोराधिपस्तै रघुनाथराज ॥ ६ ॥

श्रीमद्भोरमहामहीन्द्र यदिमे प्रोच्चावचा मानवा ।
धाव धावमिहागमन् कृतधियस्त्वत्पूजने कौतुकात् ॥
तानेतान् कुसुमस्रज सुरभिला श्रीनारिकेलादिकम् ।
धृत्वा स्वीयकरे स्थितांश्चिरतरं दृष्ट्वा कृतार्थान् कुरु ॥ ७ ॥

प्राज्ञः सत्कुलजो ह्युदात्तचरितो नीत्येकनिष्ठः सदा ।
श्रीमान् सत्सचिवाग्रणी. सुरपतेर्मन्त्रीव चातुर्यभाक् ॥
श्रीमद्दाशरथे कटाक्षकृपया संप्राप्तधीवैभव. ।
सोऽयं विश्वनुतो मदीयहृदये जेजीयतां सर्वदा ॥ ८ ॥

बुद्धिस्तीव्राऽभ्यसनचतुरा मञ्जुला यस्य वाणी ।
नातिस्थूला न हि च सुकृशा मध्यमा देहयष्टि ॥
शीलं हृद्यं विनयमधुरं वर्तनं नीतियुक्तम् ।
मूर्तिस्तेऽसौ हृदयकमले जृम्भता नश्चिराय ॥ ९ ॥

स्वीयाद्वीर्यात्प्रथितयशसे श्रीमते यद्वरेण्यम् ।
लब्ध स्थान स्वतनुजजनैर्भुङ्क्ष्व कालं चिराय ॥
बध्नीमस्ते तनुशुकममुं पञ्जरे चित्तसंज्ञे ।
लोकानां न स्मृतिमनुदिनं धत्स्व भूदेवदेव ॥ १० ॥

एव कृतकर्तव्यस्य भवतः किमन्यत् आशासितव्यम् ?
तथापीश्वरसंनिधौ इदमाशास्यते !

प्रोच्चै शिक्षणके भवन्तु निरता सर्वा प्रजा सात्मजा ।
तासां ताश्च विपत्तयो बहुविधा नश्यन्तु वित्तार्जनात् ।
देशोऽयं च धनाढ्यतां समधिकामायातु लोकोद्यमात् ।
जीव्यास्त्वं शुभराजकार्यनिरत. साङ्ग शतं वत्सरान् ॥

भोराख्यपत्तने
श १८६० बहुधान्यनामसवत्सरे
भाद्रपद व॥ १० इन्दुवासरे

श्रीमदाश्रित
आहिताग्निः दीक्षितवासुदेवात्मजो हरिशर्मा

---

## श्रीमतां राज्ञां भोरमंडलाधिपानां रघुनाथशर्मणां वर्षवृद्धिदिनमहोत्सवे आशीर्वादपद्यानि

## तत्रादौ देवताप्रार्थनापूर्वकं आशीर्युक्तमंगलम्

वृत्तम् शार्दूलविक्रीडितम्

विघ्नेशो कुलपूजिता भगवती श्रीरेणुका मल्लहा ।
श्रीरामोपि दयानिधि प्रभुवर श्रीशंकरश्चाद्यनो ॥
आदित्यादिनवग्रहैश्च सहिता' भूपाल ते नूतने ।
प्राप्ते मंगलवर्षवृद्धिदिवसे कुर्वंतु वो मंगलम् ॥ १ ॥

वर्षवृद्ध्यगपूज्यदेवताप्रार्थना

आदौ श्रीकुलदेवता जननभ देवस्वरूपेण यौ।
तिष्ठतौ पितरौ प्रजापतिरथो भानुश्च विघ्नाधिप ॥
मार्कंडेयमुनि पुराणजनिता व्यासस्ततो भार्गव ।
अश्वत्थामकृपौ बलिश्च नृपति प्रल्हादभक्तो हरे ॥ २ ॥
रुद्र श्रीर्हनुमान्बिभीषणनृप षष्ठी तु देवी तत ।
इत्थ देवगणस्य पूजनविधि. शास्त्रे विधौ दर्शित ॥
सर्वे सप्रति पूजया च मुदिता भूपाल ते यच्छन्तु।
दीर्घायुर्निरुजत्वमीशपदयो सप्रार्थयामो वयम् ॥ ३ ॥

रूपकालंकारेण राजकीर्तिवर्णनम्

यत्कीर्ति कुलजा वधूरिव पुरा गूढं सुसचारिणी।
मद निक्षिपते पदानि यदपि देशांतरे प्रस्थिता ॥
स्वल्पैस्सा दिवसै परं च ववृधे प्रौढा दशामाप्तवान ।
सर्वत्रैव सदा प्रचारणपरा यस्या न रुद्धा गति ॥ ४ ॥
सा तु स्वैरनिरर्गला प्रचरति स्पष्टप्रतीका सती ।
यत्रागच्छति तत्र तत्र रमते लोकान् पर रजयन् ॥
प्राकाश्यं स्वयमेव याति स्वगुणै कस्तूरिकाऽऽमोदवत् ।
गुप्त नैव भवेत् कदाचिदपिहि लोकोत्तर सद्गुण ॥ ५ ॥

कीर्त्या निर्मलकांतिमत्ववर्णनम्

स्वर्गंगामवगाहते सुविमला हंसीव कीर्तिस्तव ।
मुक्तानैव प्रयांति कीर्ति समता यद्बिंदुरूपाश्च ते ॥
चद्रोऽय स्वपर कलंकरहित यत्ते यशो निर्मलं।
अन्या स्वर्धुनिकिन्नु सर्वपथगा जाता बुधाद्भूभृत. ॥ ६ ॥

राशिस्वरूपशिववर्णनपूर्वकम् आशीर्वाद । वृत्तं उपजाति ॥

षष्ठ्याहिमाद्रे रथपंचमेन युग्येन सामीप्य चरेण युक्ता।
भाव तृतीय गमितश्च गौर्या द्वितीय पत्रोद्यग नेत्ररूप. ॥
अंकेन शैलेन विभूषितांग ये पीडयंतिसममष्ठमेन ।
लोकान् पुरा सप्तसमाश्च दग्धा. चादित्य पक्तिध्वजधक्स्मरारि ॥ ७ ॥
पीयूषपूर्णास्सचतुर्थ रुद्रा. स्वात्मीय भद्राय धृता. करेण।
स त्वां शिवो रक्षतु राशिमूर्ति पौत्रेण साक तनयादिभिश्च ॥ ८ ॥

श्रीमताकुलपुरोहित

**धुंडिराजात्मजः बालशास्त्री शर्मा**

## श्रीमान् प्रभुशक्तिसंपन्नो भोरग्रामाधिपतिः विजयतेतराम्

याज्ञवल्क्यादिभिर्याद्दग्राजतत्त्वमुदीरितम् ।
कल्पनामयमद्यत्वे प्रत्यक्षं समजायत ॥ १ ॥
प्रजाजनेन कर्तव्यं नृपस्याभीष्टचिन्तनम् ।
नृपेणापि च कर्तव्यं प्रजानामनुरजनम् ॥ २ ॥
अनयोरेष संबंधो योऽयं मन्वादिभि स्मृत' ।
तमत्रालोच्य सततं भृशं प्रीणाति मानसम् ॥ ३ ॥
एषा परिस्थितिर्वृद्धि प्राप्नुयादुत्तरोत्तरम् ।
इति प्रार्थयते चेत श्रीरामं प्रत्यहर्निशम् ॥ ४ ॥
श्रीरामोऽप्यनुगृह्णातु भक्तमेनं महीपतिम् ।
तस्यैव कृपया सर्वमभीष्टं याप्यते ध्रुवम् ॥ ५ ॥
वर्षे षष्टितमे शान्त्या काय पुष्यति मत्रत ।
तदारोग्यं विजानीयादैश्वर्यं च यथेप्सितम् ॥ ६ ॥
आशास्यमन्यत्पुनरुक्तभूतं श्रेयांसि सर्वाण्यधिजग्मुषस्ते ।
महाकवेरुक्तिरियं पुराणी स्मृति समारोहति नूनमद्य ॥ ७ ॥
अभ्यंकरोपाभिध वासुदेव. श्रीरामचंद्रांघ्रियुग प्रणम्य ।
आरोग्यसंपत्तिरमुष्य राज्ञो भूयादिति प्रार्थयते नितान्तम् ॥८॥

—महामहोपाध्याय **वासुदेवशास्त्री अभ्यंकर**

## अर्थ

राजाच्या सर्व सामर्थ्याने युक्त असे जे भोरचे राजेसाहेब त्याचा सर्वत्र जयजयकार असो

१ याज्ञवल्क्य आदिकरून जे स्मृतिकार होऊन गेले त्यानीं राजाच्या अगीं कोणते गुण असले पाहिजेत याबद्दल काल्पनिक वर्णन केले आहे परतु ते सर्व गुण आज राजेसाहेबाच्या ठिकाणीं प्रत्यक्ष वास करीत आहेत

२ प्रजेने नेहमीं राजाचे अभीष्ट चितन करीत असावे व राजेलोकानीं नेहमीं प्रजेला सतुष्ट राखावे

३ असा राजा व प्रजा याचा परस्पर सबध आहे, हे मनु व इतर स्मृतिकार यानीं लिहून ठेवले आहे हा सबध आपल्या या सस्थानात सतत पाहावयास सापडतो, म्हणून आम्हाला फार सतोष वाटत आहे

४ राजा आणि प्रजा याचा हा जो सबध वर वर्णन केला आहे तो सबध चिरकाल टिकून त्याची उत्तरोत्तर वृद्धि व्हावी अशी आम्ही प्रभु रामचद्राजवळ रात्रदिवस प्रार्थना करीत आहों

५. प्रभु रामचद्राचे भक्त जे राजेसाहेब याच्यावर श्रीरामचद्र कृपा करो ! खरोखर श्रीरामचद्राच्याच कृपेने सर्व इच्छित हेतू पूर्ण होतात

६ साठ वर्षे पुरीं झालीं म्हणजे शाति करतात त्या वेळी जे मत्र म्हणतात त्यायोगाने शरीरामध्ये बल वाढते, आरोग्य प्राप्त होते ऐश्वर्याची वृद्धि होते व सर्व कामना पूर्ण होतात

७ रघुवशामध्ये कालिदास कवीने वरततु ऋषीचा शिष्य कौत्स्य याने रघु राजास आशीर्वाद दिला आहे ' हे राजा, सर्व ईप्सित हेतू तुझे परिपूर्ण झाले आहेत आता तुला आणखी आशीर्वाद देणे म्हणजे पुनरुक्ति होणार ' कालिदासाच्या या प्राचीन उक्तीची आज आम्हास पुन्हा आठवण होते

८ वासुदेव अभ्यकर प्रभु श्रीरामचद्राचे चरणी नमस्कार करून, श्रीमत राजेसाहेब याना आरोग्य प्राप्त होवो, त्याची भरभराट होवो अशी अत करणपूर्वक प्रार्थना करीत आहे

—महामहोपाध्याय **वासुदेवशास्त्री अभ्यंकर**

## तत्रभवतां राज्ञां श्रीमतां बाबासाहेब इत्याख्यानां पंतसचिवोपाधिमतां महाराजानां षष्ट्यब्दपूर्तिमहोत्सवे अभिनंदनम्

प्राय षष्ट्यब्दपूर्तौ करणविकलता दृश्यते मानुषाणाम् ।
बुद्धेश्चाप्यक्षमत्व पटुकृतिरचने सर्वसाधारणं तद् ॥
ते स्यु तस्यापवादा सुकृतचयपरा केऽपि लोकोत्तरा ये ।
राजंस्तादृग्भवानप्यनिशमनुमत प्राप्नुयात्पूर्णमायु ॥ १ ॥
राजान कतिवा न सन्ति भुवने नित्य प्रजापीडका ।
लोकानामनुरजनेन रहिता नाम्नैव राजाभिधा ॥
अन्वर्थत्वमुपागतां तु भवतो दृष्ट्वा तदाख्यां पराम् ।
युञ्ज्यामाशिषमन्वहं नरपते जीव्या शत वत्सरान् ॥ २ ॥

—**श्रीसीतारामशास्त्रिणः**

### अर्थ

महाराज श्रीमत बाबासाहेब पतसचिव राजेसाहेब याचे वयास साठ वर्षे पुरीं झाली या षष्ट्यब्दपूर्तिमहोत्सवाचे प्रसगीं केलेले राजेसाहेब याचे अभिनदन

१ मनुष्याचे वयाला साठ वर्षे पुरीं झालीं म्हणजे त्याचीं सर्व इद्रिये विकल होतात कोणतेहि उत्तम बुद्धीचे काम करण्यास तीं असमर्थ होतात, असे आढळण्यात येते व ही गोष्ट सर्वसाधारण आहे परतु ज्याची पूर्वपुण्याई मोठी आहे व जे पुरुष लोकोत्तर असतात ते या गोष्टीला अपवाद असतात व त्याप्रमाणेच, राजेसाहेब, आपण आहात असे नेहमी सर्व लोक म्हणतात आपणास पूर्ण १०० वर्षे आयुष्य प्राप्त होवो

२ जे राजे प्रजेला नेहमीं छळतात, ज्याना प्रजेच्या कल्याणाची मुळीच कळकळ नाहीं व जे फक्त नावाचे राजे आहेत असे राजे या पृथ्वीच्या पाठीवर किती तरी आहेत. परतु आपण ‘ राजा प्रकृतिरजनात् ’ म्हणजे जे प्रजेच्या कल्याणाकरिता झटतात ते राजे ही ‘राजा’ या शब्दाची व्याख्या आपण सार्थ केली आहे ही आपली मोठी कीर्ति ऐकून आम्ही महाराजास रात्रदिवस आशीर्वाद देत आहों कीं, राजेसाहेबाना शभर वर्षे आयुष्य लाभो

महामहोपाध्याय

**सीतारामशास्त्री शेंडे.**

भोर येथील प्रसिद्ध वैद्य नारायण नरहर भावेशास्त्री यानीं षष्ट्यब्दपूर्ति-समारभानिमित्त ता १७ माहे डिसेबर १९३८ इसवी रोजी भोर येथे राजवाड्यात अखेरच्या दरबारात दिलेले वैदिक आशीर्वचन

शास्त्रीबुवानीं आशीर्वाद इग्रजी भाषेत दिला, परतु तो मूळ सस्कृतात असल्यामुळे, शास्त्रीबुवाचे इग्रजी भाषातर व सस्कृत मूळ या ठिकाणीं दिले आहे

"May God who rules the world bestow on you the power to rule your subjects May fire, worshipped by householders, bestow on you supremacy over the householders May Soma, the Lord of Trees, bestow on you supremacy over forests, May Brihaspati, the God of Speech, bestow on you supremacy in speech May Indra, the highest among Gods, bestow on you the highest supremacy May Rudra, the cherisher of animals, bestow on you supremacy over animals, May Mitra, who is truth, make you supreme in truth May Varuna, who cherishes holy works, make you supreme in holy acts."

सविता त्वा सवानां सुवतामग्निगृहपतीना सोमो वनस्पतीनाम् ॥
बृहस्पतिर्वाच इन्द्रो ज्येष्ठयाय रुद्र पशुभ्यो मित्र' सत्यो वरुणो धर्मपतीनाम् ॥

—वाजसनेयि श्रीशुक्लयजुर्वेदसहिता अध्याय ९, कण्डिका ३९, मत्र १

## श्रीमद्रघुनाथभूपतिप्रशस्तिः ॥

श्रीमद्गोद्विजधर्मरक्षणचणं साम्राज्यसिंहासनम् ।
मन्त्रित्वेन सुसेव्य यै प्रकटिता सा स्वामिनिष्ठा परा ।
तद्गोत्रं सचिवाह्वयं विजयते सत्यैकवंद्यम् भुवाम्
राजश्रेणिवने सुवृत्तमधुरं शार्दूलविक्रीडितम् ॥ १ ॥

जेताऽसीच्छकराजीति नारायणपिता गुणी ।
सात्त्विक सत्यसपन्नस्तेनाऽस्थापि नृपासनम् ॥ २ ॥

हेमंतचन्द्रप्रियता प्रजानाम् बध्नाति सूर्ये स्वपद तथात्र ।
रङ्कार्तिविध्वंसिनि राज्यपीठे घुष्टीद्रवज्रानुकृतानुराग ॥ ३ ॥

नाथितश्च येन शकराजिशर्मणा पुरा थम्य वशनदन स्वनाक्षरादिकस्य हि ।
राज्यनाथतां तत स आप्तवान्निजाद्बलात् वज्रवृत्ततूणकप्रयुक्तबाणवर्षणात् ॥४॥
बाधिताऽखिलारिवेग शकराजिशर्मणो बालासिंहसार शकरोऽध्यतिष्ठदुत्तरम् ।
सामरर्षिवृंदजुष्टराजताचलं यथा हेरिक प्रजाबलं नृपासनं स शकर ॥ ५ ॥
बभ्रुवद्दुराश्रये नृपासने प्रतिष्ठितो पाचितात्मराज्य-कोश शकर प्रियकर ।
डिण्डिमे स्वराज्यषोडशत्रयाब्दपालनात् तद्भवां यशोध्वनि श्रिय न्यधत्त चात्मजे॥६

पताख्ये सचिवकुले ततोऽर्कवंशे तत्त्वात्मप्रियरघुनाथभूपवर्य ।
सत्यात्मप्रभुरघुनाथवत्तदाऽभूत् चिद्वृत्ति प्रकृतिजने प्रहर्षिणी च ॥ ७ ॥
वद्येऽष्टादशशतकेऽष्टमीनभस्ये संस्मर्य शतगुणत पितुर्गुणेभ्य ।
भोगार्थैर्विभजयितेतरान्प्रजाश्चरक्तोराज्यनयविधौ निसर्गतोय ॥ ८ ॥
या नृपस्य नयसंस्कृता मतिम् नामयोग्यबुधतोषदा कृतिम् ।
सार्वभौमनृपतिश्च वीक्ष्य ताम् तातराज्यभुजमातनोद् रुतम् ॥ ९ ॥
राजन्वती यस्य वशस्थभूमि संचारयोग्या सुजनस्य नेमि ।
स्कृत्या· शरण्या च समादिकाया· तद्राजवृत्त जयतात् पृथिव्याम् ॥ १० ॥

विश्वस्मिन्नेषभूप पृथुरिव धरतांस्वा प्रजा स्वं च धर्मम्
द्यामुत्संसर्पिशुभ्रं ध्रुव इव लभतां कीर्तिपुञ्जं स्वधाम्ना ।
लक्ष्मीभर्तेवनित्यं स्व-परबुधजनाया श्रयो जायतांसः
या सैषायुष्यपुष्पग्रथितसुमधुरा स्रग्धरा तस्य मूर्ति ॥ ११ ॥

चेतोवाक्प्राणशक्तिस्थिरकरणपटौ षष्टिशांतौ यथार्हम्
अश्वत्थामादयश्च क्षितिसुरपठताम्नायमत्रार्चिता ये ।
भित्वाकालाहिभीति नियतिहतजनायुष्यवर्चः प्रदास्ते
वाय्विद्राशंविदध्यू रघुनृपतिमिमं प्राप्तदीर्घायुषं तम् ॥ १२ ॥

दक्षश्रीरघुनाथराजनगरं स्वर्गायिता भूभुजाम्
नम्याना निलयायता नृपसभा-नीत्यो सुधर्मायताम् ।
लक्ष्म्या विष्णुपदायतां निजकुलोत्पन्नस्य भूपायताम्
श्रीराम' सकलंकरोत्विर्तिवचो माणेश्वरस्याशिष ॥ १३ ॥

मार्गशीर्ष व ९, शके १८६० —**माणेश्वरशास्त्री गोकर्णकर**

मराठी भाषांतर

१ गोब्राह्मणाचे व स्वधर्माचे सरक्षण केल्याने प्रसिद्धीस आलेल्या साम्राज्यसिंहासनाची अष्टप्रधानापैकी एखाद्या नात्याने सेवा करून ज्यानी आपली उज्ज्वल स्वामिनिष्ठा प्रकट केली, तो राजसमूह अरण्यात सिंहाप्रमाणे खेळणारा, सदाचरणाने लोकप्रिय झालेला व सत्याचरणाने प्रशसनीय ठरलेला पतसचिवाचा वश सर्व जगात श्रेष्ठ रीतीने विजय पावत आहे

२ शकराजी नारायण नावाचा मोठा पराक्रमी, सद्गुणी, सत्त्वस्थ आणि सत्यनिष्ठ योद्धा या वशाचा पूर्वपुरुष होता त्याने ही राज्य-गादी स्थापिली

३ हिमकालात लोकाचे चद्रावरील प्रेम जसे सूर्याचे ठिकाणीं जडते, त्याप्रमाणे दीनाचे दैन्य फेडणाऱ्या इद्रवज्राप्रमाणे पराक्रमी अशा त्या सिंहा-सनावर प्रजेचे प्रेम जडले

४ आपले स्वामी श्रीशिवछत्रपति याच्या वशाकुराचे राजाराममहा-राजाचे सरक्षण आपल्या भात्यातील वज्रप्राय बाणांचा वर्षाव करून शकराजी नारायण यानीं केले त्यामुळे त्याच्या वशास हे राज्यपद लाभले

५ शकराजी नारायणावर सिंहाच्या छाव्याप्रमाणे सामर्थ्यवान् असे श्रीमत शकरराव, कैलासावर शकर देवगणासह शोभतो, त्याप्रमाणे आपल्या प्रजेच्या सान्निध्यात सिंहासनावर शोभले

६ आश्रय करण्यास अग्नीप्रमाणे कठीण अशा सिंहासनावर अधिष्ठित झालेले शकरराव आपले राज्य व खजिना विस्तृत करून लोकप्रिय झाले अशा प्रकारे अठ्ठेचाळीस वर्षे राज्य रक्षण करून कीर्तीबरोबर राज्यलक्ष्मी त्यानीं औरस पुत्राच्या स्वाधीन केली

७–८. नतर पतसचिवाच्या कुळात शके १८०० च्या भाद्रपद वद्य अष्टमीच्या सुमुहूर्तावर सद्‌गुणामुळे प्रजेला ज्याचे वारवार स्मरण होत असते असे प्रजेला व तदितर लोकाना देखील सुखसपदा प्राप्त करून देणारे, स्वाभाविक राज्य व राज्यनीति याची आवड असलेले, सत्यनिष्ठ लोकावरच प्रेम करणारे श्रीमत सरकार रघुनाथराव राजेसाहेब सूर्यवशातील सत्यनिष्ठ प्रभू रामचद्राप्रमाणे जन्मास आले, तेव्हा सर्व प्रजेची मनोवृत्ति हर्षप्रफुल्ल झाली

९. रघुनाथ भूपतीची नीतिशास्त्राभ्यासाने सुसस्कृत झालेली मति, आणि नावाला साजेलशी विद्वज्जनाना सतुष्ट करणारी कृति पाहून आग्ल सार्वभौमाने वडिलानतर त्याना लगेच सिहासनावर बसविले

१० त्याच्या अधिकाराखालची भूमि प्रगमनीय राजाचा सबध आल्याने विशेष शोभत आहे ज्याच्या राज्याची सीमा सज्जनसचारास योग्य आहे व ज्याच्या राज्यातील प्रजा स्वसस्कृति-सरक्षक आहे त्या रघुनाथराव राजेसाहेबाचा पृथ्वीवर विजय होवो.

११ प्रख्यात पृथुराजाप्रमाणे हे रघुनाथराव राजेसाहेब आपली प्रजा व स्वधर्म याचे पालनकर्ते होवोत ध्रुवाप्रमाणे आपल्या तेजाने धवल कीर्तिराशि स्वर्गाच्याहि पलीकडे नेवोत लक्ष्मीपति महाविष्णूप्रमाणे स्वजन व पडितजन याना आश्रय देवोत आणि त्याचा देह दीर्घायुष्यपुष्पानीं गुफलेल्या हाराने सुशोभित होवो.

१२. ज्ञानेद्रिये, कर्मेद्रिये व प्राण याची शक्ति स्थिर करण्यास समर्थ अशा या उग्ररथशातींत ब्राह्मणश्रेष्ठींनीं विधिपूर्वक उच्चारलेल्या वैदिक मत्रानीं पूजित झालेले, कालरूपी सूर्याची भीति नाहींशी करून हतभाग्य मानवसमुदायाला दीर्घायुष्य व वर्चस्व देण्यास समर्थ असे अश्वत्थामादि सात चिरजीव, वायु, इद्र इत्यादि, लोकपाळाचे अशरूप अशा या रघुनाथ भूपतींना दीर्घायुषी करोत.

१३ चतुर अशा श्रीमत रघुनाथराव राजेसाहेबाचे नगर इतर राजाना स्वर्गाप्रमाणे रमणीय भासो ते पूज्य लोकाचे निवासस्थान होवो राजनीति आणि राजसभा याना इद्राच्या सुधर्मासभेप्रमाणे आश्रय होवो वैकुठाप्रमाणे दैवी सपत्तीला आधार होवो सचिव घराण्यात जन्म घेतलेल्याना आपल्या सत्तेचे होवो श्रीप्रभू रामचद्र वरील सर्व वाक्ये सफल करो, अशी कवि माणेश्वराची इच्छा आहे

**—माणेश्वरशास्त्री गोकर्णकर**

# परिशिष्ट २१

## षष्ठयब्दपूर्ति-समारंभातील दुसऱ्या दिवशीच्या आहेराचे दरबारमधील श्रीमंत राजेसाहेब यांचे भाषण

### शनिवार, ता १७-१२-१९३८

" सभ्य स्त्रीपुरुषहो,

आमच्या षष्ठयब्दपूर्ति-समारंभातील आजच्या कार्यक्रमास उपस्थित झालेल्या आपणा सर्वांचे आम्ही आनदाने व अत करणपूर्वक स्वागत करतों. आपण कित्येकजण या कार्यक्रमास मुद्दाम आलात व येथे राहिलात याबद्दल आम्ही आपले फार आभारी आहोंत

सज्जनहो, देवताप्रसाद व वैदिक आशीर्वाद याचे महत्त्व व उपयुक्तता आम्ही फार समजतों यास्तव ज्यानी या सुसमयीं आपल्या परमपूज्य गीर्वाण व तद्भव मराठी भाषेत कविता करून आमच्याबद्दलची आपली सद्भावना प्रगट केली त्याच्या त्या कृतीविषयीं वाटणारी उपकृतता व सतोष बोलून दाखविण्यास आम्हास आनद वाटत आहे आम्हीं हे सर्व श्लोक वाचले आहेत त्यातील आशय मार्मिक व समयोचित असल्याचे आम्हीं वेगळे सागितले पाहिजे असे नाहीं त्याचा आम्ही आदराने व प्रेमाने स्वीकार करीत आहोंत

आताच या आनदाच्या प्रसगाचे स्मारक म्हणून ४ ग्रथ आम्हास अर्पण करण्यात आले आहेत पैकी पहिले छोटेखानी पुस्तक आमची नात चि कुमारी विमलाराजे यानी या समयाकरिता म्हणून आपल्या बालमैत्रिणीच्या साहाय्याने लिहून आम्हास अर्पण करण्याची आपली इच्छा दर्शविली आम्हास त्याच्या ह्या कल्पनेचे व प्रयत्नाचे कौतुक वाटले त्याप्रमाणे या बालअकाचा स्वीकार करून विद्यादेवीची कृपा त्याच्यावर वाढत्या प्रमाणात सदैव व पूर्ण असावी असा आमचा त्याना आशीर्वाद आहे

रा. चिंतामण दत्तात्रय अबेकर याच्या 'हिमवती'चा आम्हीं ह्या हिमवत ऊर्फ हिंवाळ्याच्या दिवसात मोठ्या आनंदाने स्वागतपूर्वक स्वीकार करीत आहोंत ग्रथातील गोष्टींपैकीं काहींचा थोडा भाग आम्हीं वाचून पाहिला असल्यावरून लघुकथा लिहिण्याची ग्रथकर्त्याची हातोटी चागलीच निदर्शनास

येत आहे कसलेल्या व नामांकित लेखकानीं त्याची प्रशंसा केली असल्याने आम्हीं त्याविषयीं जास्त सांगितले पाहिजे असे नाहीं. रा अंबेकर यांच्या ठिकाणीं असलेला हा गुण वृद्धिंगत होऊन त्यांच्या हातून अशीच वाङ्मयसेवा होवो अशी आशा प्रदर्शित करून, त्यानीं आम्हास अर्पण केलेल्या ग्रंथाबद्दल गुणग्रहण म्हणून रु ३०० त्यास आम्ही बक्षीस देत आहोंत

तिसरें पुस्तक श्रीयुत कानडे यानीं 'प्राचीन व अर्वाचीन ग्रंथालयाचा इतिहास' नावाचे लिहिले असून ते त्यानीं आम्हास अर्पण केले आहे त्याचा स्वीकार करण्यास आम्हास संतोष वाटत आहे हे पुस्तकहि आम्ही मधून मधून वाचून पाहिले आहे त्यावरून ग्रंथविषयाची माहिती मिळविण्यात व तिची मांडणी करण्यात त्यानीं बरेच परिश्रम करून मार्मिकता व्यक्त केली आहे, हे कोणाच्याहि सहज लक्षात येणार आहे जुन्याचा संग्रह झाल्याखेरीज नव्याचे मार्गदर्शन व परिपोष होत नाहीं, या दृष्टीने त्यांचा हा प्रयत्न स्तुत्य आहे. त्याना आम्ही या ग्रंथाबद्दल रु. ४०० या आनंदाच्या समयीं देत आहोंत

चौथें 'वैवाहिक जीवन' या नावाचे रा रा लक्ष्मण केशव भावे, वकील पाली, यानीं लिहिलेले असून तें त्यानीं आम्हास भेटीदाखल अर्पण केले आहे त्याचाहि आम्ही सानंद व साभार व प्रेमाने स्वीकार करतों सन्मार्ग-प्रवृत्त प्राचीन स्त्रीपुरुषांच्या स्मृतीस अर्पण केलेल्या या ग्रंथाबद्दल आम्हास विशेष आदर व समाधान वाटत आहे प्रचलित युरोपीय धर्तीची शिक्षणपद्धति व पाश्चात्य संस्कृतीचे बाह्यत दिसणारें मोहक स्वरूप ह्या दोहोंच्या जोरदार आघातामुळे आपल्या सनातन संस्कृतीवर जो परिणाम होत आहे व ज्याचे स्वरूप अलीकडील सुमारें वीसपंचवीस वर्षांतच जास्त परिणामकारक रीत्या व बऱ्याच अशीं अनिष्ट मार्गीं दृग्गोचर होऊं लागले आहे, त्या कालाच्या सुरुवाती-सच हा ग्रंथ लेखकाने लिहून प्रसिद्ध केला आहे हे समुचितच आहे ग्रंथाचा विषय कौटुंबिक म्हणजेच वैवाहिक जीवन सुखी कसे करता येईल हा असल्याने, त्याच्या महत्त्वाविषयीं आम्हीं वेगळे काही सांगितले पाहिजे असे मुळींच नाही ग्रंथास पार्श्वभूमि, मांडणी साधार असल्यामुळे सर्वच लेखन वाचनीय व विचार-प्रवर्तक असेच झाले आहे आम्हीं त्यातील काहीं भाग वाचून पाहिला आहे त्यावरून लेखकाची विचारसरणी पुष्कळच मार्मिक व सूचक असल्याने, त्याच्या

दुसऱ्या भागाच्या प्रसिद्धीची कोणीहि आतुरतेनेच अपेक्षा करील अशी आमची खात्री आहे ग्रथलेखकाचे अभिनदन करून त्याच्या हातून अशीच जास्त ग्रथ-निष्पत्ति होवो, अशी आम्ही इच्छा व उमेद प्रदर्शित करतों

ग्रथाप्रमाणेच आज आम्हास अर्पण केलेल्या फोटो इत्यादि वस्तूचा व आहेराचा आम्ही अत्यत प्रेमपूर्वक व सतोषाने स्वीकार करीत आहोंत कु डबीर यानीं केलेले चित्रकाम कल्पकतेचे निदर्शक असून आम्ही ते आभार-पूर्वक कौतुकाने स्वीकृत करितो रा उब्राणीकर यानीं नखाकृतिकर्मकौशल्याने ( Nail-work ) आमच्या फोटोचा जो अर्धभाग ( Bust ) चित्रित केला आहे ते कामहि उठावदार झाले असल्याने त्याचा आम्ही समाधानपूर्वक स्वीकार करतो आता जे पुष्पहार आम्हास अर्पण करण्यात आले त्याचा व तसेंच तालुकवार नोकरवर्गाकडून व म्युनिसिपालिटी, आमचे आप्तेष्ट, नातेवाईक व इतर सद्‌गृहस्थ याच्याकडून करण्यात आलेल्या आहेराचा आम्ही प्रेमाने, आदराने व आनदाने स्वीकार करून त्याबद्दल त्याचे व्यक्तिश व सघश मन पूर्वक आभार मानतों.

शेवटीं, श्रीरामचद्रप्रभूचे चरणीं आमचा नम्र भक्तिभाव निवेदन करून व आपणा सर्वांचे शुभ चिंतून आम्ही आपली रजा घेतों. ''

---

## परिशिष्ट २२

### घोषणेसबधीं वर्तमानपत्रात आलेले लेख व जमाबदीच्या वेळीं घोषणेचे महत्त्व दर्शविणारे लोकपुढाऱ्याच्या भाषणातील उतारे

---

सस्थानी स्वराज्य

ता २३-१२-१९३८

भोरचे श्रीमत राजेसाहेब याची घोषणा

" श्रीमत बाबासाहेब पतसचिव, राजेसाहेब सस्थान भोर, याचा षष्टयब्दपूर्तिसमारभ मागे तहकूब झालेला, मोठ्या थाटाने व यशस्वी रीतीने दरबार व प्रजाजन याच्या सहकार्याने ता १६-१२-१९३८ रोजी पार पडला

ही मोठी समाधानाची गोष्ट आहे श्रीमत बाबासाहेब यानी या समारभप्रसगी ता २०–९–१९३८च्या वेळींच तयार झालेली राजकीय सुधारणाबाबत घोषणा या प्रसगीं जी जाहीर केली आहे ती अनेक दृष्टींनीं महत्त्वाची आहे सस्थानातील स्थानिक स्वराज्य-सस्थामध्ये बहुसख्याक निवडलेले सभासद असावयाचे असून कायदे मडळाची घटना, नवीन केलेले घटनेचे नियम वगैरे सुचविण्याकरिता व जगलच्या बाबीबद्दल जे प्रश्न वादग्रस्त आहेत, त्या बाबतींत निराकरण कसे करावे याबद्दलचे मार्ग सुचविण्याकरिता कमिट्या नेमण्यात येणार असल्याचे जाहीर झाले आहे या सस्थानात जमीनसाऱ्याच्या बाबतीत विशेष वाद नसताहि ज्या कोठे या बाबतीत लढा असेल तो नजरेस आणल्यावर त्याचे निवारण करण्याचे श्रीमतानीं आश्वासन प्रस्तुतच्या घोषणेत दिले आहे भोर सस्थानातील प्रजाजनाच्या आकाक्षा अखिल भोर सस्थान प्रजापरिषदेच्या कार्यकारी मडळाचे अध्यक्ष दामूआण्णा पोतनीस यानीं श्रीमत राजेसाहेब याच्या सेवेसी पत्र पाठवून कळविल्या त्या गेल्या ऑगस्टमध्येच प्रसिद्ध झाल्या असल्या मुळे या समारभप्रसगी अर्पण केलेल्या अनेक मानपत्रात या मागण्याचा विस्तृत उल्लेख केलेला नाहीं हे योग्यच झाले.

श्रीमताच्या घोषणेचा कलमवार विचार केला असता आता सस्थानच्या सुशिक्षित प्रजेवर किती अवघड कामगिरी येऊन पडली आहे याची कल्पना येणार आहे. श्रीमत बाबासाहेब यानीं सस्थानातील प्रजेशीं सहकार्याचे धोरण स्वीकारून सस्थान-उन्नतीच्या कार्यामध्ये पडलेला खड फिरून सुरू करून भरून काढला याबद्दल आम्ही त्याचे अभिनदन करतों तसेच दरबारशीं सलोख्याने व आपुलकीच्या भावनेने वागून पुढील घोषित केलेल्या सुधारणा पाच वर्षांनीं अमलात आणण्यास हुरूप व उत्तेजन यावे अशी आमची प्रजेला सूचना आहे"

**Extract from *The Times of India***

24th December 1938

SMALLER STATES

"As an earnest of the growing desire of the smaller Indian States to bring their administration more into the line with modern ideals of progress, the reforms recently an-

nounced by the Rulers of Sangli and Bhor may be cited as encouraging examples Both these States form part of the Kolhapur and Deccan States Agency and on the occasion of his sixtieth birthday His Highness the Raja of Bhor took the opportunity of announcing a further instalment of reforms and concessions Since his accession to the Gadi sixteen years ago, he has liberalised the administration by safeguarding the fundamental rights of his subjects and establishing a Legislative Council and Taluka Local Boards Under the new reforms, the elective principle is introduced in sub stantial measure in the Legislative Council and in all the local self-government institutions Should these reforms and concessions be worked in a spirit of co-operation and good-will the Raja Saheb has expressed his desire further to liberalise the administration, notably by the appointment of an elected member of the Legislative Council as Minister-in-charge of various nation-building departments "

**Extract from *United India and Indian States***

24th December 1938.

## BHOR REFORMS

"It is now some years since Raja Shrimant Raghunathrao Shankarrao alias Baba Saheb Pandit Pant Sachiv, the Ruler of Bhor, announced that Responsible Government was the ultimate goal of his administration The Raja Saheb has, during his sixteen years' regime, been gradually granting constitutional Reforms to his people, of his own free will and without any pressure from anywhere But ill-advised enthusiasm led certain emotional persons to forget that the grant of reforms and concessions and all advancement depended upon the maintenance of an atmosphere of peace and order in the State The adoption of extremist methods only led to the retardation of reforms in Bhor However, now when the atmosphere is suitable for further reforms, the Raja Saheb has, on the occasion of his 60th birthday, not only granted a further

measure of political reforms but has promised still further advance within the short space of five years, provided a spirit of co-operation and good-will is maintained According to the reforms now announced the Legislative Council will have a clear majority–12 in a house of 21–of non-officials

भारत, ता २४ डिसेंबर १९३८

( श्रीमत राजेसाहेब यानी ता १६ डिसेंबर १९३८ रोजीं केलेल्या घोषणेबाबत मुबई येथील 'भारत' पत्रात खालील स्फुट प्रसिद्ध करण्यात आले )

" अभिनदनपर विद्युत्सदेश सुमारे १०० आले होते उपस्थित अफाट जनसमूह व अभिनदनपर पत्राचा व ताराचा वर्षाव हीं पाहता, श्रीमत सरकार राजे रघुनाथराव पतसचिव याची 'हितकर्ता नृपति' ह्या नात्याने महाराष्ट्रात योग्यता किती मोठी आहे याची साक्ष पटते

भोरचे समयज्ञ राजेसाहेब

राजघराण्यातील विवाह, पुत्रजन्म, दीर्घकालीन वर्षांचे वाढदिवस अथवा सम्राटाकडून महनीय सन्मानप्राप्ति अशा प्रसगाचे निमित्ताने प्रजेचे समाधान होण्याजोग्या हक्काचे दान केल्याच्या घोषणा करण्याची एक प्रथाच आता पडत चालली आहे नुसते काहीं कैदी बधमुक्त करून किंवा नोकरलोकाना बक्षिसे देऊन समारभाची फलश्रुति झाली, इतका अल्पसतुष्ट काळ सध्याचा नाहीं जगाची राजकीय धाव उदयोन्मुख अशी झपाट्याने सुरू आहे व्यक्तिस्वातत्र्य, कारभार-नियत्रण व स्वोन्नति ही ध्येये प्रजेला आवडतीं झाली आहेत

श्रीमत राजेसाहेब पतसचिव भोर, हे मोठे समयज्ञ आहेत अशी ख्याति आहे गुणग्राहकता, मुत्सद्दीपणा, मर्मज्ञता हे गुण त्याच्या समयज्ञतेस चित्राच्या पार्श्वरगाप्रमाणे खुलवीत आहेत. म्हणून वर्तमानकाल लक्षात घेऊन प्रजेचे प्रेम कधींच गढूळ होऊ नये अशी दक्षता ते घेत असतात त्यानीं प्रजेला राजकीय हक्क दिल्याची घोषणा आजच्या दरबारात केली व १६ डिसेबरच्या गॅझेटमधून ती प्रसिद्ध करून वज्रलेप केली

श्रीमताचा प्रजेला पथ्यकर इशारा

श्रीमत राजेसाहेबाचे राजकीय सुधारणा दिल्याबद्दल ग्वाही देणारें भाषण फारच सुदर, मुत्सद्दीपणास साजेसे, प्रजेच्या हितासबधीं तळमळ दाखविणारे असें झाले लोहभस्म, अक्रोड, पिस्ते, बदाम हे पौष्टिक खरे, परतु ते ज्यास खुराकादाखल द्यावयाचे त्याची शारीरिक पात्रता पचनक्षम असली पाहिजे नाहीं तर ते पुष्टि न देता अपाय मात्र करतील तद्वत् राजकीय सुधारणा झेपतील अशा देणे हितकारक होय, असा इशारा श्रीमतानीं भाषणात ठायी ठायीं दिला आहे ''

ता. १०-२-१९३९ रोजीं शिरवळ येथील सत्कार-समारभाचे वेळीं झालेल्या भाषणातील उतारे

रा. ह. स. देशपाडे याचे भाषण

''तो दिवस ता १६ डिसेबरचा होता भोर नगरीचे या दिवशींचे दृश्य अपूर्व होते हजारों माणसाच्या समुदायाने भोर नगरी गजबजून गेली होती तो जनसमर्द हर्षभराने प्रेरित होऊन इतस्तत सचार करीत असलेला दिसत होता राजप्रासादापासून दरबारमडपापर्यंतचा राजरस्ता अनेक भव्य व शोभायमान अशा कमानींनी व लतापल्लव आणि ध्वजापताकानीं शृगारलेला होता त्या दिवशीं भोर नगरींत सर्वत्र आनदाचे व प्रसन्नतेचे वातावरण निर्माण झालेले होते आज श्रीमत सरकार राजेसाहेब याची स्वारी सर्व लवाजम्यासह थाटाच्या मिरवणुकीने दरबारमडपात प्रवेश करणार असल्यामुळे, तीन महिन्या-पूर्वीं प्रकृति अकस्मात् बिघडली होती, ती पूर्ववत् झालेल्या सुस्थितींत श्रीमत राजेसाहेब याचे त्याच्या अखिल प्रजाजनाना दर्शन होणार होते व त्याच दरबारमडपात श्रीमत राजेसाहेब याचेकडून प्रजाहिताची जाहीर घोषणा होणार होती

असा तो दिवस होता त्या दिवशीं सत्कारमडळाकडून श्रीमत राजेसाहेब याच्या षष्ट्यब्दपूर्तिसमारभानिमित्त जो भव्य व थाटाचा दरबार भरविण्यात आला होता त्या दरबारात एकत्रित झालेला असख्य जनसमूह राजदर्शनाकरिता उत्सुक व आशायुक्त मनाने घोषणा ऐकण्यासाठीं आतुर झालेला असताना,

श्रीमत सरकार राजेसाहेब यानीं भोर सस्थानच्या राज्यकारभाराबाबत जी सुधारणाविषयक घोषणा केली तिचे महत्त्व सागण्याचा व केल्या गेलेल्या घोषणे-बद्दल श्रीमत राजेसाहेब याच्या गौरवार्थ थोडे बोलण्याचा माझा मुख्यत्वेकरून उद्देश आहे

या घोषणेचे महत्त्व अनेक दृष्टींनीं आहे केल्या गेलेल्या घोषणेत बऱ्याच गोष्टीचा समावेश आहे आणि त्या महत्त्वाच्याहि आहेत पण त्या सर्वांत अत्यत महत्त्वाची कोणती गोष्ट असेल तर ती, भोर सस्थानातील स्थानिक-स्वराज्यसस्थास व विधिमडळास निवडणुकीचे हक्क देऊन, या सर्व सस्थातून बहुमत दिले गेले ही होय

भोर सस्थानच्या राज्यकारभाराचे अतिम ध्येय ' जबाबदार राज्यपद्धति ' हे असल्याचे सन १९३२ सालींच श्रीमत राजेसाहेब यानीं जाहीर केले आहे तेव्हापासून ता १६ डिसेबर सन १९३८ पर्यंत या ध्येयास अनुसरून आधींच सस्थापित केलेल्या कायदे-कौन्सिलादि सस्थास प्रातिनिधिक सस्थाचे स्वरूप दिले गेले नव्हते ते या निवडणुकीच्या व बहुमताच्या हक्काने दिले गेले आहे जी राज्यपद्धति लोकाना जबाबदार ती ' जबाबदार राज्यपद्धति ' होय आणि ही राज्यपद्धति पूर्णावस्थेस नेण्याची प्रथम पायरी, लोकाना निवडणुकीचे हक्क देऊन राज्यकारभार लोकतत्री स्वरूपाचा करणे ही होय

प्रजेच्या अधिकृत प्रतिनिधीनी चालविलेल्या राज्यकारभारास लोकशाही असे म्हटले जाते आणि हेच तत्त्व आज सर्वमान्य झालेले आहे यापेक्षा निरपवाद व सर्वश्रेष्ठ अशी राज्यपद्धति दुसरी कोणतीहि नाही जगातल्या अनेक राष्ट्राच्या घडामोडीच्या इतिहासाकडे पाहिले असता, श्रीमत राजेसाहेब यानी भोर सस्थानातील स्थानिक स्वराज्य-सस्था व कौन्सिल यामधून निवड-णुकीच्या तत्त्वाचा केलेला उपक्रम अभिनदनीय असा आहे

ह्या सोळा वर्षांच्या अल्प कालावधींत वर दिग्दर्शित केलेल्या व इतरहि अनेक ज्या सुधारणेच्या गोष्टी घडल्या आहेत, त्या ज्या पार्श्वभूमीवर घडल्या आहेत ती पार्श्वभूमि, श्रीमत राजेसाहेब गादीवर आल्यानतर सस्थान-सुधारणाच्या बाबतींत त्यानीं आपल्या सदिच्छा व महत्त्वाकाक्षा याचे

आपल्या भाषणात जें दिग्दर्शन केले आहे त्याशीं विसवादी होती थोडक्यात सागायचे म्हणजे पूर्वीचा राज्यकारभार जुन्या व एकतत्री स्वरूपाचा होता यामुळे व ब्रिटिश हिंदुस्थानातील लोकशाही तत्त्वाच्या विचाराचे वातावरणाचा परिणाम सस्थानच्या प्रजेवरहि होऊन लोकामध्ये एक प्रकारचा असतोष उत्पन्न होणे अपरिहार्य असल्यामुळे, अशा स्थितीत सस्थानचा राज्यकारभार नवीन मनूस अनुसरून लोकशाही तत्त्वाच्या स्वरूपाचा करून अतिम ध्येय गाठणे अत्यत अवघड व मोठ्या जबाबदारीचे होते या दृष्टीने विचार करिता श्रीमत राजेसाहेब यानीं केलेली घोषणा सोळा वर्षांच्या अल्पावधींतच केली असल्यामुळे तिचे अधिकच महत्त्व वाटते.

आज हिंदुस्थानातील लहानमोठ्या बहुतेक सस्थानातून ज्या चळवळी चालू आहेत व त्यामुळे जी परिस्थिति उत्पन्न झाली आहे व जी विलक्षण खळबळ उडाली आहे, त्याच्या हकीकती आपण प्रत्यहीं वर्तमानपत्रातून वाचीत आहों. कित्येक ठिकाणी चळवळीचे स्वरूप तीव्र होऊन सत्याग्रहापर्यंत पाळी आलेली आहे, तर कित्येक ठिकाणीं याहिपेक्षा विपर्यस्त परिस्थिति निर्माण झालेली आहे हे सर्व पाहून असे म्हणावेसें वाटते की, अशा स्थितींत राजा व प्रजा याच्या दरम्यानचे सलोख्याचे सबध कसे व कोठे राहिले ? आपले-पणाच्या भावनाचे काय झाले ? प्रजेची चळवळ जबाबदारीच्या स्वराज्याच्या मागणीची आणि तिचे परिणाम पाहावेत तर ते हे असे ! परिस्थिति निकरावर येऊन ती आवाक्याबाहेर गेली म्हणजे मग तडजोडीचा मार्ग सुचून जें नतर करावे लागले ते अगोदरच केले असते तर बरे झाले असते असें म्हणण्याची वेळ येते यात स्वारस्य काय ? अशाने होते काय, कीं निदान देशी सस्थाना-पुरते बोलायचे झाल्यास शेकडों वर्षांपासून राजा व प्रजा याचे दरम्यान नादत असलेले प्रेमाचे व सलोख्याचे सबध तुटतात, व आपलेपणाच्या भावना नष्ट होतात ! मला सागायचे इतकेच कीं, ह्या घडत असलेल्या व घडू घातलेल्या सर्व लहान मोठ्या सस्थानातील परिस्थितीचा विचार करून आपल्या श्रीमत राजेसाहेब याचेकडून भोंवतालच्या परिस्थितीचे स्पृहणीय असे अचूक निदान केले गेले ही त्याहूनहि अधिक महत्त्वाची गोष्ट होय

श्रीमत राजेसाहेब यानीं ता. १६ डिसेंबर रोजीं निवडणुकीचे तत्त्व प्रातिनिधिक सस्थास लागू करणार असल्याबद्दल केलेल्या घोषणेवरून आपणा सर्वांच्या लक्षात येईल कीं, यापुढें भोर सस्थानचा राज्यकारभार कायदेमडळात लोकानीं निवडून दिलेले जे १२ सभासद असणार आहेत त्याच्या बहुमताने चालणार असून, लोकलबोर्डें व म्युनिसिपालिट्या यातूनहि असेच लोकानीं निवडून दिलेले सभासद असून त्याचेच बहुमत दिले गेले आहे याचा अर्थ असा कीं, सस्थानच्या राज्यकारभारात थोडीफार तरी सत्ता लोकाना दिली गेली आहे 'जबाबदारीचे स्वराज्य' ज्याला म्हटले जाते त्याची पहिली पायरी या दृष्टीने हे हक्क दिले गेले आहेत शिवाय हल्लींप्रमाणे सस्थानात शातता व सुव्यवस्था राहिल्यास व नवीन कायदे-मडळातील सभासदाचे धोरण दरबारशीं सहकार्याचे व सलोख्याचे राहिल्यास, आणि त्यानीं आपली पात्रता निदर्शनास आणल्यास, नव्या कायदेमडळाच्या पहिल्या पाच वर्षांनतर तीन गोष्टी अमलात यावयाच्या आहेत त्या घोषणेत विस्तृतपणे श्रीमत राजेसाहेब यानीं सागितल्या आहेत.

त्या विशेष महत्त्वाच्या गोष्टी जाहीर गेल्या केल्या असून शिवाय प्रजेच्या सुखसोयीच्या दृष्टीने बऱ्याचशा गोष्टी करण्याचे त्यानीं आश्वासिले आहे

साराश, श्रीमत राजेसाहेब यानीं केलेली ही घोषणा अत्यत महत्त्वाची असल्यामुळे तिचे आपण स्वागत करणे अवश्य आहे श्रीमत राजेसाहेब याचा षष्टयब्दपूर्ति-समारभ गेल्या १६ डिसेबर रोजीं झाला त्या दिवशीं ही घोषणा केली गेल्यामुळे हा शुभ दिवस सस्थानच्या इतिहासात सुवर्णाक्षरानीं लिहून ठेवण्यासारखा आहे, असे नुकतेच वेले येथें झालेल्या समारभसमयीं श्री पानसे वकील म्हणाले होते, ते बरोबर आहे त्याबरोबर असेहि म्हणता येईल कीं, श्रीमत राजेसाहेब याचे वयास साठ वर्षे पूर्ण होऊन त्याचे एकसष्टाव्या वर्षात पदार्पण झाल्यामुळे षष्टयब्दपूर्तिसमारभ होऊन, तो समारभ वरील महत्त्वाची घोषणा श्रीमत राजेसाहेब याच्या ज्या जन्मतिथीमुळे चालू शकला ती जन्मतिथीच अधिक महत्त्वाची व सस्थानच्या भाग्याची होय.

श्रीमत राजेसाहेब यानीं केलेल्या या घोषणेत सर्वांपेक्षाहि एक अत्यत महत्त्वाची अशी गोष्ट आहे ती, 'आमचे सस्थान हे जसें आमचे आहे, तसेच

ते आपलेहि आहे त्याचप्रमाणे आम्हीहि आपलेच आहोंत, आणि आपणासहि हितसबधाच्या बाबतींत आमच्यापासून वेगळे समजत नाहीं सस्थानच्या उत्कर्षांत व आपल्या कल्याणात आम्ही व आपण असे उभयता सारखेच हितसबधाने निगडित आहोंत' ही होय श्रीमत राजेसाहेब याच्या मुखातून आपणा प्रजाजनाना उद्देशून बाहेर पडलेले हे उदात्त व आत्मीयतेचे निदर्शक असे उद्गार ऐकून कोणा सस्थानवासीयाचे हृदय उचबळून येणार नाहीं? श्रीमताविषयीं व श्रीमताच्या गादीविषयी प्रजेच्या अत करणात स्वाभाविकपणेच सुप्त स्थितींत असलेली निष्ठा जागृत होणार नाही? हे उद्गार नि सशय बहुमोलाचे आहेत ज्याच्या अतःकरणातून हे उद्गार प्रस्फूर्त होतात, मुखातून स्रवले जातात त्या आमच्या श्रीमत राजेसाहेबाबद्दल प्रजेच्या मनात एक प्रकारची सद्भावना व सदभिमान उत्पन्न झाल्यास त्यात काय आश्चर्य?"

दिवाणसाहेब याच्या नेमणुकीबाबत पसती दर्शवून त्यानीं आपले भाषण सपविले

रा स कृ शिंदकर याचे भाषण

"त्याचप्रमाणे दुसऱ्या एका अत्यत महत्त्वाच्या मुद्याचा श्रीमतानीं आपल्या घोषणेत समावेश केला आहे ती म्हणजे जमीनसाऱ्याविषयीची बाब होय या बाबतीत आपणास चार शब्द अधिक सागणार आहे गेल्या ५-७ महिन्यात आपल्यापैकीं पुष्कळानीं वर्तमानपत्रातून वाचले असेल आणि कैकानीं ऐकिले असेल कीं, आज कित्येक सस्थानातून लाखों रुपयाची सारासूट अगर तहकुबी दिली आहे आणि ते आकडे घटकाभर पाहिले आणि आपल्या घोषणेत त्या स्वरूपाचा एकहि आकडा दिसला नाहीं, म्हणजें साहजिकच पुष्कळास असे वाटण्याचा सभव आहे कीं, इतर ठिकाणी साऱ्याच्या बाबतींत तेथील सस्थानच्या प्रजाजनास इतकी मोठी सवलत मिळाली असता आपल्या गरीब शेतकऱ्यास मात्र एक रुपयाचीहि सूट मिळाली नाहीं आणि हे दिसले म्हणजे साहजिकच निराशा वाटण्याचा सभव आहे परतु, सद्गृहस्थहो, आपण या वरवर दिसणाऱ्या व डोळे दिपवून टाकणाऱ्या गोष्टीवरून आपल्या दु खाची कल्पना करून घेऊ नका यासबधीं थोडा विचार करून माहिती मिळवून ती इतर ठिकाणच्या परिस्थितीशीं पडताळून पाहिली तर आपणास असे दिसून

येईल कीं, इतर ठिकाणापेक्षा आपल्या सस्थानात शेतसारा अगदीं माफक असाच आहे इतकेच नव्हे, तर शेजारच्या ब्रिटिश साऱ्यापेक्षाहि आपला सारा फार कमी आहे तथापि, याहि बाबतींत कोणाची तक्रार राहू नये म्हणून श्रीमतानीं अशी घोषणा केली आहे कीं, यदाकदाचित् खालसा हद्दींतील साऱ्यापेक्षा एखाद्या ठिकाणीं आपल्या सस्थानात शेतसारा जास्त आहे असे कोणीं श्रीमताच्या निदर्शनास आणले तर त्याचाहि सहानुभूतिपूर्वक राजेसाहेब विचार करणार आहेत

श्रीमतानीं बदरी मालाचा लिलाव उठवून गोरगरिबाच्या अन्नाची सोय पाहिली आहे यायोगाने दरसाल अदमासे १८०० ते २००० रुपयाची सूट लोकास मिळालीच आहे

मला आपल्यापुढें शेवटचा व महत्त्वाचा मुद्दा असा माडावयाचा आहे कीं, आपल्या सस्थानात या सर्व प्रगतिपर, जनतेची उन्नति करणाऱ्या, ज्या सुधारणा मिळाल्या आहेत, त्याकरिता इतर ठिकाणासारखा कोणताहि जुलूम अगर दडपशाही आपल्या सस्थानातील लोकास सहन करावी लागली नाहीं प्रजेच्या आकाक्षा व बदललेला काळ श्रीमतानीं लक्षात घेऊन या साऱ्या सुधारणा स्वयस्फूर्तीने केल्या आहेत, या गोष्टीचे फार महत्त्व आहे ”

## पिरगुट येथें ता १६।२।१९३९ रोजी मानपत्रअर्पण समारभाचे वेळचे रा दा वि गोखले याचे भाषण

“ आताच येथील नागरिकातर्फे श्रीमत राजेसाहेब याना मानपत्र अर्पण करण्यात आले त्यात प्रजेबद्दल श्रीमत राजेसाहेब याच्या भावना व श्रीमत राजेसाहेबाच्याबद्दल प्रजेच्या भावना उत्तम रीतीने व्यक्त झाल्या आहेत श्रीमत राजेसाहेब याचा षष्ट्यब्दपूर्तिसमारभ भोर येथें नुकताच साजरा झाला त्या वेळी त्यानीं जे रयतेला हक्कदान केले आहे त्याबद्दल रयतेकडून त्याचे ठिकठिकाणीं सत्कार करण्यात येत आहेत, त्यातील हा एक समारभ आहे हे आपुलकीचे समारभ आहेत श्रीमत राजेसाहेब व प्रजा याचे जिव्हाळ्याचे सबध आहेत, त्याचे हे समारभ प्रतीक आहेत यामुळे राजा व प्रजा याचे सबध आपुलकीचे व जिव्हाळ्याचे आहेत असे बाहेरील लोकाना दिसून येते ”

कोळवण मुक्कामीं श्रीमताना ता १८।२।१९३९ रोजीं मानपत्र देण्यात आले त्या वेळचे रा दा बा. पोतनीस याचें भाषण

" श्रीमत सरकार राजेसाहेब, अधिकारी मडळी व शेतकरी बधूनो,

श्रीमत सरकार राजेसाहेब यानीं केलेल्या घोषणेसबधीं, मीं आपले विचार माडावे अशी सत्कारमडळाची आज्ञा झाली म्हणून मी आता बोलण्यास उभा राहिलों आहे परतु मला पहिली गोष्ट ही सागावीशी वाटते कीं, मी यावर बोलू लागलों, तर माझें अत करण कसे उन्मळून येत आहे येथील समारभाची तारीख ठरली आणि त्यानतर लवकरच रा. वामनरावजी पटवर्धन याचे निधन झाले परतु त्याच्याविषयीं वाटणाऱ्या दु खास आळा घालून हा समारभ पार पाडणे हे प्राप्त कर्तव्य आहे वामनरावजींनीं ही शिकवण आम्हास दिली, म्हणूनच मी केवळ कर्तव्यबुद्धीनेच दोन शब्द सागण्यास उभा राहिलों आहे आता घोषणेसबधीं दोन शब्द ज्या सस्थेतर्फे मी बोलणार आहे, ती सस्था म्हणजे अखिल भोर सस्थान प्रजासभा भोर सस्थान प्रजासभेचे ध्येय 'सस्थानच्या आधिपत्या-खालीं राहून जबाबदार राज्यपद्धतीची प्राप्ति करून घेणे व त्यायोगे सस्थानची सर्वांगीण उन्नति घडवून आणणे' हे आहे श्रीमत राजेसाहेब गादीवर येण्यापूर्वी १ वर्षापासून लोकात जागृति होऊन चळवळ सुरू झाली त्या वेळच्या करड्या अमलाची मला चागली आठवण आहे श्रीमतानीं गादीवर आल्यावर प्रजासभेच्या लोकावर पुत्रवत् प्रेम केले त्यानीं ज्या मागण्या मागितल्या त्या त्याना दिल्या. आतापावेतों प्रजासभेने केलेल्या मागण्याचा वेळोवेळीं सहानुभूतिपूर्वक विचार करण्यात आला आहे, असें पूर्वीचा इतिहास सागतो त्यामुळे प्रजासभेच्या कार्यकर्त्यांच्या कार्यक्षमतेची छाननी झाली आहे प्रजासभेच्या कार्यकर्त्यांना दोन गोष्टी करावयाच्या होत्या सस्थानात जबाबदार राज्यपद्धति झाल्याशिवाय सुधारणा होणार नाहीं, तेव्हा जबाबदार राज्यपद्धति स्थापिली जाईल असा यत्न करणे, ही पहिली गोष्ट, व त्यानतर जगल, हिरडे वगैरे बाबींसबधीं निकाल लावून घेणे, ही दुसरी गोष्ट जबाबदार राज्यपद्धति प्राप्त करून घेणें ही अत्यत जिव्हाळ्याची गोष्ट आहे दुसरें कर्तव्य कोणते तर हिरडा व जगलसबधीं गाऱ्हाण्याचा निकाल करून घेणे प्रजासभेच्या मागणीप्रमाणें सरकारने जगल कमिटी नेमली रयतेचे ३ व सरकारी ३ असे लोक नेमले होते त्यानीं निर्णय

लावावा असे ठरले रयतेचे लोक प्रजासभेचे लोक होते संस्थानी प्रजेत जागृति करून चळवळ करणें हा राजद्रोह नसून ते प्रशस्तिपत्र आहे त्यानंतर नेमणुकीचे कौन्सिल दिले त्या वेळीं कौन्सिलात प्रजासभेचे लोक नेमून श्रीमंतानीं प्रजासभेबद्दल विश्वास दाखविला पुढें प्रजासभेच्या कार्यकर्त्यांत दुमत झाले, झगडा सुरू झाला, ही गोष्ट मला कबूल आहे. यामुळे प्रजासभा आपले काम प्रामाणिकपणाने करीत आहे कीं नाहीं, ही गोष्ट श्रीमंताना समजू शकली नाहीं तथापि, प्रजासभेच्या पूर्वीच्या कामगिरीवर श्रीमंताचा विश्वास असल्यामुळे, पुन्हा प्रजासभेचा सल्ला घेऊन व संस्थानाबाहेरची परिस्थिति लक्षात आणून ता १६ रोजीं श्रीमंतानीं जाहीर घोषणा करून हक्कदान केले, ही अत्यंत महत्त्वाची गोष्ट झाली श्रीमंतानी आपल्या राज्यकारभाराचे ध्येय 'जबाबदारीची राज्यपद्धति' हे ठेवून त्यास अनुसरून निवडणुकीचे तत्त्व दिले त्याचा उपयोग योग्य प्रकारे करून त्याचा फायदा करून घेणे हे आपले कर्तव्य आहे प्रजा-सभेतर्फे मला अशी खात्री द्यावयाची आहे कीं, ज्या थोर पुरुषानीं—वामनरावजी पटवर्धन यानीं—आम्हास हे अधिकार प्राप्त करून दिले, त्याची आम्हास अशी शिकवण आहे कीं, ' दरबारशीं सहकार्य करून आपली उन्नति करून घ्या.' या शिकवणीस अनुसरून त्याच्या ऋणातून मुक्त होण्याकरिता मी असे आश्वासन देतों कीं, योग्य प्रसंगीं दरबारशीं सहकार्य करण्यास प्रजासभा केव्हाहि नाकबूल नाहीं वामनरावजींच्या मृत्यूमुळे आम्ही सर्व पोरके झालों आहों त्याची आम्हास वारंवार गरज भासणार आहे व दरबारवरहि तोच प्रसंग आला आहे, अशी माझी खात्री आहे यापुढें आमचा हात धरून व आमचा कान धरून आम्हास मार्गावर आणणारा नेता राहिला नाहीं वामनरावाच्या शिकवणीपासून आम्ही दूर जाणार नाहीं, असे मी आश्वासन देतों श्रीमंतानी घोषणा करून हक्कदान दिले कायदे-मंडळात १२ बिनसरकारी जागा दिल्या त्याचे वर्णन रा पानसे यानीं केलेच आहे. श्रीमंताच्या घोषणेतील एक वाक्य सोन्याच्या शाईने लिहून ठेवण्यासारखें आहे ते वाक्य माझ्या अंत करणात रुजले आहे ते वाक्य म्हणजे ' पाची तालुक्यातील रयत माझी आहे व मीहि रयतेचा आहे. ' हे वाक्य लक्षात ठेविल्यास बेबनाव होण्याचा प्रसंग येणार नाहीं इतके बोलून मी आपले भाषण संपवितों "

---

# परिशिष्ट २३

## श्रीमंत राजेसाहेब युवराज असताना व गादीवर आल्यानतर घडलेल्या महत्वाच्या गोष्टी दर्शविणारी सनावली

---

### युवराज असताना घडलेल्या गोष्टी

| | |
|---|---|
| १८७८ सप्टेबर २० | ( भाद्रपद व।। ८, शके १८०० ) श्रीमत राजेसाहेब याचा जन्म झाला |
| १८८६ फेब्रुवारी ३ | श्री राजेसाहेब याचे बहिर्णीचा जन्म ( तान्हुबाई ) |
| १८८७ एप्रिल ४ | (चैत्र शु।। ११) श्री बाबासाहेब याचे मौजीबधन |
| १८८८ जानेवारी २ | डयूक ऑफ कॅनॉट याचे निमत्रणावरून श्रीमत बाबासाहेब आपले वडिलाबरोबर स्वागतसमारभास पुण्यास गेले होते |
| १८८८ डिसेबर ८ | श्री सरदार भाऊसाहेब विंचुरकर याचे दत्तविधान |
| १८८९ ऑगस्ट | वडिलाबरोबर कलबुर्गा, ताडपत्री, मद्रास, चिदबर, मदिरा मीनाक्षी, नवपाण, रामेश्वर, रामनाथपूर, मदुरा, त्रिचनापल्ली, तिनेवेल्ली, श्रीरग, तजावर, कुभकोण, चिंगलपट्ट, काची, त्रिपती, रायचूर वगैरे ठिकाणचा श्रीमत बाबासाहेबाचा प्रवास. |
| १८९० डिसेंबर १७ ते मार्च ७ पर्यंत | वडील-मातोश्रींबरोबर डाकूर, अहमदाबाद, पोरबदर, द्वारका, सोमनाथ, सिदपुर, अजमीर, पुष्कर, जयपूर, आग्रा, प्रयाग, काशी, अयोध्या, हरिद्वार, अबाला, कुरुक्षेत्र, दिल्ली, मथुरा या ठिकाणचा श्रीमत बाबासाहेबाचा प्रवास |
| १८९१ जुलै ३१ | लिमये मास्तर यानीं श्रीमत बाबासाहेबाच्या शिक्षणासबधीं १।। वर्षाचा रिपोर्ट रावसाहेबाकडे केला |
| ,, नोव्हेबर ५ ते डिसेबर ८ | वडील-मातोश्रींबरोबर श्रीमत बाबासाहेबाची गोकर्णाची यात्रा |
| ,, डिसेबर | लिमये मास्तर याचा मृत्यु |

| | |
|---|---|
| १८९२ डिसेबर १४ | श्रीमत बाबासाहेब शिक्षणाकरिता, पुणे येथे, राहिले. |
| १८९३ जून १ | श्रीमत बाबासाहेब याचा प्रथम विवाह झाला. |
| १८९६ मे ३ | श्रीमत बाबासाहेब याच्या भगिनी 'तान्हुबाई याचा विवाह झाला |
| १८९९ जून १ | श्रीमत बाबासाहेबाना प्रथम कन्यारत्नाचा लाभ—( काशीताईसाहेब ). |
| १८९९ | श्रीमत बाबामाहेब मॅट्रिक परीक्षा पास झाले |
| १९०० जानेवारी २८ | श्रीमत बाबासाहेब मॅट्रिक परीक्षा उत्तीर्ण झाल्याबद्दल मानपत्रसमारभ |
| १९०१ | श्रीमत बाबासाहेब प्रीव्हिअस परीक्षा पास झाले |
| १९०२ जानेवारी ३१ | श्रीमत बाबासाहेब याचे बहिणीस प्रथम अपत्य कन्या-रत्न झाले ( जान्हवीबाईसाहेब ) |
| १९०३ जानेवारी १ | वडील-मातोश्रींबरोबर दिल्लीदरबारला श्रीमत बाबासाहेब गेले |
| ,, एप्रिल | रा. नारायणराव अबेकर ( श्री. बाबासाहेबाचे स्नेही व आप्त ) याचा मृत्यु. |
| ,, एप्रिल १२ | श्री. बाबासाहेबाना दुसरें कन्यारत्न झाले (भागिरथीबाई) |
| ,, मे १७ | श्री. बाबासाहेब याचे भगिनीचा मृत्यु. |
| १९०४–५ | श्रीमत बाबासाहेबानीं फर्स्ट एलएल. बी च्या टर्म्स भरल्या. |
| ,, ऑगस्ट २९ | रा नानासाहेब केळकर याचा मृत्यु. |
| ,, सप्टेबर २७ | ( भाद्रपद व॥ ४ शके १८२६ ) श्री. बाबासाहेबाना पुत्ररत्नाचा ( श्री यु सदाशिवराव भाऊसाहेब ) लाभ झाला |
| १९०५ सप्टेबर ७ | श्री बाबासाहेबाच्या दुसऱ्या कन्येचा मृत्यु |
| ,, नोव्हेबर ९ | श्री बाबासाहेब प्रिन्स ऑफ वेल्स याचे स्वागताकरिता मुबईस गेले होते |
| ,, | श्री बाबासाहेबाना वार्षिक २५ हजार रु ची नेमणूक |

| | |
|---|---|
| १९०६ | रा. बापूसाहेब पाटणकर ( श्री बाबासाहेबाचे लहान वयातील पालक ) याचा मृत्यु |
| ,, | श्रीमत बाबासाहेब पुणे येथें ऑनररी मॅजिस्ट्रेट झाले. |
| १९०७ फेब्रुवारी | श्री बाबासाहेबानीं मे शेपर्डसाहेब याना मुबई येथें मावजी शेट याच्या बगल्यात पार्टी दिली |
| ,, सप्टेबर ८ | श्री सयाजीराव गायकवाड महाराज, बडोदे, याची भोरास भेट |
| ,, नोव्हेबर २८ | श्री बाबासाहेबाच्या प्रथम पत्नी श्री सौ गगुताई-साहेब याचे निधन |
| १९०८ मे २० | श्री बाबासाहेब याचा द्वितीय विवाह |
| ,, नोव्हेबर ३ | मुबईचे गव्हर्नर सर जॉर्ज क्लार्क याची भोरास भेट व त्याचे भाषणात श्रीमत बाबासाहेबाच्या अभ्यासा-बद्दल प्रशसोद्गार |
| १९०९ फेब्रुवारी २१ ते १८ एप्रिल | श्री. बाबासाहेब याचा पत्नीसह बडोदे, अहमदाबाद, अबूचा पहाड, अजमीर, जयपूर, आग्रा, मथुरा, बनारस, अयोध्या, काशी वगैरेकडे प्रवास |
| ,, | श्रीमत बाबासाहेब याचे नेमणुकीत रु. ५००० ची वाढ. या सालापासून रु. ३०,००० मिळू लागले |
| १९११ | श्री. बाबासाहेबाचे चिरजीव श्री भाऊसाहेब याचा विशेष काळजीचा आजार. |
| ,, जुलै १८ | श्री बाबासाहेब पुणे शेतकी कॉलेजच्या उद्घाटन समारभास हजर होते. |
| ,, | श्री बाबासाहेबानीं पुणे येथील ऑनररी मॅजिस्ट्रेटचे काम सोडले |
| ,, डिसेबर १२ | दिल्ली येथे बादशहाचे राज्यारोहणाचा दरबार झाला त्यास श्रीमत राजेसाहेब आपले वडिलाबरोबर गेले होते. |

१९११ नोव्हेंबर २६ दिल्ली, हरिद्वार, डेहराडून, मसुरी, लखनौ, कानपूर,
ते १९१२ जानेवारी ११ प्रयाग, काशी, भोपाळ, साची इत्यादि ठिकाणीं प्रवास

१९१२ मार्च २५ पो ए मि स्विफ्ट याची भोरास भेट.

,, एप्रिल २८ श्री. बाबासाहेबाची कन्या काशीताईसाहेब याचा विवाह.

,, ऑक्टोबर ४ किंग एडवर्ड मेमोरिअल हॉस्पिटलचे पायाचा दगड बसविणेचा समारभ श्री बाबासाहेब हजर राहून यानीं त्याकरिता ५०० रु दिले

,, डिसेंबर २० श्री बाबासाहेब याचा निजाम राज्यात प्रवास औरगा-
ते १९१३ जानेवारी १० बाद, दौलताबाद, वेरूळ, गोवळकोंडा, हैद्राबाद, शिकदराबाद, पढरपूर वगैरे ठिकाणीं प्रवास

,, मार्च १ श्री बाबासाहेब याना शिरवळ तालुक्याचे असिस्टट कलेक्टरचे आणि सब-डिव्हिजनल मॅजिस्ट्रेट व असिस्टट जज्जाचे अधिकार मिळाले

,, मार्च ३१ मुबईचे गव्हर्नर लॉर्ड सिडेनहॅम याचे हस्ते ( Gateway of India ) हिंदुस्तानचे प्रवेशद्वार या इमारतीचे पायाचा दगड बसविण्याचा समारभ झाला ह्या समारभास श्री बाबासाहेब हजर होते

,, जून २० व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिंज याच्या वाढदिवशी शिरवळ येथील शाळेतील विद्यार्थ्यांना श्रीमत बाबासाहेब यानीं मिठाई वाटली. ( व्हाइसरॉयाचे अगावर बॉब टाकून त्याचा जीव घेण्याचा प्रयत्न करण्यात आला त्यातून ते बचावले म्हणून हा वाढदिवस हिंदुस्थानभर साजरा करण्यात आला )

,, जुलै २५ मुबईचे गव्हर्नर लॉर्ड सिडेनहॅम यानीं डॉ एफ् जी सेल्बी, एम ए , एलएल. डी , सी आय. ई , याच्या तैलचित्राचा अनावरणसमारभ केला त्यास श्री बाबासाहेब हजर होते

१९१३ ऑक्टोबर १० भोरचे पोलिटिकल एजट मि एल. जे. माउटफर्ड याची शिरवळास भेट

,, डिसेबर १८ ते श्रीमत बाबासाहेबाचा कलकत्ता, दार्जिलिंग, काशी,
१९१४ जानेवारी १९ प्रयाग, जबलपूर, नाशिक या ठिकाणी प्रवास

,, मार्च २० मुबई येथें गव्हर्नमेंट हाउसवर व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिंज व लेडी हार्डिंज याचेबरोबर श्रीमत बाबासाहेब याची पार्टीच्या वेळीं भेट झाली

,, ऑगस्ट ४ युरोपात महायुद्ध सुरू झाले.

,, ऑगस्ट १७ शिरवळ येथें श्रीमत बाबासाहेब याच्या अध्यक्षतेखाली युद्धात गुतलेल्या ब्रिटिशाबद्दल राजनिष्ठा व्यक्त करण्याकरिता सभा भरविण्यात आली

१९१५ जानेवारी १८ ते २७ द्वारकेचा प्रवास.

,, एप्रिल १ शिरवळ येथें, रा ब. सातभाई, कारभारी, भोर सस्थानचे नोकरींतून सेवानिवृत्त झाले, त्याच्या सन्मानार्थ श्रीमत बाबासाहेब याचे अध्यक्षतेखालीं सभा झाली.

,, मे ३१ श्री सौ. काशीताईसाहेब याचा मृत्यु.
शिरवळ येथें श्रीमत बाबासाहेब याच्या शिफारशीप्रमाणे दवाखाना स्थापन केला

,, ऑगस्ट ४ प्रथम महायुद्धदिन सभा शिरवळ नागरिकानी भरविली

,, ऑक्टोबर १६ मि एल रॉबर्टसन, पोलिटिकल सेक्रेटरी, याची शिरवळास भेट

,, नोव्हेबर ८ टेनिसकोर्ट श्रीरामक्रीडाभुवनाचा श्रीमत बाबासाहेबाचे अध्यक्षतेखालीं उद्घाटनसमारभ झाला

,, नोव्हेबर १४ पुणे कॅप एज्युकेशन सोसायटीचा समारभ श्रीमत बाबासाहेब याचे अध्यक्षतेखालीं झाला

,, डिसेंबर ४ पोलिटिकल एजट मि जी डब्ल्यू हॅच याची शिरवळास भेट.

| | |
|---|---|
| १९१६ मार्च १६ | मि. डब्ल्यू डी शेपर्ड, मुबई एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलचे मेबर, याची सेक्रेटरी ऑफ स्टेटच्या कौन्सिलचे सभासद म्हणून नेमणूक झाली, म्हणून विलायतेस जाण्यापूर्वी त्याना व मिसेस शेपर्ड याना मुबई येथे श्रीमत बाबासाहेब यानीं चहापार्टी दिली |
| ,, जून १९ | लॉर्ड किचनेर याच्या मृत्यूनिमित्त शिरवळ येथे दुखवट्याची सभा श्रीमत बाबासाहेब याच्या अध्यक्षतेखालीं झाली |
| ,, जून २६ | पुणे येथे कौन्सिल-हॉलमध्ये सरदाराचा दरबार भरविण्यात आला, त्यास श्रीमत बाबासाहेब हजर राहिले होते |
| ,, जुलै १० | भोर हायस्कूलमध्ये श्रीमत बाबासाहेब याचे अध्यक्षतेखालीं बेल्जियन चिल्ड्रेन्स डे साजरा करण्यात आला |
| ,, जुलै २६ | शिरवळ येथे बाबासाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं वॉर ॲंड रिलीफ फडाचे मदतीकरिता वर्गणी गोळा करण्यास सभा भरविण्यात आली |
| ,, ऑगस्ट १ | श्रीमत बाबासाहेब यानीं तळेगाव काच-कारखान्यास भेट दिली |
| ,, ऑगस्ट ४ | भोर येथे भोर नागरिकाची सभा श्रीमत बाबासाहेब याचे अध्यक्षतेखालीं भरविण्यात येऊन द्वितीय युद्ध-दिन साजरा करण्यात आला |
| ,, सप्टेबर ५ | शिरवळ येथील रामदासभजनसमाजाचा वार्षिक अहवाल-प्रसिद्धीचा समारभ श्रीमत बाबासाहेब याचे अध्यक्षतेखाली झाला |
| ,, सप्टेबर २९ | ( भाद्रपद व॥ ८ ) श्रीमत बाबासाहेब यानीं आपल्या वाढदिवसानिमित्त भोर येथील श्रीरामक्रीडाभुवनाचे मेंबर्सना ईव्हिनिंग पार्टी दिली |
| ,, ऑक्टोबर २७ | लॉर्ड विलिंग्डन याची भोरास भेट व श्रीमत बाबासाहेबाच्या कामाबद्दल त्याचे भाषणात गौरवाचे उद्गार |

| | | |
|---|---|---|
| १९१६ | नोव्हेंबर ३ | मुबई येथील बॅक्टेरियॉलॉजिकल लॅबोरेटरीला भेट दिली |
| ,, | नोव्हेंबर ६ | मुबई येथील गाधर्व महाविद्यालयाच्या दिवाणखान्यास ' श्रीराम-सगीतभुवन ' नाव देण्याचा समारभ श्रीमताचे अध्यक्षतेखालीं झाला |
| ,, | डिसेबर ९ | श्रीमत बाबासाहेब याना मुबई येथील व्यकटेश्वर प्रेसचे माल्क शेट खेमराज श्रीकृष्णदास यानीं मुबई येथें मानपत्र देऊन त्याचे अभिनदन केले. |
| १९१७ | जानेवारी ६ | पाटणकर सिनेमा स्टार्स कपनीच्या ' गर्वपरिहार ' या नाटकाचा उद्घाटनसमारभ श्रीमत बाबासाहेब याचे अध्यक्षतेखाली झाला |
| ,, | मार्च १० | पुणे डेक्कन जिमखान्याचा वार्षिक बक्षिससमारभ श्रीमत बाबासाहेब याचे अध्यक्षतेखालीं झाला. |
| ,, | मार्च २१ | भोर येथील श्रीरामक्रीडाभुवनाचा वार्षिक बक्षिस-समारभ श्रीमत बाबासाहेब याचे अध्यक्षतेखालीं झाला |
| ,, | एप्रिल ६ | शिरवळ येथें तेथील नागरिकाची राजेसाहेबाचे अध्यक्षतेखालीं वॉरलोनसबधीं सभा झाली |
| ,, | मे २९ | रा ब डी बी पारसनीस याच्या सातारा येथील ऐतिहासिक वस्तुसग्रहास श्रीमत बाबासाहेब यानीं भेट दिली |
| ,, | मे ३० | सातारा येथील युनिअन क्लबची श्रीमत बाबासाहेब याना पानसुपारी झाली |
| ,, | जून १८ | मि जी डब्ल्यू हॅच, पो एजट, याची बदली झाली. त्याना निरोपाची चहापार्टी श्रीमत बाबासाहेब यानीं पुणे येथें दिली |
| ,, | जून २९ | पुणे येथील गव्हर्नमेंट हाउसवर नेक नामदार गव्हर्नरसाहेब व लेडी विलिंग्डन यानीं दिलेल्या रिसेप्शनला श्रीमत बाबासाहेब हजर राहिले |

| | |
|---|---|
| १९१७ जुलै २५ | पुणे येथील गव्हर्नमेट हाउसवर नेक नामदार गव्हर्नर-साहेब व लेडी विलिंग्डन यानीं दक्षिणेतील सरदाराना गार्डन पार्टी दिली त्या वेळीं श्रीमत बाबासाहेब याना निमत्रण आल्यावरून ते हजर राहिले |
| ,, जुलै २७ | लोकल सेल्फ-गव्हर्नमेट कॉन्फरन्सला श्रीमत बाबासाहेब हजर राहिले. |
| ,, ऑगस्ट ४ | तृतीय युद्धदिन शिरवळ येथे साजरा करण्यात आला (कानिटकर अध्यक्ष) |
| ,, सप्टेबर १ | इनॉक्युलेशन मीटिंग श्रीमत बाबासाहेब याच्या अध्यक्षतेखालीं शिरवळ येथे झाली |
| ,, ऑक्टोबर १४ | शृंगेरीमठाचे श्रीजगद्गुरु श्रीविद्याशकरभारती याची शिरवळास भेट. |
| ,, नोव्हेबर ५ ते १० | दिल्ली येथे झालेल्या रूलिंग प्रिन्सेस व चीफ्स् याच्या कॉन्फरन्सला श्रीमत बाबासाहेब आपल्या वडिला-बरोबर हजर राहिले |
| ,, नोव्हेबर १ ते २१ | दिल्ली, मथुरा, अजमीर, चितोडगड, उदेपूर, रतलाम वगैरे ठिकाणीं श्री. बाबासाहेबाचा प्रवास |
| ,, नोव्हेबर २६ | 'अवर डे'-च्या मदतीकरिता नेक नामदार लॉर्ड विलिंग्डन याच्या आधिपत्याखालीं फुड ॲन्ड इड-स्ट्रियल प्रॉडक्टस्चे प्रदर्शन भरविण्यात आले, त्यास श्रीमत बाबासाहेब गेले होते |
| ,, डिसेबर ८ | मुबई येथील विलिंग्डन स्पोर्टस् क्लबचा नेक नामदार लॉर्ड विलिंग्डन याचे हस्ते उद्घाटनसमारभ झाला त्या वेळीं श्रीमत बाबासाहेब हजर राहिले क्लबचे सभासद झाले |
| १९१८ फेब्रुवारी २ | मि. ए एस. ए वेस्ट्रॉप, पो ए, यानीं श्रीरामक्रीडा-भुवनास भेट दिली |
| ,, फेब्रुवारी १६ | श्रीमत बाबासाहेब याची फलटणास भेट |

१९१८ एप्रिल ८ श्रीरामक्रीडाभुवनाचे वार्षिक समेलन श्रीमत बाबासाहेब याच्या अध्यक्षतेखालीं झाले

,, जून ९ कै श्री सौ गगूताईसाहेब पतसचिव वाचनालयाचा उद्घाटनसमारभ श्रीमत बाबासाहेब याच्या हस्ते झाला.

,, ऑगस्ट ४ चतुर्थ युद्धदिन शिरवळ येथे श्रीमत बाबासाहेब याचे अध्यक्षतेखाली श्रीराममदिरात सभा भरवून साजरा करण्यात आला

,, ऑगस्ट १३ श्रीमत बाबासाहेब याना रिक्रूटिग ऑफिसर म्हणून नेमिले

,, ऑगस्ट १४ चिपळूणकर मडळीचे प्रोप्रायटर श्री रा रा बाळकृष्ण पाडुरग ठकार, भोरचे रहिवाशी, याचा भारतादि सस्कृत ग्रथाचे मराठी प्रकाशनाबद्दल सत्कार-समारभ भोर येथें श्रीमत बाबासाहेबाचे अध्यक्षते-खालीं झाला

,, सप्टेबर ३० शिरवळ येथें रिक्रूट-भरतीकरिता श्रीमत बाबासाहेब यानी सभा भरविली.

,, ऑक्टोबर ७ इन्फ्ल्युएझा साथीविरुद्ध उपाययोजना करण्याकरिता श्रीमत बाबासाहेब याच्या अध्यक्षतेखालीं भोर येथें सभा भरविण्यात आली

,, ऑक्टोबर १४ श्रीमत बाळासाहेब गाडेकर याचे निधन

,, ऑक्टोबर २३ नसरापूर येथें रिक्रूट-भरतीकरिता श्रीमत बाबासाहेब यानी सभा भरविली

,, नोव्हेबर ५ श्रीमत भाऊसाहेब विंचुरकर याचे निधन

,, नोव्हेबर ११ महायुद्ध समाप्त झाले

,, नोव्हेबर २० श्रीमत बाबासाहेब घोरपडे, चीफसाहेब इचलकरजी, याची श्रीमत बाबासाहेब याच्या निमत्रणावरून भोर व भाटघर यास भेट

१९१८ डिसेंबर — श्रीमत बाबासाहेब यानीं सुधागड तालुक्यास भेट दिली त्या वेळीं त्याना पाली येथें मानपत्र समर्पण करण्यात आले

१९१९ फेब्रुवारी ८ — श्री रा कु स्नेहलताबाई याचा जन्म

,, मार्च ३१ — शिरवळ येथील नागरिकाची श्रीमत बाबासाहेब याच्या अध्यक्षतेखालीं दुष्काळ-निवारणार्थ उपाययोजने-बाबत विचार-विनिमय करण्याकरिता सभा झाली

,, मे ३० — भारत इतिहाससशोधनमदिर, पुणे, या इमारतीचा उद्घाटनसमारभ श्रीमत बाबासाहेब याचे हस्ते झाला

,, — श्रीमत बाबासाहेब यास किंग एडवर्ड मेमोरियल हॉस्पिटल या सस्थेचे मॅनेजिंग कमिटीचे मेबर म्हणून निवडण्यात आले.

,, जुलै ८ — फर्स्ट ओरिएटल कॉन्फरन्सचा पुणे येथे गव्हर्नर सर जॉर्ज लॉइड याचे हस्ते उद्घाटनसमारभ झाला त्या वेळीं स्वागत कमिटीचे सभासद म्हणून श्रीमत बाबासाहेब यानी आभाराचे भाषण केले

,, जुलै १३ — भोर येथें श्रीमत बाबासाहेब याचे अध्यक्षतेखालीं ऑनरेबल मि आर बी गरुड याचे व्याख्यान

,, जुलै १९ — जर्मनीने तहाच्या अटी स्वीकारल्या म्हणून शिरवळ येथें श्रीमत बाबासाहेब याच्या अध्यक्षतेखालीं सभा भरविण्यात येऊन ब्रिटिश सरकारचे अभिनदन करणारा संदेश पाठविण्यात आला

,, ऑगस्ट २८ — कुरुदवाड येथें भालचद्र मेमोरिअल हॉलचा श्रीमत बाबासाहेब याचे अध्यक्षतेखालीं उद्घाटनसमारभ

,, ऑक्टोबर ३१ — भोर येथें प्रोफेसर डी के कर्वे याचे ‘ हिंदुमहिला-विद्यापीठ ’ या विषयावर व्याख्यान श्रीमत बाबा-साहेब अध्यक्ष

,, नोव्हेबर २१ — रा. महादेव गोविंद देशपाडे, शिरवळ येथील मामलेदार, याचे निधन.

१९१९ नोव्हेंबर १९ श्रीमताची कन्या स्नेहलताबाई याचे निधन.

,, डिसेंबर ७ ते १९२० फेब्रुवारी ११ दक्षिण हिंदुस्थानचा प्रवास श्रीमत बाबासाहेब यानीं केला

१९२० मार्च २१ श्रीमत बाबासाहेब यानीं दक्षिण हिंदुस्थानच्या प्रवासावर भोर येथें १ ले व्याख्यान दिले

,, मार्च २८ दुसरे व्याख्यान.

,, श्रीमत बाबासाहेबाना किंग एडवर्ड मेमोरिअल हॉस्पिटलचे आणि पी वाय सी जिमखान्याचे व्हाइस-प्रेसिडेट निवडण्यात आले, आणि पुणे सेवासदनच्या सल्लागार-मडळाचे सभासद झाले

,, मे १७ नेक नामदार सर जॉर्ज लॉइड याना शिरवळ येथें चहा देण्यात आला

,, जुलै ६ श्रीमत बाबासाहेब यानीं डॉ भाडारकर याच्या अर्ध-पुतळ्याचा पुणे येथील भाडारकर ओरिएन्टल रीचर्स इन्स्टिटयूटमध्ये अनावरणसमारभ केला

,, जुलै २७ पुणे न्यू पूना कॉलेज ( हल्लीं सर परशुरामभाऊ ) या सस्थेच्या नूतन व माजी विद्यार्थि-मडळास रु १०० देऊन आश्रयदाते झाले

,, ऑगस्ट २० श्री सौ वाराणशीबाई विंचुरकर याचे निधन

,, ऑगस्ट २० ते ऑक्टोबर ५ काश्मीरचा प्रवास श्रीनगर व त्याचेजवळचीं प्रेक्षणीय स्थळे आणि नौशेरा, पेशावर, खैबरघाट, लाहोर, अमृतसर वगैरेचा प्रवास

,, नोव्हेंबर ११ श्रीरामक्रीडाभुवनाच्या सभासदाची श्रीमत बाबासाहेब याचे अध्यक्षतेखालीं सभा झाली त्या वेळीं श्रीमत बाबासाहेब यानीं काश्मीर प्रवासावर व्याख्यान दिले

,, डिसेंबर १३ राजकुमार रामनाथ याचा जन्म

१९२१ फेब्रुवारी २१ श्रीमत बाबासाहेब हि रॉ हा दि डयूक ऑफ कॅनॉट याच्या स्वागतसमारभास मुबई येथें हजर होते

१९२१ फेब्रुवारी २२ नेक नामदार गव्हर्नरसाहेब यानीं ड्यूक ऑफ कॅनॉट याना मुबई येथें पार्टी दिली त्या पार्टीला श्रीमत राजेसाहेब हजर होते

,, फेब्रुवारी २३ ड्यूक ऑफ कॅनॉट याच्या हस्ते लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचा उद्घाटनसमारभ झाला त्या समारभास श्री. बाबासाहेब टाउन हॉल, मुबई, येथे गेले होते

,, फेब्रुवारी २४ ड्यूक ऑफ कॅनॉट याच्या भेटीस पुणे गायनसमाजाचे डेप्युटेशन गेले त्यासमवेत श्रीमत बाबासाहेब गव्हर्नमेंट हाउसवर गेले होते

,, फेब्रुवारी २५ ड्यूक ऑफ कॅनॉट याच्या भेटीनिमित्त पुणे येथे परेड झाली त्या परेडीस श्रीमत बाबासाहेब गेले होते रॉयल कॅनॉट बोट क्लबने दिलेल्या पार्टीस श्रीमत बाबासाहेब गेले होते ड्यूक ऑफ कॅनॉट याच्या-बरोबर त्याची ओळख करून देण्यात आली व त्याच्याबरोबर चहा घेतला

,, एप्रिल ६ मि एल रॉबर्टसन, इन्स्पेक्टर जनरल ऑफ पोलिस, याना चहापार्टी श्रीमत बाबासाहेबानीं दिली

,, पुणे मराठी ग्रथसग्रहालय या सस्थेचे श्रीमत बाबासाहेब रु १०० देऊन आश्रयदाते (पेट्रन) झाले

,, मे १ महाबळेश्वर युरोपियन क्लबचे श्रीमत बाबासाहेब ऑनररी मेंबर

,, ऑगस्ट १९ नेक नामदार गव्हर्नरसाहेब यानीं दक्षिणेतील सरदार व चीफ याना गार्डनपार्टी दिली त्या पार्टीस श्रीमत बाबासाहेब गेले होते

,, ऑगस्ट २५ सर विठ्ठलदास ठाकरसी हॉलचा उद्घाटनसमारभ पुणे येथे सेवासदनतर्फे नेक नामदार गव्हर्नरसाहेब याच्या हस्ते झाला त्या समारभास श्रीमत बाबा-साहेब गेले होते

१९२१ पुणे येथील विद्याप्रसारिणी सभेचे श्रीमत बाबासाहेबाना अध्यक्ष म्हणून निवडण्यात आले

,, नोव्हेबर १७ हि रॉ हा दि प्रिन्स ऑफ वेल्स, हल्लींचे ड्यूक ऑफ विंडसर, याचे स्वागताकरिता श्रीमत बाबासाहेब अपोलो बदरवर गेले

,, नोव्हेबर १९ पुणे येथील शनिवारवाड्यासमोर मराठा वॉर मेमोरियलच्या पायाचा दगड प्रिन्स ऑफ वेल्स याचे हस्ते बसविण्यात आला त्या समारभास श्री बाबासाहेब हजर होते

,, डिसेबर २९ श्री राजकुमार रामनाथ याचे निधन

१९२२ फेब्रुवारी २ श्री सौ जिजीसाहेब याचे निधन

,, जून २६ श्रीमत राजकुमार आनदराव बापूसाहेब याचा जन्म

,, जुलै १७ श्रीमत शकरराव रावसाहेब याचे निधन

---

श्रीमत राजेसाहेब याच्या कारकीर्दीतील महत्त्वाच्या गोष्टींची सनावली

,, जुलै १८ श्रीमत राजेसाहेब यानीं भोर सस्थानचा कारभार हाती घेतल्याचा जाहीरनामा

,, ऑगस्ट ३ भोर सस्थानचे अधिपति व दक्षिणेतील पहिल्या प्रतीचे सरदार म्हणून मुबई सरकारातून श्रीमताचे नाव दाखल झाल्याबद्दल कळविण्यात आले

,, ऑगस्ट ८ दक्षिणेतील सरदाराचे दरबारास श्रीमत राजेसाहेब हजर राहिले. गव्हर्नरसाहेबाचे हस्ते श्रीमत राजेसाहेबाना फर्स्ट क्लास सरदारकीचीं वस्त्रे

,, ऑगस्ट १८ श्रीमताचा राज्यारोहणसमारभ भोर सस्थानचे वारस असल्याबद्दल मान्यतेचा बादशहाचा खलिता घरपट्टी, म्हैसपट्टी, लग्नटका, पाटदाम, इत्यादि

| | | |
|---|---|---|
| | | कराची माफी प्राथमिक शिक्षण मोफत बोनस व सूट. |
| १९२२ | ऑगस्ट १९ | मानपत्राचा दरबार. |
| ,, | सप्टेंबर २० | श्रीमताचा ४५ वा वाढदिवस भोर संस्थान प्रजा-परिषदेचे मानपत्र |
| ,, | ऑक्टोबर २२ | मि ए एफ् किंडर्स्ले, पोलिटिकल सेक्रेटरी, याची भोरास भेट. |
| ,, | ऑक्टोबर २४ | मुबईचे गव्हर्नर लॉर्ड लॉइड याची भोरास भेट त्याच्या हस्ते भोर म्युनिसिपॅलिटीची स्थापना |
| ,, | नोव्हेंबर २२ | पुणे जिल्हा वॉर मेमोरिअलचे उद्घाटन श्रीमत राजेसाहेब हजर होते |
| ,, | डिसेंबर २० | सुधागड तालुका जमाबदी |
| ,, | डिसेंबर २४ | सुधागड तालुका सभेचे मानपत्र |
| ,, | डिसेंबर २४ | सभाबदीचा कायदा रद्द केला |
| ,, | डिसेंबर ३० | पौन मावळ तालुका जमाबदी |
| १९२३ | जानेवारी ३ | राजगड तालुका जमाबदी |
| ,, | जानेवारी ५ | प्रचडगड तालुका जमाबदी |
| ,, | जानेवारी १० | विचित्रगड तालुका जमाबदी |
| ,, | जानेवारी १२ | शिरवळ येथील मोफत वाचनालयाचें मानपत्र |
| ,, | फेब्रुवारी ४ | संस्थानच्या पूर्ण अधिकारावर असलेले नियत्रणाचे नियम काढून टाकण्यात आले. |
| ,, | एप्रिल २० | श्रीमत युवराज भाऊसाहेब याचा प्रथमविवाह |
| ,, | जून १ | संस्थानातील सर्व खात्यातील नोकरलोकाचे पगारात वाढ |
| ,, | जून २१ | श्रीमत राजेसाहेबाना दक्षिणेतील सहा संस्थानातर्फे नरेंद्र-मडळाचे सभासद म्हणून निवडण्यात आले |
| ,, | जुलै १९ | जाभूळपाडा जलप्रलय |

१९२३ ऑगस्ट ३१ श्रीमत राजेसाहेबाना पुणे येथील किंग एडवर्ड मेमोरिअल हॉस्पिटलचे मानपत्र.

,, सप्टेंबर ८ पुणे सिटी बॉय स्काउट असोसिएशनचा वार्षिक बक्षिस समारभ श्रीमत राजेसाहेब याचे अध्यक्षतेखालीं झाला.

,, सप्टेंबर ९ पौनमावळ तालुक्याचे श्रीमत राजेसाहेबाना पिरगुट येथे मानपत्र

,, सप्टेंबर २४ जाभूळपाड्यास जलप्रलयानिमित्त श्रीमत राजेसाहेब याची भेट व तेथील आपद्ग्रस्तास मदत.

,, ऑक्टोबर ७ मि ह्रॅच, मध्यभाग कमिशनर, व मि मॅकी, पो ए, याची भोरास भेट

,, ऑक्टोबर २१ भोर म्युनिसिपालिटीतर्फे श्रीमत राजेसाहेब याचा सत्कार

,, पेन्शन ग्रॅच्युइटीचे नियम केले भत्ता रूल्स, रजेबद्दल नियम

फॉरेस्टच्या तक्रारींची चौकशी करण्याकरिता रा ब अजनगावकर याची नेमणूक

फर्ग्यूसन कॉलेजमध्ये भोर सस्थानचे चार विद्यार्थी मोफत शिकविण्याची सोय केली आहे.

१९२४ जानेवारी १५ पुणे सेवासदन सोसायटीचा श्रीमत राणीसाहेब याच्या अध्यक्षतेखालीं सक्रातीचा हळदीकुकूसमारभ

,, फेब्रुवारी १२ ते मार्च ७ श्रीमत बाबासाहेबानीं त्रिस्थळीं यात्रा केली

,, मार्च १ व्हाइसरॉय लॉर्ड रीडिंग व काउन्टेस ऑफ रीडिंग याची श्रीमत राजेसाहेब याशीं मुलाखत ( दिल्ली )

,, मार्च ५ श्रीमत शिऊबाई उर्फ माईसाहेब, श्रीमत युवराज याची भार्या, याचा मृत्यु

,, मार्च २० श्रीमत युवराजसाहेब मॅट्रिक परिक्षेत पास झाले

,, मे १८ श्रीमत राजकुमार नारायणराव ऊर्फ रावसाहेब याचा जन्म

| | | |
|---|---|---|
| १९२४ | ऑगस्ट | दक्षिणेतील सरदारातर्फे नेक नामदार लेस्ली विल्सन याना श्रीमत राजेसाहेब याचे हस्ते मानपत्र |
| ,, | ऑगस्ट १८ | द्वितीय राज्यारोहणदिनसमारभ |
| ,, | ऑक्टोबर ८ | हि हा छत्रपति महाराज, कोल्हापूर, याना भाटघर येथे दरबारतर्फे पानसुपारी. |
| ,, | ऑक्टोबर २६ | मि सी डब्ल्यू ए टर्नर, पो से मुबई, याची भोरास भेट |
| ,, | ऑक्टोबर | दक्षिणेतील सहा सस्थानातर्फे श्रीमत राजेसाहेब याना नरेंद्र मडळाचे प्रतिनिधि म्हणून दुसऱ्यादा निवडण्यात आले |
| ,, | नोव्हेबर १ | नेक नामदार लेस्ली विल्सन याची भोरास भेट श्री सौ गगूतासाहेब वाचनालयाचे इमारतीकरिता श्री राजेसाहेबानीं रु ५००० ची देणगी जाहीर केली |
| ,, | नोव्हेबर २० | व्हाइसरॉय लॉर्ड रीडिंग याची श्रीमतानीं भेट घेतली ( मुबई ) |
| ,, | डिसेबर ६ | श्रीमत युवराजसाहेब याचा द्वितीय विवाह |
| ,, | डिसेबर २१ | देअर रॉयल हायनेसेस दि प्रिन्स आर्थर व प्रिन्सेस ऑफ कॅनॉट याची पुणे येथें भेट |
| ,, | डिसेबर २५ | पाली-नागोठणा रोडचा श्रीमत राजेसाहेब याचे हस्ते उद्घाटनसमारभ |
| १९२५ | जानेवारी ३ | श्रीमत राजेसाहेब याच्या अध्यक्षतेखालीं पुणे येथील डेक्कन जिमखान्याचा बक्षिस समारभ |
| ,, | मार्च २५ | मि एफ् जी एच अँडरसन, पो एजट, याची भोरास भेट |
| ,, | एप्रिल २१ | श्रीमत राजेसाहेब याचे अध्यक्षतेखालीं वाई येथील द्रविड हायस्कूलचे वार्षिक समेलन |
| ,, | जून ७ | ऑनरेबल सर मॉरिस हेवर्ड, मुबई कौन्सिलचे सभासद, याची भोरास भेट. |

१९२५ जून २५ मि पी. बी हेग, पो एजट, याची भोरास भेट

,, जुलै १५ श्रीमंत राजेसाहेब याच्या अध्यक्षतेखालीं ऑल इडिया लेप्रसी रिलीफ फडाचे मदतीकरिता भोर येथे सभा

,, ऑगस्ट १२ सर लल्लुभाई सामळदास, ॲ रेव्हिन्यु मेंबर, याची भोरास भेट.

,, ऑगस्ट १८ तिसरा राज्यारोहणदिन-समारभ एक्झिक्यूटिव्ह कौन्सिल नेमणूक

,, सप्टेबर २८ बडोद्याच्या महाराणी चिमणाबाईसाहेब याची भोरास भेट

,, नोव्हेबर २० श्रीमत राजेसाहेब याची हि हा श्रीमत सयाजीराव गायकवाड याचेबरोबर मुबई येथें भेट

,, शिरवळ गावास नोटिफाइड एरिया कमिटीची स्थापना. शिरवळ गावचा मोहतर्फा कर माफ केला

पुणे वेदशास्त्रोत्तेजक सभेचा सुवर्णमहोत्सव श्रीमत राजेसाहेब याच्या अध्यक्षतेखालीं झाला

१९२६ जानेवारी २९ व्हाइसरॉय लॉर्ड रीडिंग याची दिल्ली येथें मुलाखत.

,, मार्च १६ मि जी व्ही धायगुडे, सस्थानचे कारभारी, रिटायर झाले

,, मार्च १७ रा ब अजनगावकर याची कारभारी म्हणून नेमणूक.

,, एप्रिल १ लॉर्ड आयर्विन मुबई येथें आल्यावेळी श्रीमतानी त्याची भेट घेतली

,, जून ६ मुबई सरकारचे पोलिटिकल सेक्रेटरी मि. वेब याची भोरास भेट

,, ऑगस्ट १ व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन याना भाटघर येथें दरबारतर्फे चहापार्टी देण्यात आली.

,, ऑगस्ट १८ चतुर्थ राज्यारोहणदिनसमारभ

,, सप्टेबर २६ श्रीमत राजेसाहेब याची महाराजा ऑफ म्हैसुर याचे-बरोबर पुणे येथें भेट

१९२६ ऑक्टोबर ३ मि. एच् एफ्. बॉल, पोलिटिकल एजट, याची भोरास भेट

१९२७ जानेवारी ४ श्रीमत राजकुमारी पद्मावतीराजे याचा जन्म

,, जानेवारी १७ सुधागड तालुक्यातील सोळा झाडावरील हक्क रयतेस दिले.

,, जानेवारी श्री सौ राणीसाहेब याना अर्धांगवाताचा आजार झाला

,, फेब्रुवारी ५ पालीच्या प्रजाजनाचे श्रीमत राजेसाहेबाना पाली येथें मानपत्र.

,, फेब्रुवारी २१ श्रीमत सरदार रामराव कृष्णराव ऊर्फ बाळासाहेब विंचुरकर याचा मृत्यु

,, मार्च १ श्रीमत राजेसाहेबाची नरेन्द्र-मडळाचे प्रतिनिधि म्हणून तिसऱ्या वेळीं निवडणूक.

,, मे ४ श्रीमत विमलाराजे ( श्रीमत राजेसाहेबाची नात ) याचा जन्म.

,, जून ७ हर हायनेस रीजट राणीसाहेब ग्वाल्हेर याचे भोर व भाटघर येथें आगमन

,, जुलै ३१ मि पी बी हेग, पोलिटिकल एजट, याची भोरास भेट

,, ऑगस्ट १८ पचम राज्यारोहणदिनसमारभ

,, ऑक्टोबर १६ मि जे आर मार्टिन, पो से , याची मिसेस मार्टिन, मिसेस वाइल्स व मि. वेब याचेसह भोरास भेट

,, ऑक्टोबर २२ मि जे. एल् रू, मुबई एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलचे सभासद, याचे भोरास आगमन

,, ऑक्टोबर २६ श्रीमत रघुनाथराव पतसचिव बालवीर मदिराचा नेक्र नामदार सर लेस्ली विल्सन याचे हस्ते उद्घाटन समारभ

,, नोव्हेबर २७ श्रीमत राजेसाहेब याना बादशहाकडून ९ तोफाचे सलामीचा वशपरपरेचा मान

| | |
|---|---|
| १९२७ डिसेंबर २ | श्रीमंताचे भोर येथें थाटाचे स्वागत व मिरवणूक. |
| ,, डिसेंबर | श्रीमंत राजेसाहेब यांना ९ तोफांचे सलामीबद्दल ब्राह्मणसभा मुंबई व मुंबई ग्रंथालय या संस्थांची पानसुपारी |
| | पाली सॅनिटरी बोर्डाची स्थापना |
| १९२८ जानेवारी १८ | मि जी डब्ल्यू हॅंच, मध्यभाग कमिशनर, यांचे भोरास आगमन |
| ,, जानेवारी २९ | श्रीमंत राजेसाहेब यांना ९ तोफांचे सलामीबद्दल मानपत्रे अर्पणसमारंभ |
| ,, फेब्रुवारी २६ | श्रीमंत राजेसाहेब यांना ९ तोफांचे सलामीबद्दल दिल्ली महाराष्ट्र स्नेहसमाजाची दिल्ली येथे पानसुपारी |
| ,, मार्च ३ | नेक नामदार व्हाइसरॉय लॉर्ड आयर्विन यांचेबरोबर दिल्ली येथें मुलाखत |
| ,, मार्च १७ | मि डब्ल्यू. सी ट्यूडर-ओवेन, पो एजंट, यांचे भोरास आगमन |
| ,, मे ८ | नेक नामदार सर लेस्ली विल्सन यांची भोरास दुसरी भेट व त्यांच्या हस्ते श्री सौ गंगूताईसाहेब पंतसचिव वाचनालय–उद्घाटनसमारंभ व राजवाड्यात व शहरात विद्युत्-उद्घाटन समारंभ |
| ,, जून २३ | सातारा आर्यांग्ल वैद्यक विद्यालयाचा बक्षिससमारंभ श्रीमंत राजेसाहेब यांचे अध्यक्षतेखालीं भोरच्या एका विद्यार्थ्याला विद्यालयात मोफत शिकविण्याची व्यवस्था |
| ,, ऑगस्ट १ | श्रीमंत राजेसाहेब यांचे अध्यक्षतेखालीं संस्कृत कॉलेज प्रवेशिका वर्गाचा उद्घाटनसमारंभ दुसऱ्या वर्गांतील विद्यार्थ्यास रु ११ ची एक वर्षपर्यंत शिष्यवृत्ति. |
| ,, ऑगस्ट १८ | षष्ठम राज्यारोहणदिनसमारंभ. |

१९२८ सप्टेंबर १ भोरचे राजवैद्य श्रीधरशास्त्री गोखले याचा मृत्यु

,, सप्टेंबर १५ मालकी जगलतोडीचा दुरुस्त जाहीरनामा प्रसिद्ध झाला

,, ऑक्टोबर २६ सर लेस्ली विल्सन याना पुणे येथें लक्ष्मीविलास बंगल्यात निरोप-पार्टी

,, ऑक्टोबर २७ भाटघर येथील लॉइड धरणाचा उद्घाटनसमारभ नेक नामदार सर लेस्ली विल्सन याचे हस्ते.

मेसर्स पूली, हॅरिसन व सर लेस्ली विल्सन याच्या भाषणात भोर दरबारने भाटघर धरणाचे कामीं केलेल्या मदतीचा जाहीर उल्लेख भोर स्टेटची सायमन कमिशनला पानसुपारी

,, ऑक्टोबर २८ श्रीमत राजेसाहेब याच्या अध्यक्षतेखालीं चिपळूणकर आणि मडळी (रामायण आणि महाभारत या सस्कृत पुस्तकाचे मराठी भाषातर प्रकाशित करणारी) या सस्थेचा रौप्यमहोत्सव, पुणे.

,, डिसेबर २१ जोगवडी येथें विष्णुबुवा जोग याच्या तजबिरीचा श्रीमताचे हस्तें अनावरण समारभ.

१९२८ भोर सस्थानचे कारभाऱ्यास दिवाण म्हणण्यास मजुरी

१९२९ फेब्रुवारी १५ नेक नामदार लॉर्ड आयर्विन व्हाइसरॉयसाहेब याची दिल्ली येथें मुलाखत.

,, एप्रिल २६ नेक नामदार सर फ्रेडरिक साइक्स, मुबईचे गव्हर्नर, याची भोरास प्रथम भेट श्री सौ गंगूताईसाहेब वाचनालयातील त्याच्या तैलचित्राचे अनावरण

भोर म्युनिसिपालिटीस निवडणुकीचे तत्त्व लागू केले.

,, जून ३ रा रा अनत रामचद्र जोशी, ज्युडिशिअल कौन्सिलर, याना ‘ रावसाहेब ’ या पदवीची प्राप्ति

,, ऑगस्ट १८ सप्तम-राज्यारोहणदिन-समारभ

,, ऑक्टोबर ६ श्रीमत कमलाराजे ( श्रीमत राजेसाहेब याची दुसरी नात ) याचा जन्म.

